# संस्कृति-समवाय




लेखिका

**वत्सला भाटे**

ो. टी., डी. पी. एड्., डी. बी. एड्.

**किंमत २॥ रुपये**

# संस्कृति–समवाय



लेखिका

वत्सला भाटे

बी. ए. ( ऑनर्स ), बी. टी., डी. पी. एड्., डी. बी. एड्.

किमत अडीच रुपये

# प्रस्तावना



आपल्या देशांत जविन शिक्षणाचा प्रसार होऊं लागल्यापासून समवाय पद्धतीचें नवें तंत्र शिक्षणक्षेत्रांत डोकावूं लागलें आहे. या तंत्रांतील मर्म अद्यापिहि बऱ्याच शिक्षकांच्या ध्यानीं न आल्यामुळें त्यासंबंधानें बरीचशी अनास्था दर्शविली जात आहे. समवाय पद्धतीनें शिक्षणक्रम चालू ठेवण्यासाठीं शिक्षकाचें ज्ञान विस्तृत असणें आवश्यक असतें. तें ज्ञान योग्य प्रसंगीं पद्धतशीर व परिणामकारक रीतीनें मांडण्याचें त्याच्या ठिकाणीं कौशल्य असावें लागतें. त्याचप्रमाणें आपल्या जीवनांत पुढें कोणकोणत्या गोष्टी येणार आहेत. हें हेरण्याची दूरदृष्टि व त्याप्रमाणें कार्य करण्यास आवश्यक असलेली कर्तृत्वशक्ति हवी असते. शिक्षकाच्या ठिकाणीं या सर्व गोष्टी असल्या तर त्यास समवायपद्धतीचें मर्म समजावून घेऊन तिचा शिक्षणक्षेत्रांत उपयोग करणें कठीण जाणार नाहीं. समवायपद्धतींत जीवन व शिक्षण यांचें एकजीवित अभिप्रेत आहे. जीवनास बगल देऊन शिक्षण देणें कृत्रिमपणाचें व पुस्तकी ठरतें. त्यामुळें विद्यार्थ्यांच्या अंगीं पढीकपणा निर्माण होतो व प्राप्त केलेल्या ज्ञानाचा व्यवहारांत उपयोग करण्याचें कौशल्य अंगीं येत नाहीं. उलटपक्षीं जीवनांतील अनेक प्रसंग अनुभवीत असतांना अथवा तें यशस्वी रीतीनें जगण्यासाठीं अनेक गोष्टी करीत असतांना आपल्या मनासमोर नाना प्रकारचे प्रश्न उभे राहतात. त्यांचीं उत्तरें मिळाल्याशिवाय आपणाला त्या प्रसंगांचा अथवा कृतींचा नीटपणें उलगडा होत नाहीं. ते प्रसंग अनुभवतांना अथवा त्या कृती करीत असतांना उपस्थित होणाऱ्या प्रश्नांसंबंधीं ज्ञान मिळविणें म्हणजेच अनुभव, कृति व ज्ञान यांचा समवाय साधणें होय. समवायपद्धतींत सहजता आहे व कृत्रिमता ही तिला अगदीं वर्ज्य आहे.

तथापि अलीकडे समवायपद्धतीनुसार कार्य करीत असतांना शिक्षकांकडून बऱ्याच वेळां कृत्रिमतेचा अवलंब केला जातो. समवाय व कल्पनासाहचर्य या दोन्ही गोष्टी एकच आहेत असें ते धरून चालतात. त्यामुळें ही अशी स्थिति निर्माण होते. चेंडू वाटोळा असतो व चंद्रहि वाटोळा असतो, म्हणून चेंडूसंबंधीं माहिती देत असतांना चंद्रासंबंधींची माहिती देणें अयुक्त आहे. दोहोंतील वाटोळेपणाचा समान गुणधर्म सोडल्यास चेंडू व चंद्र यांचा अर्थाअर्थी कांहींहि अथवा कोणत्याहि प्रकारचा संबंध नाहीं. तथापि वाटोळेपणाच्या समानत्वाचा तेवढा धागा उचलून जर आपण त्या दोघांना एकाच पंक्तीस आणून ठेवलें तर मात्र आपल्या हातून शिक्षणाचें वाटोळेंच होणार आहे. सुतानें स्वर्ग गांठण्याच्या कल्पनेइतकीच ही गोष्ट हास्यास्पद आहे. वस्तू-वस्तूंतील अशा प्रकारच्या संबंधास शिक्षणशास्त्रांत कल्पनासाहचर्य असें म्हणतात. समवायाचें तत्त्व यापेक्षां सर्वस्वीं भिन्न आहे.

ता. १५ ऑगस्टसारखा दिवस आपण उदाहरणादाखल घेऊं. या दिवशीं सर्व देशांत स्वातंत्र्यदिन साजरा केला जातो. आदल्या दिवसापासूनच स्वातंत्र्यदिनाच्या समारंभाच्या पूर्वतयारीची धांदल चालू असते. अशा वेळीं ही सारी गडबड कशासाठीं चालली आहे, असा प्रश्न मुलांच्या मनासमोर उभा राहणें साहजिकच आहे. ‘ उद्याच्या स्वातंत्र्यदिनाची ही तयारी चालली आहे ’ असें सांगून तुम्हीं त्यांचें शंकासमाधान केलेंत तरी त्यांच्या मनासमोरील प्रश्न संपत नाहीत. उलट ते अधिकच वाढतात. ‘ स्वातंत्र्यदिन म्हणजे तरी काय ? ’ हा दुसरा प्रश्न त्यांच्या मनासमोर उभा राहतो. ‘ या दिवशीं आपल्या देशास स्वातंत्र्य मिळालें ’ असें सांगून तुम्हीं त्यांचें शंकासमाधान केलेंत तरी पुढचे प्रश्न त्यांच्या मनासमोर तयारच असतात. ‘ म्हणजे ता. १४-८-१९४७ पर्यंत आपण परतंत्र होतों कीं काय ? ’ ‘ परतंत्र होतों तर येथें कोणाची सत्ता होती ? ’ ‘ ती त्यांनीं कशी मिळविली ? ’ ‘ आम्हीं ती त्यांना कशी मिळवूं दिली ? ’ ‘ या सत्तेतून सुटका झाली म्हणून आपण एवढा मोठा उत्सव साजरा करतों. तेव्हां ती सत्ता खचितच वाईट असली पाहिजे ! अशा कोणत्या वाईट गोष्टी त्या सत्ताधीशांनीं केल्या ?’ ‘ त्या गोष्टी आम्हीं कशा व कां सहन केल्या ?’ ‘ त्या सहन होईनाशा झाल्या तेव्हां आम्हीं कसा प्रतिकार करण्याचा प्रयत्न केला ? ’ ‘ आम्हांस कोणत्या हालअपेष्टा सहन कराव्या लागल्या ?’ ‘अखेरीस हा झगडा यशस्वी कसा झाला ?’ अशा नाना प्रकारच्या प्रश्नांची मालिका त्यांच्या डोक्यांत उभी राहते. या

सर्व प्रश्नांचीं उत्तरें दिल्याशिवाय त्यांना जीवनांत उद्भवलेल्या या प्रसंगाचें माहात्म्य व मर्म समजणार नाहीं. म्हणजे स्वातंत्र्यदिन साजरा करीत असतांना वरील सर्व गोष्टींचें ज्ञान देणें आवश्यक ठरतें. मुलांच्या मगदुराप्रमाणें त्याची मांडणी कोणत्या प्रकारें व किती प्रमाणांत करावी एवढा मात्र भाग शिक्षकानें तारतम्यबुद्धीनें ठरविला पाहिजे. अशा प्रकारें ज्ञान देण्याची जी पद्धति तिला समवायपद्धति म्हणतात. मुलांच्या जिज्ञासेंतून तिचा उगम होतो व त्यांच्या जिज्ञासातृप्तीनंतर तिचें कार्य संपतें ही गोष्ट लक्षांत ठेवल्यास समवायपद्धतीसंबंधानें विकृत कल्पना शिक्षकांच्या मनांत राहणार नाहींत.

समवायपद्धतीचें हें मर्म जाणूनच प्रस्तुत पुस्तकांतील निरनिराळ्या प्रकरणांची मांडणी केली आहे, हें वाचकांस दिसून येईल. जीवनपद्धतीनुसार ( १ ) मूलोद्योग (२) सांस्कृतिक व सामाजिक कार्यक्रम व (३) सभोंवतालची नैसर्गिक परिस्थिति हीं समवायपद्धतीचीं केंद्रें ठरलीं आहेत. त्यांपैकीं फक्त सांस्कृतिक केंद्राचाच विचार करून ही संस्कृतिसमवायाची योजना केली आहे. संस्कृतिसमवायासाठीं प्रस्तुत पुस्तक स्वयंपूर्ण नाहीं. कारण यांत फक्त सण व उत्सव यांचीच माहिती दिली आहे. थोर विभूतींच्या जयंत्या अथवा पुण्यतिथ्यांचा यांत फारसा उल्लेख नाहीं. त्याकरितां शिक्षकांस 'मानवतेचे पुजारी' भाग १, २ व ३ यांसारख्या पुस्तकांचा अवलंब करावा लागेल. तथापि सण व उत्सव या बाबतींत मात्र प्रस्तुत पुस्तक स्वयंपूर्ण करण्याचा यथाशक्ति प्रयत्न केला आहे. बऱ्याच ठिकाणीं समवायित ज्ञान प्रकटपणानें मांडलें आहे, तर क्वचित् ठिकाणीं त्यासंबंधानें सूचना मात्र केलेली आहे. विस्तारभयास्तव असें करणें भाग पडलें आहे, हें सूज्ञ वाचकांच्या ध्यानीं आल्यावांचून राहणार नाहीं.

प्रस्तुत पुस्तकांत हिंदूंच्या सणांबरोबरच पारशी, मुसलमान व ख्रिस्ती लोकांच्या सणांचीहि माहिती दिली आहे. ही सर्व माहिती आपणांस एकाच मानवधर्माकडे नेईल अशी आशा आहे. हिंदूंच्या सणांची मांडणी करतांना कांहीं वेळां दैवी व भौतिक दृष्टिकोनाची गल्लत झाली असल्याचा भास होणें संभवनीय आहे. तथापि हिंदूंच्या सणांसंबंधींच्या या निरनिराळ्या कथा, केवळ कथा म्हणूनच मुद्दाम दिल्या आहेत, ही गोष्ट लक्षांत घेतल्यास वाचकांच्या मनांतील विकल्प दूर होईल. गोष्टीवेल्हाळ मुलांना या कथांतील मौज व मर्म यापासून अलिप्त ठेवणें कितपत योग्य होईल? प्रस्तुत पुस्तकांत त्रिपुरी पौर्णिमेच्या प्रकरणांतच 'नव्याची पुनव' हिचा उल्लेख केला आहे. 'नव्याची पुनव' ही निरनिराळ्या ठिकाणी निरनिराळ्या दिवशी साजरी केली जाते.

त्यामुळें आपल्या भागांत ती ज्या दिवशीं साजरी केली जात असेल, त्या दिवशीं सदर प्रकरणांतील मजकुराचा उपयोग केला पाहिजे.

प्रत्येक प्रकरणाच्या आरंभीं त्याच सणाचें अथवा उत्सवाचें प्रातिनिधिक चित्र दिलें आहे. शिक्षकांस हीं चित्रें आवडतील व पाठ घेण्याच्या कामीं त्यांचा त्यांना उपयोग करतां येईल असा विश्वास वाटतो. पुस्तकाच्या शेवटीं कांहीं सणांची महत्त्वपूर्ण गाणीं देण्याचा संकल्प होता. तथापि पुस्तकाचा विस्तार अपेक्षेपेक्षां बराच वाढल्यामुळें मनांतील ही प्रबळ इच्छा मोठ्या नाखुषीनें दाबून टाकावी लागली. पुढील आवृत्ति काढण्याचा योग आल्यास ही उणीव अवश्य भरून काढण्यांत येईल एवढें आश्वासन देऊन ठेवतें.

प्रस्तुत पुस्तक लिहित असतांना अनेक ग्रंथांचा उपयोग करावा लागला. त्यांची सूचि दिली आहे. पुस्तकांचे लेखक व प्रकाशक यांची मी सदैव ऋणी आहे. त्याचप्रमाणें लेखनाचें कार्य करीत असतांना प्रा. कमलाबाई देशपांडे यांनींहि मला बहुमोल सहाय्य केलें. त्यांचे आभार मानणें माझें कर्तव्य आहे.

पुस्तक प्रकाशनाबाबत श्री. ग. ल ठोकळ यांचें अमोल सहाय्य झालें. त्यांच्या उत्तेजनानेंच हें पुस्तक आज प्रकाशित होत आहे. त्यामुळें त्यांचे आभार मानावेत तितके थोडेच आहेत. त्याचप्रमाणें नारायण छापखान्याचें संचालक श्री. ग. म. नलावडे यांनीं मुद्रणाचें काम आत्मीयतेनें करून दिलें त्याबद्दल त्यांचे व पुस्तक आकर्षक करण्यासाठीं चित्रकार श्री. ग. वि. देशपांडे व रघुवीर मुळगांवकर यांनीं कलापूर्ण सहाय्य केलें त्याबद्दल त्यांचे आभार मानले पाहिजेत.

शेवटीं जीवनशिक्षणाचें कार्य आत्मीयतेने करणाऱ्या शिक्षकांच्या हाती 'संस्कृतिसमवाया' चें भवितव्य सोंपवून ही लांबलेली प्रस्तावना पुरी करतें.

विनायकप्रसाद,
डेक्कन–जिमखाना,
पुणें ४.
दि. १-२-१९५१

**वत्सला भाटे**

# संदर्भ ग्रंथ

( १ ) आर्यांच्या सणांचा इतिहास — प्रका० व्ही. प्रभा आणि कंपनी
( २ ) जिवंत व्रतोत्सव — काका कालेलकर
( ३ ) हिंदु सण आणि व्रतें — बाळकृष्णतनय
( ४ ) मानवतेचे पुजारी भाग १, २, ३ व ४ — ना. ध. पाटील
( ५ ) आशियाचे धर्मदीप — गोपीनाथ तळवलकर
( ६ ) परशुराम चरित्र — प्रा. श्री. म. माटे
( ७ ) आद्यजगद्गुरु श्रीमच्छंकराचार्य ह्यांचें विस्तृत चरित्र — कृ.ना. आठल्ये
( ८ ) भगवान् बुद्ध भाग १ व २ — धर्मानंद कोसंबी
( ९ ) मराठी संत आणि मराठी राज्याची स्थापना — ल. वि. परळकर
(१०) महाराष्ट्र संतमंडळाचें ऐतिहासिक कार्य — बा. र. सुंठणकर
(११) तीर्थरूप महाराष्ट्र — पं. महादेवशास्त्री जोशी
(१२) आर्यांची दिनचर्या — ह. भ. प. दत्तोपंत पटवर्धनबुवा
(१३) हिंदूंचा विश्वविजयी इतिहास — वि. दा. सावरकर
(१४) गीतारहस्य — साने गुरुजी
(१५) दत्तभक्तरहस्य — स. कृ. फडके
(१६) खाडिलकरांचा रुद्र — कृ. प्र. खाडिलकर
(१७) सुंदर पत्रें — सानेगुरुजी
(१८) पारशांचा इतिहास — ––
(१९) हजरत महंमद पैगंबर — सय्यद अहमद अमीन
(२०) पाश्चात्य पुरुषश्रेष्ठ — प्रा. श्री. म. माटे
(२१) वृक्षसंवर्धन, झाडांची शेती व त्याचे उद्योगधंदे — या. शं. वावीकर
(२२) दिनविशेष — प्र. न. जोशी
( 23 ) A Survey of Indian History — K. M. Pannikar
( 24 ) India — G. Rawlinson
( 25 ) Mohammedanism — H. A. R. Gibb
( 26 ) The Pocket World Bible — Robert Ballon
( 27 ) Living Biographies of Religious Leaders — Hery Thomas & Dana Lee Thomas
( 28 ) Our India — Minoo Masani

# अनुक्रम





# वर्ष प्रतिपदा

चैत्र शुद्ध प्रतिपदेस हिंदु लोक गुढीपाडव्याचा सण साजरा करतात. या दिवसाला वर्षप्रतिपदा असेंहि म्हणतात. कारण हिंदु कालगणनेनुसार या दिवसापासून नव्या वर्षास आरंभ होतो. चैत्र महिन्यापासून वसंत ऋतूस सुरुवात होते. ऋतुराज वसंताच्या आगमनानें सर्व सृष्टि आनंदानें पुलकित होते. तिच्यांत नवजीवन संचरूं लागतें. या दिवसांत झाडांना नवी कोंवळी लुसलुशीत पालवी फुटते. किंचित् तांबडी व क्वचित् हिरवी अशी ही लुसलुशित कोवळी पालवी पाहून मनास मोठा आल्हाद वाटतो. अशा वेळीं आपल्या नव्या वर्षास सुरुवात होते ही घटना किती समर्पक वाटते !

नूतन वर्षारंभाच्या या दिवशीं सगळीकडे उल्हासाचें व उत्साहाचें वातावरण पसरलेलें असतें. या दिवशीं भल्या पहाटेस उठून गृहिणी अंगण झाडून सडासंमार्जन करतात. त्यावर सुंदर रांगोळी काढतात. शुचिर्भूत होऊन बांबूच्या काठीवर जरीच्या खणाच्या अथवा एखाद्या उत्तमशा वस्त्राची

साज चढवितात. त्यावर चांदीचें, तांब्याचें अथवा पितळेचें पात्र ठेवून गुढी तयार करतात. तरतऱ्हेच्या माळा घालून गुढीला सजवितात. तिची हळद, कुंकू, गंध, पुष्प इत्यादींनीं पूजा करतात. घरावर उंच ठिकाणीं ही गुढी उभारतात. उंचावर विराजत असलेली ती गुढी पाहून नव्या वर्षीं आपल्याहि आशा अशाच प्रगतीचें शिखर गांठोत असा विचार मनांत आल्याशिवाय राहात नाहीं. या दिवशीं सर्वत्र प्रेमाचें वातावरण पसरलेलें असतें. इष्टमित्र एकमेकांस भेटून 'नूतन वर्ष सुखाचें जावो' अशी शुभेच्छा प्रकट करतात. या दिवशीं मुलें-माणसें कडुनिंबाचा पाला सेवन करतात. आयुर्वेदशास्त्रदृष्टया कडुनिंबाचा पाला अत्यंत गुणकारी असून शरिरबलसंवर्धनास फार उपयुक्त आहे. असा हा कडुनिंबाचा पाला सेवन करून आपण जणुं कांहीं या नूतन वर्षारंभाच्या दिवशीं 'शरीरमाद्यं खलु धर्म साधनम्' या तत्त्वाचा अंगीकार करीत असतों. शिवाय कडुनिंबाचा पाला शीतळहि फार. चैत्रमासीच्या उन्हाळ्यांत त्याचें सेवन केल्यानें शरीराचा थकवा नष्ट होऊन मेंदूस तरतरी येते व काम करण्यास अधिक उत्साह वाटतो. म्हणूनच या पाल्याचें सेवन करण्याची प्रथा या दिवशीं पडली असावी. गुढीपाडव्याच्या दिवशीं घरोघर मिष्टान्नाची मेजवानी होते. सर्वत्र आनंदी आनंद होतो.

वसंतगौरीच्या निमित्तानें हा आनंद पुढें महिनाभर व्यक्त केला जातो.



चैत्रा गौरी

या दिवसांत स्त्रिया एकमेकींच्या घरीं हळदीकुंकवास जातात. त्यामुळें

परस्परांतील प्रेमभाव वाढून सामाजिक वृत्तीची जोपासना होते. वसंत-गौरीची आरास करतांना तर कलात्मकतेस बहर येतो. या दिवसांत स्त्रियांत कलात्मकतेची जणुं चढाओढच लागते. जीवन व कला यांचा सुंदर मिलाफ साधला जातो. चैत्रगौरी चैत्र शु. ३ ला माहेरीं येऊन वैशाख शु. ३ ला अक्षय्यतृतीयेस—परत जाते. या मुदतींत साजरे होणारे सारे उत्सव म्हणजे वसंतोत्सवच होत. या वसंतोत्सवांस गुढीपाडव्यापासून प्रारंभ होतो.

गुढीपाडव्यासंबंधीं अनेक कथा प्रचलित आहेत. असें म्हणतात कीं, (१) प्रभु रामचंद्र आपला १४ वर्षांचा वनवास संपवून या दिवशीं अयोध्या नगरीस आले. त्या वेळीं अयोध्येंतील नागरिकांनीं घराघरांवर मंगल चिन्हें उभारून मोठा आनंदाचा उत्सव साजरा केला. तेव्हांपासून हा उत्सव साजरा करण्याची प्रथा पडली आहे. शिवाय वानरांचा राजा वाली याच्या जाचां-तून प्रभू रामचंद्रांनीं याच दिवशीं प्रजेची सुटका केली. त्यामुळेंहि या दिवशीं आनंदोत्सव साजरा करण्याची प्रथा पडली असें मानतात. (२) ब्रह्मदेवानें सृष्टीच्या उत्पत्तीस आरंभ केला तोहि याच दिवशीं, असें मानलें जातें. त्यामुळें स्वाभाविकपणेंच या दिवसास एक प्रकारचें मांगल्य निर्माण झालें आहे. (३) कांहींच्या मतें नारदमुनींना झालेले साठ पुत्र हेच साठ संवत्सरें असून त्यांपैकीं प्रत्येकाचा वर्षारंभ याच दिवशीं साजरा केला जातो व त्या-मुळें गुढीपाडव्याचा सण साजरा करण्याची प्रथा पडली असें आहे. (४) याशिवाय गुढीपाडव्यासंबंधीं एक कथा प्रचलित आहे, ती अशीः—प्राचीन काळीं चेदि देशांत वसू नांवाचा राजा राज्य करीत असे. वसू राजाच्या अमदानींत प्रजा सुखी होती. परंतु पुढें वसू राजाच्या मनांत वैराग्य बाणलें व त्यानें तपश्चर्या करण्यासाठीं अरण्याचा मार्ग धरला. तेथें वसू राजानें घोर तपश्चर्या केली. वसू राजाची ती घोर तपश्चर्या पाहून परमेश्वर संतुष्ट झाला. त्यानें वसू राजास वैजयंती माळा, विमान व एक वेळूची काठी दिली व आपल्या राजधानीस परत जाऊन सुखानें राज्य करण्याची आज्ञा

केली. परमेश्वराचा आपणावर झालेला हा अनुग्रह पाहून वसू राजास परम संतोष झाला. परमेश्वरानें दिलेल्या त्या वेळूच्या काठीस शृंगारून त्यानें तिची भक्तिभावानें पूजा केली. या प्रसंगाची आठवण ठेवण्याकरितां पुढें गुढीपाडव्याचा सण प्रचारांत आला असें मानलें जातें.

या सर्व कथा आपणांस एकच गोष्ट सुचवितात. ती ही कीं, नूतन वर्षारंभाचा हा दिवस परम मंगल असून या दिवशीं नवे संकल्प करून त्याप्रमाणें आपण कार्यास लागलें पाहिजे. वर्षप्रतिपदा म्हणजे नवनिर्मितीचा दिवस. या दिवशीं आपण आपल्या मागील कर्तृत्वाचा आढावा घेऊन पुढील कार्याची दिशा ठरविली पाहिजे. घराघरांवर उंच विराजत असलेली गुढी आपणास आपल्या कर्तव्याची जाणीव करून देते. प्रत्येक माणसानें आपल्या आयुष्यांत समाजोपयोगी कामें केल्याखेरीज जीवनापासून परावृत्त होण्याची आशा बाळगणें अयोग्य आहे. वसू राजाच्या गोष्टीपासून आपणास हाच बोध होतो. गुढीपाडव्याचा हा संदेश आपण लक्षांत ठेवण्यासारखा आहे. हे दिवस उन्हाळयाचे असल्यामुळें या वेळीं शाळा-कॉलेजांतील मुलांना उन्हाळयाची सुटी मिळते. या सुटींत समाजोपयोगी कामें करून राष्ट्रसेवा व समाजसेवा करण्याचा आपण निश्चय केला पाहिजे. सुटींतील काळ व्यर्थ मौजमजेंत न घालवितां आपण समाजोपयोगी कामांत खर्च केला तर त्यापासून आपणांस एक प्रकारच्या अननुभूत अशा आनंदाचा लाभ होईल यांत शंका नाहीं. या कामासंबंधींच्या योजना आपण गुढीपाडव्याच्या दिवशीं आखून पुढें त्या प्रत्यक्षांत उतरविल्या तर आपण खऱ्या अर्थानें गुढीपाडवा साजरा केल्यासारखें होईल.

त्याचप्रमाणें या दिवशीं आपण जगांत प्रचलित असलेल्या निरनिराळया कालगणनांचा इतिहासहि अभ्यासिला पाहिजे. भारतांत प्रचलित असलेला इ. स. पूर्वीं ५७ व्या वर्षीं विक्रमादित्यानें सुरू केलेला विक्रमसंवत, इ. सनानंतर ७८ व्या वर्षापासून सुरू होणारा व शकांवर मिळविलेल्या

विजयाचा निदर्शक असा शालीवाहन शक, महंमद पैगंबराच्या मक्केंतील पलायनापासून मोजला जाणारा (इ. स. ६२२ पासून सुरू होणारा) हिजरी सन, येशू ख्रिस्ताच्या नामकरण दिवसापासून मोजला जाणारा ख्रिस्ती लोकांचा इसवी सन, इत्यादि गोष्टींची आपण माहिती मिळविली पाहिजे. वर्षप्रतिपदेपासून हिंदु कालगणनेनुसार नव्या वर्षास प्रारंभ होत असल्यामुळें या दिवशीं हिंदु कालगणनेबद्दल व हिंदु पंचांगाबद्दल विशेष माहिती मिळवणेंहि सयुक्तिक होईल.

**सौर व चांद्र वर्ष**—वर्ष हें कालगणनेचें आपण मोठ्यांत मोठें प्रमाण मानतों. सूर्याभोंवतीं एक प्रदक्षिणा पुरी करण्याला पृथ्वीस ३६५ दिवस लागतात. ३६५ दिवसांच्या या काळाला सौर वर्ष असें म्हणतात. सौर वर्ष हें पृथ्वीला सूर्याभोंवतीं प्रदक्षिणा पुरी करण्यास लागणाऱ्या काळावरून ठरविलें जातें. त्याचप्रमाणें चंद्रास पृथ्वीभोंवतीं प्रदक्षिणा करण्यास जो काळ लागतो त्यावरून चांद्र वर्ष ठरवितात. चांद्रवर्ष ३५४ दिवसांचें असतें. म्हणजे सौर वर्षापेक्षां तें ११ दिवसांनीं कमी असतें. सौर व चांद्र वर्षांतील हा फरक काढून टाकण्यासाठीं चांद्र वर्षानुसार कालगणना करीत असतांना दर ३ वर्षांनीं एक अधिक मास धरतात व अशा रीतीनें चांद्रवर्षाचा सौर वर्षाशीं मेळ घालतात.

हिंदु पंचांगांत तिथि, वार, नक्षत्र, योग व करण या पांच अंगांचा समावेश होतो.

**तिथि**—पृथ्वीभोंवतीं एक प्रदक्षिणा पुरी करण्यास चंद्रास ३० दिवस लागतात. म्हणजे ३० दिवसांत चंद्र एक वर्तुळ पुरें करतो. याप्रमाणें चंद्राला ३६० अंशांतून फिरावयास ३० दिवस लागतात हें आपणास समजतें. म्हणजे १२ अंश फिरावयास चंद्राला एक दिवस लागतो. चंद्राला १२ अंशांतून फिरण्यास हा जो काळ लागतो त्यास तिथि असें म्हणतात. अशा ३० तिथींचा एक चांद्रमास होतो. त्यांत शुक्ल पक्षाच्या १५ तिथि

व कृष्ण पक्षाच्या १५ तिथि असतात. शुक्ल पक्षांतील १५ व्या तिथीस पौर्णिमा असें म्हणतात व कृष्ण पक्षांतील १५ व्या तिथीस अमावास्या (अमा-एकत्र; वस-राहणें) म्हणतात. या तिथीस चंद्र व सूर्य एकत्र असतात. त्यामुळें चंद्राचा उजेड आपणांस पृथ्वीवर दिसत नाहीं. याच्या उलट पौर्णिमेला चंद्र हा पृथ्वीच्या भोंवतालच्या वर्तुळाच्या निम्यावर (१८०° वर) असल्यानें आपणास पृथ्वीवर चंद्राचें पूर्ण बिंब पाहावयास मिळतें.

**वार व होरा**–एकदां सूर्योदय झाल्यापासून तों दुसऱ्यांदा सूर्योदय होईपर्यंतच्या काळास वार असें म्हणतात. असे वार एकूण सात आहेत. सोम, मंगळ, बुध, गुरु, शुक्र, शनि व रवि अशीं त्यांचीं अनुक्रमें नांवें होत. जगांतील सर्व कालमानपद्धतीमध्यें या वारांच्या बाबतींत आपणांस एकवाक्यता दिसून येते. एका वाराचे एकंदर २४ भाग कल्पितात. त्यांपैकीं प्रत्येक भागास कालहोरा असें म्हणतात. म्हणजे सामान्यतः एका तासाला एक होरा होतो. असे कालहोरे एकंदर सातच आहेत. त्यांचीं नांवें अनुक्रमें शनि, गुरु, मंगळ, रवि, शुक्र, बुध व चंद्र अशीं आहेत. याच क्रमानें ते दिवसाच्या २४ तासांतून येत असतात. कालहोऱ्यांचा हा क्रम पृथ्वीपासूनच्या त्या त्या ग्रहांच्या अंतरावरून ठरविण्यांत आला आहे. याप्रमाणें शनि हा ग्रह पृथ्वीपासून सर्वांत लांब असून चंद्र हा पृथ्वीस सर्वांत जवळ आहे. दिवसाच्या आरंभींचा होरा हा त्या वाराच्या नांवाचा असतो. व तेथून पुढें हे होरे क्रमानें मोजले जातात.

**नक्षत्रें**—पृथ्वीवर प्रवास करीत असतांना आपण किती मैल चाललों, कोणत्या दिशेनें चाललों वगैरे माहिती समजण्याकरितां जागजागीं मैलांचे दगड रोवल्याचें व निरनिराळया दिशादर्शक पाट्या लावल्याचें आपण पाहतों. त्याचप्रमाणें अंतरीक्षांतील दिशा दर्शविण्यासाठीं व कालमानें समजण्यासाठीं कांहीं स्थिर तारकासमूहांचा उपयोग होतो. या स्थिर

तारकासमूहांस नक्षत्रें असें म्हणतात. हीं नक्षत्रें आपल्या जागेवरून हालत नाहींत. प्राचीन काळीं कालमापनासाठीं व निरनिराळे ऋतु समजण्यासाठीं या नक्षत्रांचा फार उपयोग केला जाई. पृथ्वी व इतर ग्रह सूर्याभोंवतीं प्रदक्षिणा घालतात. त्या मार्गावर कांहीं विशिष्ट आकाराचीं नक्षत्रें आढळून येतात. त्यांच्या या विशिष्ट आकारावरून त्यांना निरनिराळीं नांवें देण्यांत आलीं आहेत. अशीं नक्षत्रें एकंदर २७ आहेत व त्यांचीं नांवें अनुक्रमें अश्विनी, भरणी, कृत्तिका, रोहिणी, मृगशीर्ष, आर्द्रा, पुनर्वसु, पुष्य, आश्लेषा, मघा, पूर्वा फाल्गुनी, उत्तरा फाल्गुनी, हस्त, चित्रा, स्वाती, विशाखा, अनुराधा, ज्येष्ठा, मूळ, पूर्वाषाढा, उत्तराषाढा, श्रवण, धनिष्ठा, शततारका, पूर्वा भाद्रपदा, उत्तरा भाद्रपदा व रेवती अशीं आहेत. या २७ नक्षत्रांची विभागणी १२ राशींत केली आहे. म्हणजे प्रत्येक राशींत २। नक्षत्रें येतात. मेष, वृषभ, मिथुन, कर्क, सिंह, कन्या, तूळ, वृश्चिक, धन, मकर, कुंभ व मीन अशीं या राशींचीं नांवें आहेत. याच क्रमानें वर्षांतून या १२ राशी येत असतात. या १२ राशींतून सूर्य १२ महिन्यांत आपलें परिभ्रमण पुरें करतो. म्हणजे सूर्य प्रत्येक महिन्याला एक रास ओलांडतो. या क्रियेस संक्रमण अथवा संक्रांत असें म्हणतात. याप्रमाणें प्रत्येक वर्षी १२ संक्रांती होतात. सूर्य मीन राशींत आला कीं चैत्र महिन्यास सुरुवात होते व वर्षारंभ होतो.

नक्षत्रांच्या नांवावरून महिन्यांचीं नांवें दिलीं आहेत. ज्या नक्षत्रांच्या नांवावरून महिन्यास नांवें प्राप्त झालीं आहेत त्यांस मासनक्षत्रें असें म्हणतात. पौर्णिमेच्या रात्रीं चंद्राबरोबर जें नक्षत्र उगवतें त्याचें नांव त्या त्या महिन्यास देतात. याप्रमाणें पौर्णिमेच्या चंद्राबरोबर चित्रा नक्षत्र उगवलें कीं चैत्र महिना सुरू होतो.

**योग**—पृथ्वीला सूर्याभोंवतीं प्रदक्षिणा पुरी करण्यास ३६५ दिवस लागतात. म्हणजे ३६५ दिवसांत पृथ्वी ३६० अंशांतून फिरते. याप्रमाणें

पृथ्वीस एका अंशांतून फिरण्यास सुमारें एक दिवस लागतो. पृथ्वी ही सूर्या-भोंवतीं फिरत असली तरी आपणांस सूर्यच पृथ्वीभोवतीं फिरत असल्या-सारखा दिसतो. त्यामुळें पृथ्वीच्या या गतीस आपण सूर्याची गति असें मानतों व त्याप्रमाणें १ दिवसांत सूर्य १ अंशांतून फिरतो असें आपण म्हणतों. एका दिवसांत सूर्य ज्याप्रमाणें एका अंशांतून फिरतो त्याचप्रमाणें चंद्र हा पृथ्वीभोंवतीं एका दिवसांत १२ अंश फिरतो. चंद्रसूर्याच्या या दैनिक गतींची बेरीज १२°+१°=१३°, म्हणजे सुमारें ८०० कला भरते, ( ६० प्रतिविकला = १ विकला; ६० विकला = १ कला; ६० कला = १° ) या काळास योग असें म्हणतात. असे योग वर्षामध्यें एकूण २७ येतात. त्यांपैकीं आयुष्यमान, सौभाग्य, शोभन, वृद्धि, सिद्धि, सिद्ध, साध्य व शुभ हे योग शुभ मानतात.

**करण**—तिथीच्या अर्ध्या भागास करण असें म्हणतात. चंद्राच्या पृथ्वीभोंवतीं फिरण्याच्या गतीवरून तिथि ठरतात. चंद्रास १२ अंशांतून फिरावयास जो काळ लागतो त्यास तिथि म्हणतात. याप्रमाणें चंद्रास ६ अंशांतून फिरावयास लागणाऱ्या काळास करण असें म्हणतात.

हिंदु पंचांगाची ही माहिती आपण वर्षप्रतिपदेच्या निमित्तानें मुलां-समोर ठेवणें अत्यंत आवश्यक आहे. त्यावरून खगोलशास्त्राच्या अध्य-यनाबद्दल त्यांच्या मनांत उत्कंठा निर्माण होईल व कालमापनाच्या पूर्वा-पार चालत आलेल्या पद्धतींचें यथायोग्य ज्ञान होईल. अशा प्रकारें गुढी-पाडव्याच्या दिवशीं विविध प्रकारचें ज्ञान दिल्यास मुलांना या दिवसाचें महत्त्व अधिक पटेल. गुढीपाडव्याचा मुहूर्त अत्यंत शुभ मानला जातो. हिंदु लोक ३॥ शुभ मुहूर्त मानतात. त्यांपैकीं गुढीपाडव्याचा एक शुभ मुहूर्त आहे. अशा या शुभ मुहूर्तावर आपण आपल्या सामाजिक कार्याचा संकल्प केल्यास आपण खऱ्या अर्थानें गुढीपाडवा साजरा केला असें होईल.

## समवाय

१. गुढी पाडव्यासंबंधींच्या प्रचलित कथा सांगा.

२. सौरवर्ष व चांद्रवर्ष यांची माहिती देऊन कालगणनांचे वेगवेगळे प्रकार सांगा.

३. नक्षत्रें, तिथि, वार, इत्यादींचा व पृथ्वीच्या व चंद्राच्या गतींचा विशेष अभ्यास करा.

४. मागील वर्षी केलेल्या कार्यांचा आढावा घेऊन नव्या वर्षांत हातीं घ्यावयाच्या कामांचें अंदाजपत्रक तयार करा व त्याप्रमाणें तीं कामें पार पाडण्याच्या योजना आखा.

५. शारीरिक शिक्षणाचें महत्त्व पटवून देऊन शरीरप्रकृति निरोगी राखण्यास कोणकोणत्या गोष्टींची व कशी आवश्यकता आहे तें पटवून द्या.

६. वसंत ऋतूचें वर्णन करा. वसंत ऋतूत होणाऱ्या उत्सवांसंबंधीं गोड पत्रें व निबंध लिहून घ्या.

७. गुढी पाडव्याच्या सणाबद्दलचीं गाणीं शिकवा.

---




प्रभु रामचंद्रांचें नांव कोणास माहीत नाहीं? हिंदु लोक प्रभु रामचंद्रांस श्रीविष्णूचा अवतार मानतात व त्यांची भक्तिभावानें पूजा करतात. प्रभु रामचंद्रांच्या चरित्रावर वाल्मीकि ऋषींनीं 'रामायण' नांवाचें एक महाकाव्य रचलें आहे. हिंदु लोक या रामायणाचें घरोघर पारायण करतात. रामायणांतील काव्याची गोडी अपूर्व आहे. त्याचप्रमाणें त्यांत प्रतिबिंबित झालेल्या प्रभु रामचंद्रांच्या चरित्राची गोडीहि अवीट आहे. प्रभु रामचंद्रांचें जीवन आदर्श असें होतें. शौर्य, धैर्य, सात्त्विकता, तत्त्वनिष्ठा, त्याग व प्रेम इत्यादि अनेक गुणांमुळें प्रभु रामचंद्रांस आपण परमेश्वरी अवतार मानतों. प्रभु रामचंद्रांनीं आपल्या आयुष्यांत दुर्जनांचा संहार करून पृथ्वीवर सुखाचें साम्राज्य उभविलें. प्रभु रामचंद्रांच्या राज्यांतील या आबादानीमुळें सुख-समृद्धिकारक शासनसंस्थेस आपण 'रामराज्य' असें म्हणतों. असें रामराज्य आपल्या भारतांत पुन्हां प्रस्थापित करावें यासाठीं आपल्या देशांतील थोर पुढारी महात्मा गांधी यांचा

आत्मा सदैव तळमळत असे. यावरून प्रभु रामचंद्रांच्या जीवनचरित्राचा व कर्तृत्वाचा प्रभाव भारतीय जनमनावर किती पडला आहे याची आपणांस स्पष्ट कल्पना येते. प्रभु रामचंद्रांच्या उज्ज्वल कर्तृत्वाची व निर्मळ जीवनाची आठवण करण्याकरितां हिंदु लोक रामनवमीचा उत्सव साजरा करतात.

सुमार चार हजार वर्षांपूर्वी आपल्या भारतांत प्रभु रामचंद्रांचा अवतार झाला. त्या काळीं आर्य लोकांनीं पंजाब प्रांतांत व गंगा आणि यमुना या नद्यांच्या कांठीं आपल्या वसाहती स्थापन केल्या होत्या. या भागांत त्यांचीं अनेक कुळें सुख-समृद्धीचें जीवन कंठीत होतीं. त्यांचीं मोठमोठालीं राज्यें स्थापन झालीं होतीं. अयोध्या, मिथिला, विदेह, काशी इत्यादि राज्यें त्या काळांत ऐश्वर्याच्या शिखरावर विराजमान झालीं होतीं. अशा काळांत चैत्र शुद्ध नवमीस प्रभु रामचंद्रांचा जन्म झाला.

प्रभु रामचंद्रांची कथा आपणां सर्वांस माहीतच आहे. गंगा व गंडकी या नद्यांच्या दरम्यानच्या प्रदेशांत सूर्यवंशी कोसल राजा दशरथ हा राज्य करीत असे. दशरथास कौसल्या, सुमित्रा व कैकेयी अशा तीन बायका होत्या. त्यांपासून त्यास राम, लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न असे चार मुलगे झाले. त्यांपैकीं प्रभु रामचंद्रांनीं कौसल्या राणीच्या पोटीं जन्म घेतला. सुमित्रेस लक्ष्मण व शत्रुघ्न असे दोन पुत्र झाले व कैकेयीनें भरतास जन्म दिला. बाळपणापासूनच या चौघां भावांचें एकमेकांवर निरतिशय प्रेम होतें. आपल्या पुत्रांच्या बाललीला पाहून दशरथाचें अंतःकरण प्रेमानें भरून जाई. त्या वेळीं सर्व अयोध्या नगरींतील आनंद जणुं या चार मुलांच्या चिमुकल्या मुठींत सामावला होता!

त्या काळीं आर्य लोक यज्ञयाग करीत. ऋषीमुनी तपाचरण करीत. या सर्वांना अनार्य लोकांपासून बराच त्रास होई. अनार्य लोक आर्यांचीं गुरें पळवीत, त्यांच्या यज्ञयागांत विघ्नें आणीत, त्यांच्या बायका पळवीत

व त्यांना अनेक प्रकारें त्रास देत. अशा प्रसंगीं आर्यांच्या कुलांचें संरक्षण करण्याची जबाबदारी क्षत्रियांवर असे. क्षत्रिय लोक प्रजेचें संरक्षण करून तिचें पालन करीत. अर्थातच ही जबाबदारी दशरथ राजावरहि असे. एकदां विश्वामित्र ऋषींनीं यज्ञास आरंभ केला. त्यांच्या यज्ञांत अनार्यांनीं अनेक अडथळे आणले. हें पाहून यज्ञाचें संरक्षण करण्यासाठीं विश्वामित्र ऋषींनीं दशरथ राजाजवळ प्रभु रामचंद्रांची मागणी केली. दशरथ राजानें ती मान्य केली. प्रभु रामचंद्रांनीं अनार्यांचा निःपात करून विश्वामित्र ऋषींचा यज्ञ निर्वेधपणें पार पाडला. त्या वेळीं प्रभु रामचंद्रांचा पराक्रम पाहून विश्वामित्र ऋषि संतुष्ट झाले. त्यांनीं प्रभु रामचंद्रांस आर्य लोकांच्या स्थितीचें दर्शन घडवून दिलें. अनार्यांच्या अनीतिकारक वर्तनाची त्यांस ओळख करून दिली. शूर्पणखा साऱ्या देशाला कशी ओरबाडते आहे हें सांगितलें. कुंभकर्ण हा प्रजेला कसा गिळून टाकीत आहे याची ओळख करून दिली. रावण आपल्या दशविध खात्यांच्या मार्फत प्रजेवर कसा जुलूम करीत आहे याची खात्री पटवून दिली. त्यामुळें प्रभु रामचंद्रांच्या मनांत दुष्टांचें दमन करण्याची भावना निर्माण झाली. विश्वामित्र ऋषींनीं हें फार मोठें कार्य केलें. त्यामुळें रामचंद्रांच्या पराक्रमास अपूर्व तेज चढलें.

विश्वामित्र ऋषींचा निरोप घेऊन प्रभु रामचंद्र परत जाण्यास निघाले. त्या वेळीं विदेह देशाचा राजा जनक यानें आपली कन्या सीता हिचें स्वयं-वर मांडलें असल्याचें त्यांना समजलें. प्रभु रामचंद्र सीतास्वयंवरासाठीं मिथिला नगरीस गेले. तेथें त्यांनीं शिवधनुर्भंग करून सीतास्वयंवराचा पण जिंकला. सुकुमार सीतेनें प्रभु रामचंद्रांच्या गळयांत माळ घातली. सीता-रामाचा जोडा मग अयोध्या नगरीस आला. सर्वत्र आनंदी आनंद झाला.

याच सुमारास दशरथ राजानें प्रभु रामचंद्रांना युवराज्याभिषेक कर-ण्याचें ठरविलें. अयोध्या नगरींत युवराज्याभिषेकाची तयारी मोठ्या जोरांत सुरू झाली. सगळीकडे मंगलमय वातावरण पसरलें. परंतु आयत्या वेळीं

कैकेयीनें अवसानघात केला. प्रभु रामचंद्रांस राज्य मिळाल्यास आपल्या भरताची मग काय वाट, असा स्वार्थी विचार तिच्या मनांत आला. प्रभु रामचंद्रांस युवराज्याभिषेक होऊं नये यासाठीं तिनें आकाशपाताळ एक केलें. राजा दशरथानें तिची अनेक रीतीनें समजूत घालण्याचा प्रयत्न केला. पण व्यर्थ ! कैकेयी आपला हट्ट सोडीना ! पूर्वीं एकदा दशरथ राजा संकटांत सांपडला असतांना तिनें त्यास मदत केली होती. त्या वेळीं दशरथानें संतुष्ट होऊन तिला तीन वर दिले होते. कैकेयीनें दशरथास त्या प्रसंगाची आठवण करून दिली व 'रामास चौदा वर्षें वनवासास पाठवावें व भरतास राज्यपद द्यावें' असा हट्ट धरला. प्रभु रामचंद्रांच्या कानीं ही बातमी गेली. त्यांनीं आपल्या पित्याचें वचन खरं करण्यासाठीं व मातेची इच्छा पुरी करण्यासाठीं वनवासाला निघण्याची तयारी केली. प्रभु रामचंद्रांबरोबर सीतामाई व लक्ष्मणहि निघाले. तें पाहून दशरथ राजास परम दुःख झालें. पुढें पुत्रशोकानें त्याचा अंत झाला.

या वेळीं भरत आपल्या आजोळीं गेला होता. अयोध्येस परत येत असतांना त्यास वाटेंतच हा सर्व प्रकार समजला. प्रभु रामचंद्रांवर भरताचें निस्सीम प्रेम होतें. आपल्या सुखासाठीं आपल्या आईनें आपल्या पितृतुल्य बंधूस वनवासाला पाठवावें या विचारानें त्यास अतोनात दुःख झालें. त्यानें कैकेयीची निर्भर्त्सना केली व प्रभु रामचंद्रांस अयोध्येस परत आणण्यासाठीं अरण्याची वाट धरली. थोड्याच वेळांत त्यानें प्रभु रामचंद्रांची भेट घेतली व त्यांना अयोध्येस परत येण्याबद्दल कळकळून विनविलें. परंतु एकवचनी रामचंद्रांनीं त्यास अयोध्येस जाऊन सुखानें राज्य करण्याबद्दल आशीर्वाद दिला. तेव्हां भरतानें प्रभु रामचंद्रांकडून त्यांच्या पादुका मागून घेतल्या व त्या पादुकांना सिंहासनावर अधिष्ठित करून त्यानें अयोध्येचा राज्यकारभार हाकला.

इकडे प्रभु रामचंद्रांचा वनवास सुरू झाला. प्रथम कांहीं दिवस ते भारद्वाज ऋषींच्या आश्रमांत राहिले. तेथून ते प्रयाग येथें गेले. त्यानंतर कांहीं

दिवस त्यांनीं चित्रकूट पर्वतावर वास्तव्य केलें. व नंतरचा सर्व काळ ते गोदावरी नदीच्या तीरावरील पंचवटींत येऊन राहिले. त्या काळीं या भागांत घनदाट अरण्य माजलें होतें. त्यास दंडकारण्य असें म्हणत. या दंड-कारण्यांत आर्य लोकांच्या वसाहती झाल्या नव्हत्या. तेथें अनार्य लोक राहात. त्यांना राक्षस असें म्हणत. ते नरमांस देखील भक्षण करीत. त्यामुळें दंडकारण्यांत असतांना प्रभु रामचंद्र, लक्ष्मण व सीतामाई यांचें जीवन किती धोक्याचें होतें याची आपणांस कल्पना येईल. शिवाय या अरण्यांत अनेक श्वापदेंहि असत. त्यांच्या तडाख्यांतून सुटतां सुटतां प्रभु रामचंद्रांना किती कष्ट पडले असतील त्याची आपण कल्पनाच करावी! याच अरण्यांत वानर नांवाचे लोकहि राहात. वानर लोक रानटीच होते. परंतु राक्षसांच्या मानानें ते बरेच सात्त्विक वृत्तीचे होते. याशिवाय पक्ष्यांप्रमाणें स्वतःचें अंग रंगविणारे कांहीं लोकहि येथें राहात असत. जटायु हा त्यांतीलच एक होय. या लोकांचा प्रभु रामचंद्रांस पुढें फार उपयोग झाला.

गोदावरीतीरावरील रम्य वनश्री पाहून प्रभु रामचंद्रांचा जीव आल्हादून जाई. रानांतील कंदमुळें व फळें गोळा करून त्यांचें सेवन करावें, नितळ झऱ्याचें पाणी प्यावें, सीतामाई व लक्ष्मण यांच्याबरोबर चार सुखकारक गोष्टी कराव्या व अधूनमधून उपद्रव देणाऱ्या राक्षसांना आपल्या अचूक बाणानें ठार करावें असें त्या वेळचें प्रभु रामचंद्रांचें जीवन होतें. एकदां शूर्पणखा नांवाच्या राक्षसीनें मायावी रूप धारण करून प्रभु रामचंद्रांना ठार करण्याचा प्रयत्न केला. परंतु शूर्पणखेचे मायावी रूप लक्ष्मणाच्या ध्यानीं येतांच त्यांनीं तिचें नाक-कान कापून तिला हाकलून लाविलें.

या वेळीं लंकेस रावण नांवाचा राजा राज्य करीत होता. सीतास्वयं-वराच्या वेळीं त्याचा अपमान झाल्यामुळें त्यानें सीतेस हरण करून नेण्याचा चंग बांधला होता. सीतेचें हरण करण्यासाठीं तो मारीच राक्षसास बरोबर

घेऊन आला. मारीचानें कांचनमृगाचें मायावी रूप धारण केलें. त्याला पाहून सीतेला फार संतोष झाला. त्या वेळीं प्रभु रामचंद्र अरण्यांत कंदमुळें आणण्याकरितां गेले होते व सीतामाईच्या सोबतीला फक्त लक्ष्मण होता. सीतामाईनीं त्या कांचनमृगास पकडण्याबद्दल लक्ष्मणाजवळ आग्रह धरला. मोठ्या नाखुषीनें लक्ष्मण त्या मायावी कांचनमृगाचा पाठलाग करूं लागला. इतक्यांत इकडे रावणानें एका गोसाव्याचें रूप धारण केलें व सीतामाईच्या पर्णकुटीच्या दाराशीं तो भिक्षा मागण्यासाठीं उभा ठाकला. सीतामाई भिक्षा घालण्यासाठीं आपल्या पर्णकुटीच्या बाहेर आल्या. त्यांना खांद्यावर घालून रावणानें पळवून नेलें. सीताहरण झाल्याचें आढळून येतांच राम–लक्ष्मणांना पराकोटीचें दुःख झालें. त्यांनीं सर्व अरण्य पालथें घालून सीतेचा शोध केला. पण त्यांना सीतेचा शोध लागला नाहीं. वाटेंत त्यांना जटायु भेटला. तेव्हां त्यानें रावणानें सीताहरण केलें असल्याची बातमी दिली. प्रभु रामचंद्रांनीं रावणावर स्वारी करण्याचें ठरविलें. त्यांनीं पराक्रमी वानरांचें सैन्य उभारलें. महापराक्रमी हनुमान त्यांचा एकनिष्ठ सेवक बनला. नळ, नीळ, जांबुवंत, सुग्रीव, हनुमान इत्यादि वीरांसहित रामानें लंकेवर स्वारी केली. हनुमंतानें लंका जाळली. रामानें रावणाचा पराभव करून त्याचा वध केला व सीतेची सुटका केली. चैत्र शुद्ध प्रतिपदेस आपला १४ वर्षांचा वनवास संपवून प्रभु रामचंद्र अयोध्येस परत आले. त्या वेळीं अयोध्येंतील नागरिकांनीं मोठा आनंदोत्सव साजरा केला.

या वेळेपासून रामराज्यास सुरवात झाली. प्रभु रामचंद्र प्रजेच्या कल्याणासाठीं अत्यंत झटत असत. रघुकुलांतील अज, दिलीप व दशरथ यांनीं आतांपर्यंत प्रजेच्या कल्याणाची सतत काळजी वाहिली होती. त्यामुळें त्यांच्या राज्यांत सर्वत्र सुख व समृद्धी नांदत असे. तथापि प्रभु रामचंद्रांनीं रावणासारख्या दुष्ट राक्षसांचा नायनाट केल्यामुळें त्यांच्या राज्यांतील प्रजा अधिक निर्भय व सुखी झाली. या काळीं राजा हा

लोकांच्या मतानुसार आपला राज्यकारभार हाकीत असे. त्यामुळें सीतेच्या पावित्र्याबद्दल अयोध्येंतील एका नागरिकानें शंका घेतांच प्रभु रामचंद्रांनीं तिचा त्याग केला. या वेळीं सीतामाई गरोदर होत्या. प्रभु रामचंद्रांनीं त्याग केल्यानंतर त्या वाल्मीकि ऋषीच्या आश्रमांत येऊन राहिल्या. येथें असतांना त्यांना लव व कुश असे दोन पुत्र झाले. प्रभु रामचंद्रांप्रमाणेंच ते महापराक्रमी निपजले. ते धनुर्विद्येंत पारंगत झाले. पुढें प्रभु रामचंद्रांनीं अश्वमेध यज्ञ सुरू केला. त्या वेळीं लवकुशांनीं अश्वमेधाचा घोडा अड-विला व आपल्या पराक्रमानें प्रभु रामचंद्रांस चकित करून सोडलें. शेवटीं लव आणि कुश हे आपलेच पुत्र आहेत ही गोष्ट प्रभु रामचंद्रांस समजली, तेव्हां त्यांच्या आनंदास सीमा उरली नाहीं. त्यांनीं वाल्मीकि ऋषींच्या आश्रमांत जाऊन सीतामाईची गांठ घेतली. तेव्हां सीतामाईनीं धरणी-मातेची करुणा भाकून तिला विनविलें, "हे माते, मी जर निष्कलंक असेन तर तूं मला आपल्या पोटांत घे!" सीतामाईचे हे शब्द बाहेर पडतांच धरणी दुभंगली व तिनें सीतामाईस आपल्या पोटांत आसरा दिला.

सीतामाईच्या विरहामुळें प्रभु रामचंद्र अत्यंत व्यथित झाले. नंतर ते आपल्या पराक्रमी पुत्रांना घेऊन अयोध्येस गेले. तेथें त्यांनीं अनेक वर्षें राज्य केल्यानंतर अखेरीस शरयू नदींत देहार्पण केलें.

प्रभु रामचंद्रांच्या जीवनाची ही कथा अत्यंत मधुर आहे. रामनवमीच्या उत्सवाच्या निमित्तानें या कथेचें स्मरण व पारायण करणें अत्यंत आव-श्यक आहे. त्याचप्रमाणें या दिवशीं रामजन्माच्या कथेचें पठण करीत असतांना आर्य लोकांच्या तत्कालीन जीवनाच्या इतिहासाचेंहि अध्ययन केलें पाहिजे.

आर्य लोक इ. स. च्या सुमारें दोन हजार वर्षांपूर्वीं हिंदुस्थानांत आले. त्यांनीं प्रथम आपल्या वसाहती पंजाब प्रांतांत केल्या. त्यानंतर गंगा व यमुना यांच्या तीरावरील सुपीक भागांत त्यांनीं आपल्या वसाहती स्थापन

केल्या. तेथें त्यांनीं मोठमोठालीं नगरें वसविलीं. राज्यें स्थापन केलीं. या राज्यांचें शासन लोकमतानुसार चालत असे. प्रभु रामचंद्रांस युवराज्याभिषेक करतांना दशरथानें प्रजेची संमति घेतली होती. राजा हा प्रजेचा एक विश्वस्त सेवक आहे अशी त्या वेळची कल्पना होती. तथापि त्याबरोबरच राजा हा परमेश्वरी अंश आहे असेंहि मानलें जात होतें. आर्यांची राज्यव्यवस्था चोख असे. राज्यव्यवस्थेसाठीं निरनिराळीं खातीं पाडून त्यांजवर त्या त्या जबाबदाऱ्या सोंपविल्या जात असत. रामायणकाळांतील प्रजा सुखी होती. सामान्यतः धनधान्याची सर्वत्र समृद्धि होती. दूधदुभत्याची रेलचेल होती.

या काळीं समाजांत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र असे चार वर्ण प्रस्थापित झाले होते. ब्राह्मण वेदविद्येचें अध्ययन करून धर्मकर्में करीत. क्षत्रिय लोक समरभूमीवर शत्रूंशीं झुंज देऊन प्रजेचें संरक्षण व पालन करीत. वैश्य लोक शेती व व्यापार उदीम करून देश समृद्ध बनविण्यास हातभार लावीत व शूद्र लोक त्रैवर्णिकांची सेवाचाकरी करीत. वर्णव्यवस्थेप्रमाणेंच या काळांत आश्रमव्यवस्थाहि रूढ झाली होती. ब्रह्मचर्याश्रम, गृहस्थाश्रम, वानप्रस्थाश्रम, संन्यासाश्रम या चार भागांत मानवी जीवनाची विभागणी केली होती. वयाच्या पंचविसाव्या वर्षापर्यंतच्या काळांत मुलें ब्रह्मचर्याच्या व्रताचें पालन करून विद्याभ्यास करीत. हें विद्याभ्यासाचें कार्य पहिल्या तीन वर्णांतील मुलें करीत. शास्त्र, कला, शस्त्रास्त्रविद्या, निरनिराळ्या प्रकारचे धंदे इत्यादींचें शिक्षण त्या त्या वर्णांतील मुलें आपापल्या वर्णानुसार घेत. या काळांत वंशपरंपरागत आलेले धंदे त्या त्या कुटुंबांत स्थिर झाले होते. ब्रह्मचर्याश्रमानंतरच्या पंचवीस वर्षांच्या काळांत आर्य तरुण विवाहबद्ध होऊन गृहस्थाश्रम स्वीकारीत. अशा रीतीनें पंचवीस वर्षें संसार केल्यानंतर ते पुढील पंचवीस वर्षें वनांत राहून परमेश्वरचिंतन करीत. या काळास वानप्रस्थाश्रम असें म्हणतात. वानप्रस्थाश्रमा-

नंतरचा पंचवीस वर्षांचा काळ संन्यासाश्रमाचा होय. या काळांत सर्वसंग-परित्याग करून आर्यपुत्र परमेश्वराची आराधना करीत. आर्यांची ही आश्रम-व्यवस्था आदर्श अशीच असून रामायणांत त्यासंबंधींचे उत्कृष्ट उल्लेख सांपडतात.

आर्यांची समाजव्यवस्थाहि अशीच आदर्श असे. प्रत्येक कुटुंबांतील थोर पुरुष हा गृहपति या नात्यानें आपली जबाबदारी नीट रीतीनें पार पाडीत असे. गृहपत्नी आपल्या घरगुती कामधंद्यांत निमग्न असे. ती आपल्या पतीला देव मानून त्याची अनन्यभावें सेवा करी. त्याच्या आज्ञेंत राहात असे. सीतामाईचें जीवन हें तात्कालीन आर्य स्त्रीचें आदर्श जीवनच आहे. सामान्यतः स्त्रियांना कुटुंबांत बराच मान असे. त्यांपैकीं कांहीं स्त्रिया विद्यार्जनदेखील करीत. नृत्य, वाद्य, संगीत इत्यादि कलांत त्या निष्णात असत. पुरुषांच्या अंगच्या शौर्यधैर्यादि गुणांवर त्या निरतिशय लुब्ध होत. अशा पराक्रमी पुरुषांशीं त्या स्वयंवरपद्धतीनें विवाहबद्ध होत. याशिवाय अनेक प्रकारच्या विवाहपद्धतीहि या काळीं रूढ होत्या. स्त्रियांचें अपहरण करून त्यांच्याशीं जबरदस्तीनें विवाह करण्याच्या प्रथेस 'राक्षस विवाह' असें म्हणत. त्या काळीं पुरुषांनीं अनेक विवाह करण्याची प्रथा होती. पडदापद्धतीसारख्या अनिष्ट चाली मात्र या काळांत रूढ नव्हत्या. विधवा स्त्रियांना समाजांत फारशी मानमान्यता नसे.

या काळीं आर्य लोकांत निरनिराळ्या जाती निर्माण होऊं लागल्या होत्या. एका वर्णांतील पुरुषानें कनिष्ठ वर्णांतील स्त्रीशीं विवाह केला म्हणजे त्यापासून होणाऱ्या प्रजेची वेगळी जात मानली जात असे. याप्रमाणें या काळांत सूत, निषाद, दस्यू, चांडाळ अशा अनेक जाती निर्माण झाल्या. शिवाय धंद्यांवरून जाती ओळखण्याचाहि या काळांत प्रघात होता. सीतेच्या पावित्र्याबद्दल शंका घेणारा अयोध्येचा नागरिक जातीनें परीट होता. अशा रीतीनें जातिभेदाच्या अनिष्ट प्रथेचें बीजारोपण या काळांत झालेलें दिसतें. त्याचप्रमाणें मद्यपान, द्यूत खेळणें इत्यादि वाईट चालीहि या काळांत रूढ होत्या असें दिसतें.

रामायणकालांतील नैतिक जीवन नमुनेदार असे. तत्कालीन लोकांच्या मनांत श्रेष्ठ पुरुषांबद्दल नितांत आदर असे. गुरु, आई, वडील व श्रेष्ठ पुरुष यांच्या आज्ञेचा कधीं अवमान होत नसे. प्रभु रामचंद्र, लक्ष्मण, सीता व हनुमान या सर्वांचें जीवन या दृष्टीनें अत्यंत आदर्श असेंच आहे. शिवाय दिल्या वचनाला जागणें, वचनाची पूर्तता करणें, अंगिकारलेल्या व्रताचें एकनिष्ठेनें पालन करणें इत्यादि थोर गुणांचा या काळांत बराच विकास झालेला होता.

प्रभु रामचंद्रांचा जन्मोत्सव साजरा करीत असतांना या सर्व गोष्टींचें आपण स्मरण केलें पाहिजे व त्यापासून आपलें नैतिक जीवन विकसित करण्याची स्फूर्ति घेतली पाहिजे. प्रभु रामचंद्रांना आपण भगवान् श्रीविष्णूचा अवतार मानतों. त्यामुळें रामनवमीचा उत्सव श्रीविष्णूच्या देवळांत साजरा केला जातो. चैत्र शु. ९ स माध्यान्हीं प्रभु रामचंद्रांचा जन्म झाला म्हणून त्या वेळीं श्रीविष्णूच्या देवळांत बाळरामाला पाळण्यांत घालून भजन–कीर्तन करतात. मंगलमय चिन्हांनीं पाळण्याची आरास करतात. भक्तिभावानें प्रभु रामचंद्रांचें गुणसंकीर्तन करतात. प्रभु रामचंद्रांचा जन्म होईपर्यंत या दिवशीं स्त्री–पुरुष उपवास करतात. राम-जन्मोत्सवाचा हा सोहळा बऱ्याच ठिकाणीं चैत्र शुद्ध प्रतिपदेस सुरू होऊन रामनवमीस समाप्त होतो. या काळांत लोक रामायणाचें श्रवण करतात.

प्रभु रामचंद्रांची भक्तमालिका फार मोठी आहे. तींत मध्वाचार्य, नरहरतीर्थ, रामानंद, कबीर, तुलशीदास, रामदास इत्यादि थोर संतांचा समावेश होतो. समर्थ रामदासांनीं महाराष्ट्रांत रामभक्तीचा बराच प्रसार केला. हिंदु–मुसलमानांचें ऐक्य घडवून आणण्याचा प्रयत्न करणाऱ्या कबीरांनीं राम व रहीम यांतील द्वैत काढून टाकलें. महात्मा गांधींसारखे थोर पुरुष देखील 'रघुपति राघव राजाराम' या भजनानें आपली सायं-प्रार्थना पुरी करीत. रामभक्तीचा महिमा असा अगाध आहे!

## समवाय

१. आर्यांचें हिंदुस्थानांत आगमन व त्यांच्या उत्तर हिंदुस्थानांतील वसाहती यांची माहिती द्या.

२. आर्य व अनार्य यांतील भेद समजावून देऊन अनार्य लोकांच्या जीवनाची ओळख करून द्या. आर्य-अनार्यांच्या झगड्याच्या वास्तव स्वरूपाची रूपरेष समजावून द्या.

३. रामायणकालीन सामाजिक, सांस्कृतिक, धार्मिक व राजकीय जीवनाचें समालोचन करा.

४. रामायणांतील एखाद्या सर्गाचें वाचन करा.

५. रामायण या महाकाव्यासंबंधीं माहिती देऊन त्यांतील कांहीं कथा समजावून द्या व वाल्मीकि ऋषीच्या जीवनाची ओळख करून द्या.

६. कवि सोपानदेव चौधरी यांची ‘ रामनवमी ’ ही कविता वाचा.






आपला भारत हा ऋषि–मुनींचा देश आहे. या देशांत अनेक थोर तत्त्वचिंतक होऊन गेले. त्यांनीं जनतेस आध्यात्मिक ज्ञान देऊन मानवी जीवनांत समता, बंधुभाव, सौजन्य व नीतीचा पुरस्कार केला. वर्धमान महावीर हे अशाच थोर विभूतींपैकीं एक होत. महावीरांनीं आपलीं इंद्रियें जिंकलीं असल्यामुळें त्यांना 'जिन' असें म्हणत. त्यामुळें त्यांनीं प्रसृत केलेल्या धर्मास 'जैन धर्म' असें म्हणतात. जैनधर्मीय लोक आपल्या धर्मास सनातन धर्म मानतात. या धर्मात आजपर्यंत एकंदर चोवीस तीर्थंकर (श्रेष्ठ आत्मे) होऊन गेले. त्यांपैकीं ऋषभनाथ हे पाहिले तीर्थंकर असून वर्धमान महावीर हे चोवीसावे तीर्थंकर होत. वर्धमान महावीरांनीं जैन धर्माचा बराच प्रचार व प्रसार केल्यामुळें त्यांच्या काळापासून या धर्मास वेगळें अस्तित्व प्राप्त झालें. त्यावरून वर्धमान महावीरांच्या कार्याच्या थोरवीची आपणांस कल्पना येईल.

वर्धमान महावीरांचा जन्म इ. स. पूर्वी ५९९ सालीं चैत्र शु. १३ स

झाला. त्यांच्या वडिलांचें नांव सिद्धार्थ व आईचें नांव त्रिशला असें होतें. हल्लीं ज्यास आपण बिहार प्रांत असें म्हणतों त्या प्रांतांत प्राचीन काळीं वैशालीचें राज्य प्रसिद्ध होतें. सिद्धार्थ हे वैशालीच्या राज्यांतील प्रभावी सरदार होते. तत्कालीन राज्यकर्त्यांशीं त्यांचे कांहीं नात्यागोत्याचे संबंधहि होते. अशा रीतीनें क्षात्रकुलांत जन्म घेतल्यामुळें महावीर वास्तविक कुशल सेनानी व्हावयाचे. परंतु तसा योग नव्हता. वयांत आल्यानंतर त्यांचा यशोदा नांवाच्या स्त्रीशीं विवाह झाला. तिच्यापासून त्यांना प्रियदर्शना नांवाची एक मुलगीहि झाली. परंतु महावीरांचें मन संसारांत रमेना. त्यांना सभोंवतालच्या समाजाची दुःस्थिति पाहवेना. त्या काळीं समाजांत जातिभेदाचें अतोनात स्तोम माजलें होतें. अस्पृश्यतेच्या प्रश्नानें भयंकर उग्र रूप धारण केलें होतें. ब्राह्मण लोकांचें समाजांत प्रस्थ फार माजलें होतें. यज्ञयागास ऊत आला होता. यज्ञयागासाठीं पशुहत्या आवश्यक मानली जात होती. बहुजनसमाजास या गोष्टी उमजेनात. तो अज्ञानांत चाचपडत होता. अशा स्थितींत समाजास खऱ्या धर्माचें ज्ञान करून देणें आवश्यक झालें. वर्धमान महावीरांनीं या कामगिरीसाठीं स्वतःस वाहून घेतलें. वयाच्या तिसाव्या वर्षी त्यांनीं संसाराचा त्याग करून अरण्याचा मार्ग धरला. तेथें कित्येक वर्षे त्यांनीं देह कष्टवून घोर तपाचरण केलें. त्यानंतर त्यांना खऱ्या धर्माचें ज्ञान झालें. त्याचा प्रचार करण्यासाठीं ते अनेक स्थळीं गेले. महावीर राजकुलांतील असल्यामुळें त्यांच्या धर्मास राजाश्रयहि मिळाला. वयाच्या ७२ व्या वर्षापर्यंत महावीरांनीं आपलें धर्मप्रचाराचें कार्य केलें. त्यानंतर आश्विन वद्य अमावास्येला पावापूरच्या उद्यानांत ते निर्वाणाप्रत पोहोंचले.

महावीरांनीं प्रसृत केलेल्या जैन धर्माची उभारणी मूळच्या वैदिक धर्मावर झाली आहे. तथापि वैदिक तत्त्वज्ञानांत व जैन तत्त्वज्ञानांत कांहीं भेद आहेत. वर्धमान महावीर परमेश्वर मानीत नसत. त्यांच्या मतें आत्मा हा

सर्वश्रेष्ठ असून तो कर्मांत गुरफटल्यामुळें त्यास संसारांत देवगति, मनुष्य-गति, तिर्यंचगति (पशुपक्ष्यादि) व नरक इत्यादि गती प्राप्त होतात, असें आहे. त्यामुळें आत्म्यास कर्मबंधांतून मुक्त करणें हें माणसाच्या जीविताचें ध्येय आहे असें ते प्रतिपादन करीत. हें ध्येय साध्य करण्या-साठीं माणसानें सम्यक्‌दर्शन, सम्यक्‌ज्ञान व सम्यक्‌चरित्र या गोष्टींचा अवलंब केला पाहिजे अशी त्यांची शिकवण असे. सम्यक्‌दर्शन म्हणजे श्रेष्ठ व आदरणीय पुरुषांबद्दल आदर असणें. असें सम्यक्‌दर्शन झाल्या-खेरीज माणसास श्रेष्ठ माणसाची ओळख पटणार नाहीं. श्रेष्ठ विभूतींची ओळख पटली कीं, सम्यक्‌ज्ञान होणें सुकर जातें. सम्यक्‌ज्ञान म्हणजे वस्तुमात्राचें खरें स्वरूप ओळखण्याची बुद्धि. तें प्राप्त करून घेण्यासाठीं माणसानें आपलें आचरण शुद्ध ठेवलें पाहिजे; म्हणजेच सम्यक्‌चरित्र बनलें पाहिजे. अशा प्रकारें सम्यक्‌चरित्र बनण्यासाठीं महावीरांनीं जैन-धर्मियांस पंचमहाव्रतांचा अंगिकार करण्याचा उपदेश केला आहे. हिंसा करूं नये, असत्य भाषण करूं नये, व्यभिचार करूं नये, चोरी करूं नये व संचय करूं नये अशीं हीं पंचमहाव्रतें होत. या पंचमहाव्रतांचें कसोशीनें पालन करणें हे जैनधर्मियांचें आद्य कर्तव्य आहे असें महावीर प्रतिपादन करीत.

या पंचमहाव्रतांपैकीं अहिंसेच्या व्रताचें पालन मात्र जैनधर्मीय लोक अत्यंत कसोशीनें करतात. आपल्या भारतांतील वंदनीय पुढारी महात्मा गांधी यांनींहि आपल्या उभ्या हयातींत या अहिंसाव्रताचें माहात्म्य पटवून देण्याचा प्रयत्न केला आहे. तथापि महात्माजींच्या अहिंसेचा अर्थ लावतां लावतां मात्र बऱ्याच भारतीयांची त्रेधा उडाली आहे. एखाद्या जिवास मारलें कीं हिंसा झाली असें सामान्य माणसें मानतात. जैनधर्मीय लोक यास 'द्रव्यहिंसा' असें म्हणतात. तथापि त्यांच्या हिंसेच्या मर्यादा यापेक्षां अधिक व्यापक आहेत. एखाद्याचें नुसतें मनानें

वाईट चिंतणें यास ‘ भावाहिंसा ’ असें म्हणतात. दुसऱ्याचें नुकसान करण्याचा नुसता संकल्प केला तरी ती हिंसा होते. या हिंसेस ‘ संकल्पी हिंसा ’ असें म्हणतात. त्याचप्रमाणें स्वतःचा बचाव करण्यासाठीं व दुसऱ्याचा प्रतिकार करण्यासाठीं केलेल्या हिंसेस ‘ विरोध हिंसा ’ असें म्हणतात. शेतीचा व्यवसाय करीत असतांना, जमीन नांगरतांना अथवा अन्य वेळीं हिंसा घडते तिला ‘उद्यमी हिंसा’ असें म्हणतात व गृहस्थाश्रमाचें पालन करीत असतांना व्यावहारिक जगांत अटळ अशी जी हिंसा तिला ‘आरंभी हिंसा’ असें म्हणतात. हिंसेचे हे निरनिराळे प्रकार पाहिले कीं, तिच्या व्याप्तीची आपणास कल्पना येते व अहिंसाव्रताचें पालन करणें किती दुर्घट आहे याबद्दल आपली खात्री पटते. तथापि त्यामुळें माणसानें गांगरून जाण्याचें कारण नाहीं. पवित्र मनाच्या माणसाला अहिंसाव्रताचें पालन करणें शक्य आहे.

अर्थात् अहिंसेचा उगम आपल्या दुर्बलतेंतून मात्र होतां कामा नये. किंबहुना दुर्बल मनुष्य हा अहिंसक होऊं शकत नाहीं. अहिंसाव्रताच्या पालनानें मनुष्य निर्भय बनतो. महात्मा गांधींनीं आपल्या निःशस्त्र प्रतिकाराच्या लढ्यामुळें हिंदी जनतेंत अपूर्व निर्भयता प्राप्त करून दिली; हाच खरा अहिंसेचा विजय आहे. अहिंसेचें आटोकाट पालन करण्यासाठीं जैन लोक आपल्या नाकाभोंवतीं पांढरें फडकें गुंडाळतात. नाकावाटें जाणाऱ्या हवेंतील जंतूंची देखील हिंसा घडूं नये असा त्यांचा कटाक्ष असतो. अहिंसाव्रताच्या पालनासाठीं ते सूर्यास्तापूर्वीं भोजन करतात. कोणत्याहि प्राण्याची हिंसा घडूं नये याबद्दल ते अत्यंत दक्ष असतात. वर्धमान महावीरांनीं या अहिंसाव्रताची थोरवी पराकोटीला नेऊन पोहोंचविली आहे.

याशिवाय महावीरांनीं उपदेशिलेल्या पंचमहाव्रतांपैकीं असत्यभाषण करूं नये, चोरी करूं नये व व्यभिचारकर्म करूं नये इत्यादि व्रतांची महति आपण ओळखतों. महावीरांनीं जैनधर्मियांस संचय प्रवृत्ति टाळली पाहिजे असें बजावून सांगितलें आहे. अलीकडील युद्धजन्य

परिस्थितीमुळें आपल्या देशांत काळा बाजार बोकाळला आहे. महावीरांना हा संचय संमत नाहीं. एवढेंच नव्हे तर आपल्या हातून एखाद्या गोष्टीचा संचय झाला तर संचित वस्तूंचा धर्मादायासाठीं उपयोग करावा असें त्यांनीं सांगितलें आहे. महावीरांच्या या महाव्रताचें पालन आपल्या देशांतील जनता कसोशीनें करील तर देशाला सुखाचे दिवस लवकर प्राप्त होतील. महावीरजयन्तीच्या निमित्तानें साठेबाजीविरुद्ध मोहीम काढणें किती समर्पक होईल !

महावीरांनीं आपल्या आयुष्यांत अशीं समाजोपयोगी महान् तत्त्वें प्रतिपादन केलीं. महावीरांनीं प्रतिपादन केलेल्या जैनधर्माचे अनुयायी आपल्या भारतांत आजहि सुमारें १२ लाख आहेत. त्यांची लोकसंख्या विशेषतः राजपुताना, गुजराथ, काठेवाड इत्यादि भागांत अधिक आहे. महावीरांच्या निर्वाणानंतर जैनधर्मीय लोकांत दिगंबर व श्वेतांबर असे दोन पंथ पडले. दिगंबरपंथीय जैन साधु दिगंबरावस्थेंत राहतात व श्वेतांबरपंथीय साधु श्वेत वस्त्र परिधान करतात. इ. स. च्या सुमारें ३०० वर्षांपूर्वी कांहीं जैन साधु दक्षिणेंत राहावयास आले. दक्षिणेंतील हवा अधिक उष्ण असल्यामुळें त्यांना येथें वस्त्रविहीन राहणें सोईचें वाटलें असावें; म्हणून त्यांनीं दिगंबरपंथ स्थापन केला. स्वतः महावीर तपश्चर्या करीत असतांना दिगंबरावस्थेंत राहात. या गोष्टीचा त्यांना आयताच आधारहि मिळाला.

जैनधर्मीय लोक मूर्तिपूजक आहेत. ते आपल्या देवळांत तीर्थकरांच्या मूर्ती ठेवून त्यांची पूजाअर्चा करतात. जैन लोक सधन असल्यामुळें त्यांचीं देवळेंहि अतिशय प्रेक्षणीय असतात. भारतीय वास्तुकलेचे व शिल्पकलेचे उत्कृष्ट नमुने म्हणून या देवळांकडे आपणांस अभिमानानें बोट दाखवितां येईल. त्यांपैकीं हजारीबाग जिल्ह्यांतील श्रीसंमेदशिखर येथील पार्श्वनाथाचें मंदिर अप्रतिम आहे. त्याशिवाय हिमालयाजवळील श्रीक्षेत्र कैलास येथील ऋषभनाथाचें निर्वाणस्थळ, श्रीगिरिनार पर्वतावरील नेमिनाथाचें मोक्षस्थळ, पावापूर येथील महावीरांचें निर्वाणस्थळ येथील मंदिरें प्रेक्षणीय आहेत. म्हैसूर प्रांतांतील श्रमणबेळगोळा येथील मंदिराचें

अप्रतिम शिल्पकाम पाहण्यासाठीं अनेक लोक जातात. अबूच्या पहाडा-वरील जैनांचें मंदिर तर शिल्पकलेचा अप्रतिम नमुना आहे.

जैनधर्मियांच्या या निरनिराळया मंदिरांवरून प्राचीन काळीं या धर्माचा प्रसार किती झपाट्यानें झाला होता याची आपणांस खात्री पटते. जैन-धर्मीय तीर्थंकर हे क्षत्रिय व वैश्य समाजांतील होते. विक्रमादित्य, शात-कर्णी इत्यादि जैनधर्मीय राजेहि प्रसिद्ध आहेत. जैनधर्मप्रसाराचें मुख्य कारण त्यांत सांगितलेला समतेचा संदेश हें होय. या समतेच्या संदेशामुळें बहुजनसमाजास जैन धर्म विशेष आवडूं लागला. जैनधर्मीय वाङ्मय हें बहुजनसमाजाच्या बोलभाषेंत–अर्धमागधींत– लिहिलें आहे. जैन धर्मग्रंथाचें नांव 'आगम' असें आहे.

जैनधर्मीय लोक पर्युषणाचें व्रत आचरतात. या व्रतास भाद्रपद शु. ५ या दिवशीं सुरुवात होऊन तें शु. १४ पर्यंत चालूं राहतें. या काळांत जैन लोक दशगुणांचें चिंतन करतात. अक्षय्यतृतीयेस ऋषभनाथ यांना उसाचा रस दिला अशी कथा आहे; म्हणून त्या दिवशीं जैन लोक देवळांत एकत्र जमून उसाचा रस पितात. ज्येष्ठ शु. ५ स ते शास्त्रपूजा करतात. या दिवसास श्रुतपंचमी असें म्हणतात. आश्विन वद्य अमावास्येला महावीरांचें निर्वाण झालें म्हणून ते या दिवशीं दीपोत्सव साजरा करतात. महावीर-जयंतीच्या निमित्तानें आपण या सर्व गोष्टींची नीट ओळख करून घेतली पाहिजे.

### समवाय

१. महावीराच्या काळीं वैदिक धर्माची स्थिति कशी झाली होती या गोष्टींची माहिती करून द्या.
२. महावीराच्या सामाजिक व धार्मिक कार्यांचें महत्त्व पटवा.
३. जैन धर्माचीं सांस्कृतिक वैशिष्ट्यें मुलांच्या नजरेस आणून द्या.
४. महावीराचें चरित्र समजावून द्या.
५. बौद्ध व जैन धर्मांची तुलना करा.
६. जैन धर्माच्या आजच्या स्थितीचें ज्ञान करून द्या.
७. 'मानवतेचे पुजारी' – भाग १ या पुस्तकांतील महावीर यांचें चरित्र वाचा.




रामायणांत वाल्मीकि ऋषींनीं प्रभु रामचंद्रांचें चरित्र रेखाटलें आहे. प्रभु रामचंद्रांनीं दुष्ट रावणाचें पारिपत्य केलें. या कामीं त्यास वानरसेनेचें फार साहाय्य झालें. वानर हे आपल्या आर्यावर्तांतील आदिवासी लोक होते. रामायणकाळांत या वानरांचें मोठें वैभवशाली राज्य असल्याचें आढळून येतें. किष्किंधानगरी ही या वानरराज्याची राजधानी होती. या वानरराज्यांत नळ, नीळ, जांबुवंत, सुग्रीव, अंगद व हनुमान इत्यादि चतुर व महापराक्रमी सेनानी व मुत्सद्दी होते. त्यांच्या साहाय्यामुळें प्रभु रामचंद्रांना सीतेचा शोध लागला व त्यांना रावणाला ठार करतां आलें. त्यामुळें रामायणांत वानरांचें महत्त्व फार आहे. त्यांच्या पराक्रमाच्या व चातुर्याच्या असंख्य लीलांनीं रामायणास माधुर्य प्राप्त झालें आहे.

या सर्व वानरसेनेंत महापराक्रमी वज्रदेही हनुमान याचें अपूर्व तेज उठून दिसतें. हनुमान हा प्रभु रामचंद्रांचा एकनिष्ठ सेवक होता. प्रभु

रामचंद्रांवरील त्याच्या निस्सीम भक्तीमुळें रामायणांत प्रभु रामचंद्रांच्या बरोबर हनुमानाचें नांव सुशोभित झालें आहे. त्यामुळें प्रभु रामचंद्रांच्या देवळासमोर हल्लीं आपणांस हनुमानाचें देऊळ दिसून येतें. श्रीशंकराच्या देवळासमोर ज्याप्रमाणें नंदी, अथवा श्रीविष्णूच्या देवळासमोर जसा गरुड त्याप्रमाणें प्रभु रामचंद्रांच्या देवळासमोर हनुमानाची मूर्ति असते. अर्थात् हनुमानाची योग्यता नंदी व गरुड यांच्यापेक्षां कितीतरी पटीनें अधिक आहे. कारण, प्रभु रामचंद्रांच्या केवळ आज्ञा पाळण्यांतच हनुमानाचें जीवन गेलें नाहीं; तर त्यानें वेळोवेळीं प्रभु रामचंद्रांस धीर देऊन योग्य तें मार्गदर्शनहि केलें आहे. हनुमान हा वानर लोकांतील खरोखरच अत्यंत आदरणीय असा पुरुष होऊन गेला. हनुमानासारखा बलशाली पुरुष विरळा ! त्यानें आपल्या ब्रह्मचर्यव्रतामुळें आपल्या अंगीं असें अपूर्व बल प्राप्त करून घेतलें होतें. हनुमानास आजहि आपण बल-देवता मानून त्याची प्रत्येक आखाड्यांत प्रतिष्ठापना करतों. दर शनिवारीं हनुमंताच्या मूर्तीवर रुईच्या फुलांची माळ चढवून आपण त्याची पूजा-अर्चा करतों. बलोपासनेस हनुमानासारखें आदर्श दैवत नाहीं.

हनुमानाच्या बलाच्या अनेक कथा सांगतात. महाभारतकालीं पांच पांडवांतील भीम हा असाच अचाट बलशाली पुरुष होऊन गेला. अर्थात् या वेळीं हनुमान म्हातारा झाला होता. तरीहि त्याचें बल अफाट होतें. त्यासंबंधीं एक मजेदार कथा सांगतात ती अशी : एकदां भीमास आपल्या बळाचा फार गर्व झाला. त्या गर्वामुळें भीम धुंद झाला. एकदां तो कांहीं कामानिमित्त बाहेर जावयास निघाला. त्याच्या वाटेंत हनुमान आपलें शेपूट पसरून बसला होता. तें पाहून भीमानें त्यास आपलें शेपूट उचलून घेण्यास सांगितलें. त्यावर हनुमान म्हणाला, “ भीमा, अरे मी आतां फार म्हातारा झालों आहे. हें अवजड शेपूट उचलण्याची शक्ति आतां माझ्या अंगांत उरली नाहीं. तेव्हां तूंच तें उचलून आपली वाट मोकळी करून

घे!" भीमास आपल्या शक्तीची फार घमेंड होती. तो हनुमानाचें शेपूट उचलूं लागला. पण छे! हनुमानाचें शेपूट त्यास कांहीं केल्या उचलता येईना! तेव्हां भीमाचा सारा गर्व हरण झाला. म्हातारपणीं देखील हनुमानाच्या अंगीं केवढें विलक्षण बळ होतें हें आपणांस या गोष्टीवरून दिसून येतें. अर्थात् अशा पुरुषास बलदेवतेचें स्थान मिळावें यांत नवल तें काय!

अशा या बलशाली हनुमानाचा जन्म चैत्र शुद्ध पौर्णिमेस झाला. हनुमानाच्या पित्याचें नांव केसरी व मातेचें नांव अंजनी असें होतें. अंजनीनें महादेवाची आराधना केली. त्यामुळें महादेव प्रसन्न झाले. त्यांच्या कृपाप्रसादामुळें अंजनीच्या पोटीं बलशाली हनुमानाचा जन्म झाला. हनुमानाचा जन्म सूर्योदयाच्या वेळीं झाला. त्या वेळची एक कथा अशी सांगतात कीं, हनुमानानें जन्मतांच आकाशांतील बालसूर्यबिंब पाहिलें. त्यास एखादें फळ समजून तें घेण्यासाठीं त्यानें उड्डाण केलें! यावरून बाल हनुमानाच्या बलाची आपण कल्पना करावी. 'मुलाचे पाय पाळण्यांत दिसतात' असें आपण म्हणतों. हनुमानाच्या बाबतींत ही म्हण तंतोतंत खरी असल्याबद्दल आपली खात्री पटते. हनुमानाच्या बाळपणींच्या अशा अनेक रम्य कथा आहेत.

पुढें यथावकाश हनुमान सूर्यापासून अनेक शास्त्रें शिकला. त्यानंतर वानरराजा सुग्रीव याच्याशीं त्याची मैत्री जडली. सुग्रीवाचा बंधु वालि हा फार दुष्ट होता. त्यानें सुग्रीवास आपल्या राज्यांतून हाकून लावलें. या वेळीं सीताहरण झालें होतें व प्रभु रामचंद्रांना सीतेची सुटका करण्यासाठीं वानरांची मदत हवी होती. त्यांनीं पंपा सरोवरावर सुग्रीवाची भेट घेतली. त्या वेळीं हनुमानानें या दोहोंचा स्नेह घडवून आणला. तेव्हांपासून हनुमान हा प्रभु रामचंद्रांचा एकनिष्ठ सेवक बनला. वानरांच्या साहाय्यानें प्रभु रामचंद्रांनीं सीतेचा शोध चालविला. सीतेचा शोध करण्या

साठीं हनुमान लंकेस गेला. तेथें त्यानें अशोकवनांत सीतेची गांठ घेतली. त्यानंतर रावण आपल्या दृष्टीस पडावा यासाठीं हनुमानानें अशोकवनाची नासधूस चालविली. ही बातमी रावणास समजतांच त्यानें हनुमानास पकडण्यासाठीं आपलें सैन्य पाठविलें. तथापि हनुमानानें त्या सर्व सैन्याचा धुव्वा उडविला! तेव्हां रावणाचा मुलगा इंद्रजित यानें आपल्या ब्रह्मास्त्रानें हनुमानास बांधून रावणासमोर उभें केलें. रावणानें हनुमानास ठार मारण्याची आज्ञा केली. रावणाचा भाऊ बिभीषण हा फार सात्त्विक वृत्तीचा होता. त्यानें रावणाजवळ रदबदली करून हनुमानाचा मृत्यु शेपटींत आहे असें सांगितलें. रावणानें लंकेंतील सर्व वस्त्रें गोळा करून तीं हनुमानाच्या शेपटीस गुंडाळलीं व त्यावर तेल ओतून त्यास आग लावून दिली. हनुमानानें उड्डाण करून लंका जाळली व घडलेला सर्व वृत्तान्त कथन करण्यासाठीं तो प्रभु रामचंद्रांजवळ परत गेला.

प्रभु रामचंद्रांनीं रावणाशीं युद्ध करण्याची तयारी केली. समुद्र पार करण्यासाठीं वानरांनीं सेतुबंधन केलें व प्रभु रामचंद्र वानरसेनेसहित लंकेस जाऊन थडकले. तेथें त्यांचें रावणाशीं घनघोर युद्ध झालें. त्या वेळीं हनुमानानें अतुलनीय पराक्रम गाजविला. युद्धांत लक्ष्मण जखमी झाला व त्यास शक्ति लागल्या. तेव्हां हनुमानानें सबंध द्रोणाचल उचलून आणला. द्रोणाचलावरील वनस्पती औषधानें लक्ष्मण शुद्धीवर आला. युद्धांत रावण ठार झाला. प्रभु रामचंद्रांचा विजय झाला. त्यांनीं सीतेची सुटका केली. कांहीं काळानंतर आपला १४ वर्षांचा वनवास संपवून प्रभु रामचंद्र अयोध्येस गेले. त्या वेळीं हनुमानहि त्यांच्याबरोबर अयोध्येस गेला.

हनुमानाच्या रामभक्तीची एक मजेदार कथा सांगतात. एकदां सीतेनें हनुमानाच्या कामगिरीवर खूष होऊन त्यास स्वतःच्या गळयांतील मौक्तिक-हार अर्पण केला. मौक्तिकहार हातीं पडतांच हनुमान त्यांतील एकेक मोती तोडून तो दातानें चावून फेकूं लागला. तें पाहून सीतेस राग आला. तिनें

हनुमानास आपल्या कृत्याचें कारण विचारलें. तेव्हां हनुमान म्हणाला, " सीतामाई, मी या मौक्तिकांत कोठें माझा राम दिसतो आहे काय हें शोधतों आहे. पण यांत तर राम कोठेंच दिसत नाहीं ! मग काय करायचे हे मोती ? " तें ऐकून सीता संतुष्ट झाली. ती हनुमानास म्हणाली, " मग आर्यपुत्र आहेत तरी कोठें ? " त्यासरशीं हनुमानानें आपली छाती फाडली व आपल्या हृदयांतील प्रभु रामचंद्रांचें सीतामाईस दर्शन घडवून दिलें ! याला म्हणावें भक्ति ! सेवकाची स्वामिनिष्ठा !

हनुमानाच्या या स्वामिनिष्ठेमुळें प्रभु रामचंद्रांचीहि त्याजवर अनन्यसाधारण भक्ति असे. त्यासंबंधींचीहि एक मजेदार कथा आहे. एकदां नारद्मुनि प्रभु रामचंद्रांस भेटण्यासाठीं अयोध्येस चालून आले. त्या वेळीं प्रभु रामचंद्र देवपूजेंत निमग्न होते. तें पाहून नारदमुनींचें कुतूहल जागृत झालें. सर्व जगाचा स्वामी प्रभु रामचंद्र पूजा तरी कोणाची करतो आहे हें पाहण्यासाठीं ते पुढें सरसावले; तों काय आश्चर्य ! प्रभु रामचंद्र हनुमानाची पूजा करीत होते ! याला म्हणावें सेव्यसेवक भाव ! आपल्या एकनिष्ठ सेवकाची सेवा करणें हें स्वामीचें कर्तव्य आहे हें प्रभु रामचंद्रांनीं या प्रसंगावरून दाखवून दिलें !

हनुमानाचें माहात्म्य असें विलक्षण आहे. अशा थोर व वीर पुरुषाची जयंती साजरी करतांना आपण त्यांचें चरित्र नीट वाचून पाहिलें पाहिजे. त्यांच्या कर्तृत्वाचें सार ओळखलें पाहिजे. हनुमानांनीं ब्रह्मचर्यव्रत पाळून बलोपासना केली त्याचप्रमाणें आपण बलोपासना केली पाहिजे. हनुमानजयंतीच्या निमित्तानें आपण निरनिराळे खेळ खेळले पाहिजेत. सामने घडवून आणले पाहिजेत. बलोपासनेचें महत्त्व पटवून दिलें पाहिजे. सुदैवानें आपल्या देशांत गांवोगांवीं अनेक आखाडे आहेत. तथापि अलीकडे त्यांची स्थिति फारशी चांगली नाहीं. त्यांची स्थिति सुधारून त्यांना उर्जितावस्था प्राप्त करून देण्याचा प्रयत्न केला पाहिजे. हनुमानजयंतीच्या

निमित्तानें आपण आपल्या देशांतील व इतर देशांतील शारीरिक शिक्षण-विषयक चळवळींचा इतिहास अभ्यासिला पाहिजे. प्राचीन काळीं वैभवाच्या शिखरावर विराजमान झालेल्या ग्रीस, अथेन्स व स्पार्टा इत्यादि राज्यांत बलोपासनेस किती महत्त्व होतें, हें सांगितलें पाहिजे. बलोपासनेच्या स्पर्धा घडवून आणण्यासाठीं तेथें 'ऑलिंपिक सामने' भरविले जात. हे ऑलिंपिक सामने हल्लींच्या काळांत देखील चालू आहेत. त्यांत भाग घेण्यासाठीं देशोदेशींचे लोक जमतात. आपल्या भारतांतील बलोपासकांनींहि या सामन्यांत भाग घेऊन कांहीं वेळां विक्रम गाजविला आहे. आपल्या भारतांत देखील अशा प्रकारचे सामने 'अखिल भारतीय शारीरिक शिक्षण मंडळ' अथवा 'अखिल महाराष्ट्र शारीरिक शिक्षण मंडळ' अशा संस्थांच्या मार्फत चालू आहेत. त्याची आपणांपैकीं किती लोकांना माहिती आहे? या सामन्यांत भाग घेण्यासाठीं आपण हनुमान-जयंतीपासून तयारीस लागलें पाहिजे. गांवोगांवच्या बलोपासकांशीं सहकार्य करून त्यांच्याकडून शिकतां येईल तें शिकण्याचा संकल्प केला पाहिजे.

बलोपासनेचा उपयोग समाजाच्या कल्याणासाठींच करावयाचा असतो, समाजास उपद्रव देण्यासाठीं नव्हे; ही गोष्ट आपण हनुमानाच्या चरित्रा-वरून लक्षांत घेतली पाहिजे. भीमाप्रमाणें स्वबलाबद्दल गर्व बाळगतां कामा नये. आपल्या खेड्यांतील जीवन सुखी व सुरक्षित करण्यासाठीं आपण आपल्या बलाचा उपयोग केला पाहिजे. या दृष्टीनें गांवोगांवच्या शाळां-तील मुलें व आखाड्यांतील बलोपासक समाजसेवा करतील तर ते आपा-पल्या गांवांतील आदरणीय व्यक्ती होतील. खेड्यांतील गांवगुंडीस आळा बसेल. गांवगुंडीस आळा घालण्याचा संकल्प आपण हनुमानजयंतीच्या दिवशीं केला पाहिजे. आपल्या गांवांतील गांवगुंड म्हणजे गांवरावणच नव्हेत काय? त्यांचा बंदोबस्त आपण केलाच पाहिजे.

त्याचप्रमाणें हनुमानजयंतीच्या दिवशीं योग्य प्रकारच्या आहारासंबंधीं-

चेंहि ज्ञान मिळविलें पाहिजे. आपला भारत कृषिप्रधान देश आहे. त्यांत अनेक प्रकारचा भाजीपाला, धान्यें व फळफळावळ पिकतात. त्यांची आपण माहिती करून घेतली पाहिजे. शरीरपोषणासाठीं भाजीपाल्याची फार आवश्यकता आहे. अलीकडे आपण सारेंच अन्न शिजवून खातों. त्यामुळें अन्नांतील जीवनसत्त्वें कमी होतात. आपल्या आहारांत आपण वीर हनुमानांच्या कच्च्या–न शिजविलेल्या–आहाराचाहि योग्य तो उपयोग केला पाहिजे. त्यामुळें आपलें शरीर निरोगी बनून आयुर्मर्यादा वाढेल. आपल्या भारतांत अकालीं मृत्यूचें प्रमाण फार मोठें आहे. येथील लोकांची सरासरी आयुर्मर्यादा अवघी २७ वर्षांची आहे. किती शोचनीय गोष्ट आहे ही ! ही आयुर्मर्यादा वाढविण्याचा आपण प्रयत्न केला पाहिजे. म्हणजे आपला भारत बलवान देश होईल. शरीर सुखी तर मन सुखी. शरीराची योग्य प्रकारें काळजी घेतल्यास आपल्या भारतांतील जनता अधिक उत्साही व कार्यक्षम बनेल ही गोष्ट आपण अवश्य लक्षांत घेतली पाहिजे.

## समवाय

१. वीर हनुमानाच्या विलक्षण बलाच्या व कर्तृत्वाच्या कथा सांगा.
२. शारीरिक शिक्षणाचें महत्त्व पटवून द्या व शारीरिक शिक्षणाच्या निरनिराळ्या संस्थांचा ओझरता इतिहास सांगा.
३. कच्च्या आहाराचें महत्त्व पटवून द्या.
४. भारतांतील जनतेच्या अपमृत्यूचीं कारणें सांगा.
५. भारतांतील आदिवासी जनतेबद्दल माहिती करून द्या.
६. हनुमानाचें स्तोत्र शिकवा.



# परशुराम जयंती

हिंदु लोक मत्स्य, कच्छ, वराह, नारसिंह, वामन, परशुराम, राम, कृष्ण, बौद्ध व कलंकी असे परमेश्वराचे दशावतार मानतात. या दशावतारांनीं पृथ्वीवर वेळोवेळीं होणारा जुलूम नाहींसा करण्याचें अवतारकार्य केलें. या दशावतारांपैकीं परशुराम हा सहावा अवतार होय. परशुरामानें क्षत्रियांच्या जुलमापासून पृथ्वीचें संरक्षण केलें. परशुरामाचा अवतार प्रभु रामचंद्रांच्या पूर्वीं झाला. त्यामुळें परशुरामचरित्रावरून आपणास रामायण-पूर्वकालीन आर्य लोकांच्या जीवनाची माहिती मिळते.

प्राचीन काळीं ऋचीक नांवाचा एक ब्राह्मण ऋषि होता. विश्वामित्राची बहीण सत्यवती हिच्याशीं त्याचा विवाह झाला होता. विश्वामित्र हा क्षत्रिय होता. त्यामुळें अर्थातच त्याची बहीण सत्यवती ही देखील क्षत्रिय वर्णाची होती. प्राचीन काळीं असे भिन्नवर्णीय स्त्री-पुरुषाचे विवाह होत असत. अशा विवाहापासून होणारी संतति पित्याच्या वर्णाची मानली जाई. त्यामुळें सत्यवतीचा मुलगा जमदग्नि यास ब्राह्मण मानतात. जमदग्नीचा विवाह रेणुका नांवाच्या एक क्षत्रियकन्येशीं झाला होता. या दांपत्यास

एकंदर पांच पुत्र झाले. त्यांपैकीं परशुराम हा सर्वांत धाकटा होय. तत्कालीन रूढीप्रमाणें परशुराम हा पित्याच्या वर्णाचा म्हणजे ब्राह्मण मानला जात होता. परशुरामाचा जन्म वैशाख शु. ३ स झाला. त्यामुळें वैशाख शु. ३ स परशुरामजयंती साजरी करतात.

परशुरामाचा पिता जमदग्नि हा महाकोपिष्ट होता. त्याजपासून परशुरामानें कोपिष्टपणाचा वारसा उचलला. परशुराम मोठा हुशार होता. उपनयनविधीनंतर तो शालग्राम पर्वतावर गेला. तेथें त्यानें शंकरास प्रसन्न करून त्याजकडून धनुर्वेद, शस्त्रास्त्रविद्या व मंत्रविद्या इत्यादींचें ज्ञान मिळविलें. शंकरानें त्याला परशु नांवाचें एक शस्त्र दिलें. परशुरामानें या शस्त्राचा फार उपयोग केला, म्हणून त्यास परशुराम असें नांव प्राप्त झालें. परशुरामाचें बाळपणींचें नांव नुसतें राम असेंच होतें.

परशुराम हा मातृ-पितृभक्त होता. एकदां परशुरामाची आई रेणुका ही नर्मदा नदीवर स्नानास गेली असतां तेथें जलक्रीडेस आलेल्या वार्तिकावत् राजाचें सुंदर रूप पाहून तिचें मन किंचित् विचलित झालें. ही गोष्ट जमदग्नीला समजतांच त्याचा संताप अनावर झाला व त्यानें आपल्या पुत्रांस बोलावून त्यांना रेणुकेला ठार मारण्याबद्दल आज्ञा केली. जमदग्नीची ही आज्ञा फक्त परशुरामानें मान्य केली व त्यानें स्वमातेचा वध केला. परशुरामाचा हा आज्ञाधारकपणा पाहून जमदग्नि संतुष्ट झाला. तेव्हां परशुराम आपल्या पित्यास म्हणाला, “तात, माझें एक मागणें आहे.” परशुरामावर संतुष्ट होऊन जमदग्नि म्हणाला, “बाळ, तुला काय मागायचें तें अवश्य माग. मी तें तुला देईन.” जमदग्नीच्या मुखांतून हे शब्द बाहेर पडतांच परशुरामानें आपल्या मातेस जिवंत करण्याबद्दल विनंती केली. त्याप्रमाणें रेणुका पुन्हां जिवंत झाली. अशा प्रकारें परशुरामानें आपली मातृ-पितृभक्ति व्यक्त केली.

त्या काळीं नर्मदा नदीच्या कांठीं कार्तवीर्य नांवाचा एक राजा राज्य

करीत असे. त्याला एक हजार हात होते, अशी आख्यायिका आहे. त्यामुळें त्यास सहस्रार्जुन असेंहि म्हणतात. तथापि सहस्रार्जुनाचे सहस्र हात त्याच्या एकट्याचे खासच नसावेत. सहस्रार्जुनाच्या सैन्याच्या प्रचंड शक्तीचे हे हात द्योतक आहेत. सहस्रार्जुन महापराक्रमी होता. युद्ध करण्यासाठीं त्याचे सहस्र बाहू एकसारखे स्फुरण पावत होते. त्यामुळें तो उन्मत्तपणानें समुद्रावर बाण सोडून त्यास ' कोण मला विरोध करील ?' असें विचारूं लागला. तेव्हां ' परशुराम तुला विरोध करील,' असें समुद्रानें त्यास उत्तर दिलें. त्यानंतर सहस्रार्जुनानें वसिष्ठ ऋषींचा आश्रम जाळला. त्यामुळें वसिष्ठ ऋषि संतापले. 'परशुराम तुझे सहस्र हात खंडित करील' असा त्यांनीं कार्तवीर्याला शाप दिला. कार्तवीर्याचीं मुलेंहि उन्मत्त होतीं. त्यांनीं जमदग्नि ऋषींच्या आश्रमाशेजारीं बराच धुमाकूळ माजविला व जमदग्नि ऋषींच्या आश्रमांतील कामधेनूचें हरण केलें.

ही बातमी परशुरामास समजतांच तो सहस्रार्जुनावर चालून गेला व त्यानें त्याच्या सैन्याचा पराभव करून कामधेनूस सोडवून आणलें. परशुरामाच्या या कृत्यामुळें सहस्रार्जुन अधिकच कोपायमान झाला. त्यानें जमदग्नीच्या आश्रमांत शिरून त्याचा वध केला. परशुराम या वेळीं कोठें बाहेर गेला होता. तो आश्रमांत परत येतांच रेणुकेनें २१ वेळां ऊर बडवून त्यास आपल्या पतिनिधनाची दुःखद बातमी सांगितली व क्षत्रियांचा २१ वेळां निःपात करण्याबद्दल आज्ञा केली. त्यानंतर रेणुका आपल्या पतीच्या शवाबरोबर सती गेली. मातेची आज्ञा शिरसावंद्य मानून परशुरामानें पृथ्वी निःक्षत्रिय करण्याची घोर प्रतिज्ञा केली व पित्याच्या वधाचा सूड घेण्यासाठीं तो सहस्रार्जुनाच्या प्रदेशांत शिरला. सहस्रार्जुनानें आपल्या सैन्यानिशीं त्याचा प्रतिकार करण्याचा प्रयत्न केला. पण व्यर्थ ! परशुरामानें सहस्रार्जुनाच्या सैन्याची दाणादाण उडविली व सहस्रार्जुनाशीं द्वंद्वयुद्ध करून त्यानें त्याचे सहस्र हात खंडित करून त्यास ठार मारलें.

यानंतर आपलें क्षत्रियनाशाचें कार्य संपलें असें समजून परशुराम प्रायश्चित्त घेण्यासाठीं महेंद्र पर्वतावर निघून गेला. तें पाहून विश्वामित्राचा नातू परावसू यानें त्याला पुन्हां डिवचलें. 'पृथ्वीस निःक्षत्रिय करण्याची घोर प्रतिज्ञा करणारा परशुराम अखेरीस क्षत्रियांना भिऊन तपश्चर्येच्या मिषानें महेंद्र पर्वतावर पळून गेला' असा त्यानें प्रवाद केला. तो ऐकून परशुरामास संताप आला व त्यानें पुन्हां क्षत्रियसंहारास सुरुवात केली. या वेळीं एखाद्या पिसाटाप्रमाणें त्यानें काश्मीर, दरद, कुंति, क्षुद्रक, मालव, अंग, वंग, कलिंग, विदेह, ताम्रलिप्त, रक्षोवाह, वीतिहोत्र, त्रिगर्त, मार्तिकावत् व शिबी इत्यादि राज्यांतील क्षत्रियांचा संहार केला व सबंध पृथ्वी जिंकली. त्यानंतर त्यानें प्रचंड यज्ञ केला व यज्ञाचे अध्वर्यु काश्यपमुनि यांना पृथ्वीचें दान केलें.

परशुरामानें काश्यपमुनीस पृथ्वीचें दान केलें खरें, परंतु या वेळीं पृथ्वी निःक्षत्रिय झाल्यामुळें निर्वीर्य बनली होती. तिच्यांत कांहीं त्राण उरलें नव्हतें. ती बुडूं लागली. तिला सावरतां सावरतां काश्यपमुनींची मोठी त्रेधा उडाली. अखेरीस त्यानें पृथ्वीला आपल्या मांड्यांत घट्ट धरून ठेवलें. त्यामुळें पृथ्वीस उर्वी असें नांव प्राप्त झालें. अर्थात् काश्यपमुनींनीं खरोखरच आपल्या मांड्यांत पृथ्वीस पकडून ठेवलें असें मानणें चुकीचें होईल. पृथ्वीचें बल तिच्या बाहूंत म्हणजे क्षत्रियांत होतें. ते बाहू आतां नष्ट झाले होते. त्यामुळें काश्यपमुनींनीं इतर वर्णियांकडून पृथ्वीचा सांभाळ करण्याचा कसाबसा प्रयत्न केला असा याचा अर्थ घ्यावयाचा. तथापि असें किती दिवस चालणार ? क्षत्रियांशिवाय पृथ्वीचें पालन व रक्षण कसें होणार ? हें पाहून काश्यपमुनींनीं परशुरामाच्या भीतीनें रानावनांत पळून गेलेल्या अनेक क्षत्रियांना आदरपूर्वक बोलाविलें. पण परशुरामाच्या भीतीमुळें क्षत्रिय लोक काश्यपमुनीकडे येण्यास धजेनात. तेव्हां पृथ्वीपति काश्यपानें परशुरामासच पृथ्वी सोडून जाण्याची आज्ञा केली ! तेव्हांपासून परशुराम महेंद्र पर्वतावर राहूं लागला.

महेंद्र पर्वतावर असतांना परशुरामाच्या कानीं प्रभु रामचंद्रांच्या क्षात्र-तेजाची कीर्ति गेली. तेव्हां त्यांची परीक्षा पाहण्याकरितां परशुराम अयोध्येस आला. त्यानें प्रभु रामचंद्रांच्या धनुर्विद्येची परीक्षा पाहिली. प्रभु रामचंद्रांनीं धनुर्विद्येंतील आपली पारंगतता दाखवून परशुरामाचा गर्व हरण केला.

त्यानंतर बराच काळपर्यंत परशुराम महेंद्र पर्वतावर विद्यादानाचें कार्य करीत होता. त्यानें द्रोणाचार्य व भीष्माचार्य यांना धनुर्विद्येंत पारंगत केलें. महारथी कर्ण हा देखील त्याच्याकडे ब्राह्मण म्हणून धनुर्विद्येच्या अभ्यासा-साठीं राहिला होता. तथापि एकदां परशुराम कर्णाच्या मांडीवर डोकें ठेवून झोंपला असतांना एका भुंग्यानें कर्णाची मांडी पोखरण्यास सुरुवात केली. तेव्हां कर्णानें यत्किंचिताहि हालचाल केली नाहीं. तें पाहून कर्ण हा क्षत्रिय असला पाहिजे अशी परशुरामाची खात्री झाली व 'माझ्याकडून मिळव-लेली विद्या तुला ऐन वेळीं आठवणार नाहीं' असा त्यांनीं त्यास शाप दिला.

अशा प्रकारें महाभारतकालापर्यंत आपणाला परशुरामाचें अस्तित्व असल्याचें आढळून येतें. भगवान् श्रीकृष्णांनीं कंसाचा वध करून मथुरे-च्या राज्यावर उग्रसेनाची प्रतिष्ठापना केली; तेव्हां कंसाचा सासरा जरासंध यांजकडून मथुरेस फार उपद्रव होऊं लागला. त्यामुळें कृष्ण–बळरामांनीं मथुरा नगरीचा त्याग केला व जरासंधाचा निःपात कसा करावा या गोष्टीचा विचार करीत ते रानावनांतून हिंडू लागले. अशा प्रकारें हिंडत असतांना ते करवीर (कोल्हापूर) प्रदेशांत असलेल्या परशुरामाजवळ आले व त्यांनीं परशुरामाचा सल्ला विचारला. त्यानंतर परशुराम शूर्पारक (हल्लींचें ठाणें जिल्ह्यांतील सोपारा) नगरास गेला. त्यानें कोंकणपट्टींत आपली स्वतंत्र वसाहत स्थापन केली. तेथून तो मलबार किनाऱ्यापर्यंत गेला. या प्रदेशां-तील ब्राह्मण लोक स्वतःस परशुरामाचे वंशज मानतात. तेथें परशुराम-शक अद्यापिहि चालूं आहे. या शकाला 'कोल्लमआंडु' असें म्हणतात.

याप्रमाणें परशुरामानें पश्चिम व दक्षिण किनाऱ्यावरील आदिवासी जनतेंत आर्यसंस्कृतीचा प्रसार केला. परशुराम चिरंजीव आहेत असें मानलें जातें.

परशुरामचरित्रापासून आपणांस रामायणपूर्वकालीन आर्यांच्या जीवनाची माहिती मिळते. या काळीं आर्य लोकांचा हिंदुस्थानांत प्रवेश होऊन कांहीं वर्षें लोटलीं होतीं. हिंदुस्थानांत आलेले हे आर्य लोक इराण देशांतून इकडे आलेले दिसतात. परशुरामाचे शस्त्र परशु याचा संबंध पर्शिया म्हणजे इराण या देशाशीं जोडतां येतो. यावरून परशुराम हा पर्शियांतून आलेला असावा असें दिसतें. या काळीं आर्य लोकांनीं हिंदुस्थानांतील नद्यांच्या कांठीं आपल्या वसाहती स्थापन केल्या होत्या. या वसाहतींची मर्यादा नर्मदा नदीपर्यंत जाऊन थडकलेली दिसते. कारण कार्तवीर्य हा नर्मदा तीरावरील महिष्मती नगरीचा राजा होता व नर्मदा नदीच्या तीरावर जमदग्नि ऋषींचा आश्रम होता. नद्यांच्या तीरावरील रम्य वातावरणांत एकान्तवासांत राहून तत्कालीन ऋषी-मुनी तपाचरण करीत. या काळीं समाजांत चातुर्वर्ण्य प्रस्थापित झालें होतें. तथापि तें माणसाच्या गुणकर्मावरून ठरत असें दिसतें. याप्रमाणें विश्वामित्र हा जन्मानें क्षत्रिय असून देखील कर्मानें ब्राह्मण झाला होता व परशुराम हा जन्मानें ब्राह्मण असून देखील कर्मानें क्षत्रिय ठरला आहे. यावरून 'आचारात् द्विज उच्यते' हा दंडक या काळीं प्रचलित दिसतो. असें असलें तरी या काळीं ब्राह्मण व क्षत्रिय लोकांत थोडा झगडा उत्पन्न झालेला दिसतो. ब्राह्मण लोक स्वत:स श्रेष्ठ समजूं लागलेले दिसतात. त्याचप्रमाणें क्षत्रिय लोक देखील आपल्या सामर्थ्यामुळें उन्मत्त झालेले दिसतात. अशा क्षत्रियांना वठणीवर आणण्यासाठीं परशुरामानें शस्त्र धारण केलें आहे.

या काळीं भिन्नवर्णीय स्त्रीपुरुषांमध्यें विवाह होत असत. अशा दांपत्यापासून जन्मास आलेली संतति पित्याच्या वर्णाची समजली जाई. स्त्रियांच्या नैतिक आचरणाबद्दल या काळांत अत्यंत दखल घेतली जाई. त्यामुळेंच

रेणुकेच्या मनांत यत्किंचित् देखील पापवासना उद्भवल्याचा संशय येतांच जमदग्नि तिला देहदंडाची शिक्षा सांगतो. या काळीं स्त्रिया पतीच्या आज्ञेंत राहात व क्वचित्प्रसंगीं पतिनिधनानंतर सतीहि जात. आर्य कुटुंबांत गाईचें फार महत्त्व असें. गाईपासून त्यांना आवश्यक तें अन्न मिळत असल्यामुळें तिची प्रतिष्ठा आर्यसमाजांत स्वाभाविकपणेंच वाढली होती. त्यामुळेंच कामधेनूचें हरण करण्याची कार्तवीर्यास बुद्धि झालेली दिसते आणि कामधेनु प्राप्त करून घेण्यासाठीं भयंकर संगर करण्याची परशुरामाचीहि तयारी दिसते.

या काळांत धनुर्विद्येंत पारंगतता प्राप्त करून घेण्यासाठीं क्षत्रिय पुरुष झटत असत. परशुरामानें भीष्म, द्रोण व कर्ण यांना धनुर्विद्येचें शिक्षण दिलें होतें. तथापि कर्णानें त्याची वंचना केल्यामुळें त्यानें त्यास शाप दिला. यावरून या काळीं वर्णभेदाची तीव्रता वाढूं लागल्याचें दिसून येतें; किंवा परशुरामाच्या मनांतील क्षत्रियांबद्दलची अढी तरी अखेरपर्यंत नष्ट न झालेली दिसते. एरव्हीं कर्णानें केवळ विद्यार्जनाच्या तळमळीनें आपली फ़सवणूक केली असा उदार विचार मनांत आणून परशुरामानें त्याला विद्यादान करण्यास कोणत्याहि प्रकारची हरकत दिसत नाहीं. रामायण-पूर्वकालांतील परशुराम आपणांस महाभारतीय कालांतहि दृष्टीस पडतो. याचा नीटसा उलगडा करणें कठीण आहे. तथापि त्या काळीं सामान्यतः भारतीयांची आयुर्मर्यादा बरीच असावी असें दिसतें. कोंकण व मलबारच्या किनाऱ्यावर परशुरामाच्या वंशजांनीं वसाहती स्थापन केलेल्या दिसतात. अशा रीतीनें उत्तर हिंदुस्थानांत वास्तव्य करूं लागलेलीं आर्यांचीं कुळें हळूहळू दक्षिण हिंदुस्थान व्यापूं लागलीं असें दिसतें.

परशुरामाच्या चरित्रावरून आपणांस चालू काळांतहि योग्य तो बोध घेतां येण्यासारखा आहे. चालू काळांत राज्यतृष्णेच्या हावेनें जग महा-युद्धाच्या खाईत बुडत आहे. प्रत्येक राष्ट्र अणुबॉम्ब, हायड्रोजन बॉम्ब,

यासारखीं प्रचंड विध्वंसक अस्त्रें शोधून काढण्याच्या प्रयत्नांत आहे. सर्व जगावर जणु लष्करी जुलुमाची कृष्णछाया पसरूं पाहात आहे. या लष्करी उन्मादाचा आपण उच्छेद करून जगांत शांति, सुख, समृद्धि, समता, बंधुभाव, न्याय, नीति इत्यादींचें साम्राज्य उभविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. परशुरामजयंतीच्या निमित्तानें आपण या अन्याय्य लष्करी आक्रमणां-विरुद्ध प्रचार करून जनतेस स्वकर्तव्याबद्दल जागृत केलें पाहिजे.

## समवाय

१. आर्यांच्या हिंदुस्थानांतील आगमनाचा—विशेषतः इराणांतून इकडे येत असतांनाच्या स्थितीचा—इतिहास सांगा.
२. आर्यांच्या शस्त्रास्त्रांची माहिती सांगून त्यांत कसकशी उत्क्रांति झाली तें सांगा.
३. रामायणपूर्वकालीन आर्यांच्या सामाजिक स्थितीची माहिती द्या.
४. आर्यांच्या पश्चिम व दक्षिण किनाऱ्यावरील वसाहतींची माहिती द्या.
५. सद्यःकालीन लष्करी आक्रमणांचा इतिहास सांगा.
६. प्रा. श्री. म. माटे यांचें ‘ परशुरामचरित्र ’ नांवाचें पुस्तक वाचा.



# अक्षय्य तृतीया

वैशाख शु. तृतीयेस अक्षय्यतृतीया असें म्हणतात. चैत्र शु. ३ ला माहेरीं आलेली गौरी या दिवशीं स्वगृहीं जाते. त्यामुळें या दिवशीं स्त्रिया हळदकुंकु घेण्यासाठीं घरोघरीं जातात. खेड्यांतील स्त्रिया अक्षय्यतृतीयेचा सण अत्यंत आनंदांत साजरा करतात. या दिवशीं त्या प्रातःकाळीं उठून स्नानें करतात व रस्त्यांतून गाणीं गात गौरीविसर्जन करतात. नंतर मिष्टान्नाचें भोजन करून दुपारीं झाडांच्या फांद्यांना दोर बांधून गाणीं गात झोके घेतात.

अक्षय्यतृतीयेचा दिवस हा वास्तविक पाहतां श्राद्धदिन आहे. या दिवशीं पुरुष आपल्या मृत पितरांस तिलतर्पण करतात व त्यांस मातीच्या कोऱ्या भांड्यांतील गार पाणी पाजतात. अशा प्रकारें पितरांना गार पाण्याचें दान केल्यानंतर पुढें घरोघरीं गार पाणी पिण्यास सुरुवात होते. या दिवसांत उन्हाळयाचा कडाका अधिक भासत असल्यामुळें गार पाणी पिण्याची आव-

श्यकता वाटते. तथापि अक्षय्यतृतीयेच्या पूर्वी गार पाणी प्याल्यानें प्रकृतीस अपाय होण्याचा संभव असतो. त्यामुळें अक्षय्यतृतीयेच्या दिवशीं पितरांना गार पाण्याचें दान केल्यानंतर गार पाणी प्यावें अशी आपल्या पूर्वजांनीं मर्यादा घालून दिलेली दिसते. अक्षय्यतृतीयेच्या दिवशीं गार पाण्यानें भरलेले उदककुंभ ब्राह्मणास दान करण्याची प्रथा पडली आहे. जलदान करणें हें अक्षय्यतृतीयेचें वैशिष्टय असून या दिवसापासून ठिक-ठिकाणीं पाणपोया काढून पांथस्थांची व गुराढोरांची तृष्णा हरण करावी व प्राणिमात्रांची सेवा करावी. तसेंच उन्हाच्या प्रखर तापानें करपून जाणाऱ्या झाडांना देखील पाणी अर्पण करून जीवन द्यावें.

हिंदु लोक ३॥ शुभ मुहूर्त मानतात. त्यांपैकीं अक्षय्यतृतीया हा अर्धा मुहूर्त आहे. या शुभ मुहूर्तावर आरंभलेलें कार्य अक्षय्य म्हणजे अखंड चालू राहतें. त्यामुळें या दिवशीं एखादें नवीन कार्य अवश्य हातीं घेतलें पाहिजे. शेतकरी लोकांच्या कामास या दिवसापासून सुरुवात होते. शेतां-तील अनावश्यक झुडुपें तोडणें, काड्या–काटक्या वेचणें, शेत नांगरणें, खत घालणें, बीं तयार करणें इत्यादि अनेक प्रकारच्या कामांना शेतकरी लोक सामान्यतः या दिवसापासून सुरुवात करतात. शेतीचीं कामें अखंड चालू राहतात. अशा अखंड चालूं राहणाऱ्या शेतकीच्या कार्यास आपण या दिवसापासून आरंभ करणें योग्य होईल.

रोहिणी नक्षत्रांतील बुधवारीं येणारा अक्षय्यतृतीयेचा दिवस अधिक शुभ मानतात. अक्षय्यतृतीयेसंबंधीं एक कथा सांगतात, ती अशीः प्राचीन काळीं शाकल शहरांत धर्म या नांवाचा एक वाणी राहात असे. तो देव-ब्राह्मणांची पूजा करून नित्य धर्मकर्में करण्यांत रत असे. एकदां अक्षय्य-तृतीयेचें माहात्म्य त्याच्या कानावर पडलें. तेव्हांपासून त्यानें प्रत्येक अक्षय्यतृतीयेस नदींत आंघोळ करून पितृतर्पण करण्याचा व ब्राह्मणास धान्यानें भरलेले घट देण्याचा परिपाठ सुरू केला. कांहीं काळानंतर तो

वारला. पुढील जन्मीं त्याला पूर्वपुण्याईच्या जोरावर राज्यपद प्राप्त झालें. राज्यपद उपभोगीत असतांना त्यानें भरपूर दानधर्म केला. तथापि त्याला कधीं उणें पडलें नाहीं. अक्षय्यतृतीयेच्या व्रताचें पालन केल्यामुळें त्यास हें फळ प्राप्त झालें.

अक्षय्यतृतीयेच्या या कथेवरून आपण बोध घ्यावयाचा तो एवढाच कीं, या दिवशीं आपण यथाशक्ति दानधर्म केला पाहिजे. अर्थात् आपण करीत असलेला दानधर्म सत्पात्रीं होत आहे ना, इकडे आपण कसोशीनें लक्ष दिलें पाहिजे. अशा प्रसंगीं एखाद्या व्यक्तीस दानधर्म करण्यापेक्षां एखाद्या समाजोपयोगी संस्थेस दानधर्म करणें अधिक उचित होईल.

## समवाय

१. गौरीसंबंधींचीं स्त्रीगीतें शिकवा.
२. पेरणीपूर्वींच्या शेतीच्या कामाबद्दल माहिती द्या.
३. शेतकऱ्यांच्या कष्टमय जीवनाची ओळख करून द्या.
४. बागेतील झाडांस नित्य पाणी घालण्याचा परिपाठ सुरू करा.
५. शेतीचें एखादें नवीन काम हातीं घ्या.
६. गार पाणी प्याल्यानें शरीरास कसा अपाय होतो तें समजावून द्या.



# शंकर जयंती

श्रीमत् जगद्गुरु शंकराचार्य यांचा जन्म इ. स. ७८८ सालीं वैशाख शु. १० स झाला. मलबार प्रांतांत पूर्णा नदीच्या कांठीं कालडी नांवाचें एक गांव आहे. तेथें शिवगुरु नांवाचे नंबुद्री ब्राह्मण ज्ञातींतील एक भगवद्भक्त राहात असत. त्यांची पत्नी श्रीअंबिका ही मोठी पतिव्रता व सदाचरणी स्त्री होती. या दंपतीस बरेच दिवस मूलबाळ झालें नाहीं. तेव्हां त्यांनीं शंकराची आराधना केली. श्रीशंकराच्या कृपाप्रसादानें त्यांना पुत्ररत्न प्राप्त झालें. तेच श्रीमत् जगद्गुरु आद्य शंकराचार्य होत. श्रीशंकराचार्य चार वर्षांचे असतांनाच त्यांचे पिता शिवगुरु हे कालवश झाले. त्यानंतर शंकराचार्यांचा प्रतिपाळ त्यांच्या मातेनें केला.

शंकराचार्य पांच वर्षांचे झाले तेव्हां त्यांच्या मातेनें त्यांचा यथासांग उपनयनविधि केला. त्यानंतर शंकराचार्य आपल्या गुरुगृहीं राहूं लागले. शंकराचार्यांची ग्रहणशक्ति अनन्यसाधारण होती. ते एकपाठी होते.

त्यामुळें गुरुजींनीं दिलेला पाठ ते तावडतोब म्हणून दाखवीत. तें पाहून त्यांच्या गुरूंनीं त्यांना इतर शिष्यांना शिकविण्याचें काम दिलें. अल्प-वयांतच शंकराचार्यांनीं वेद, शास्त्र, निरुक्त, छंद, ज्योतिष, निघंटु इत्यादींचा अभ्यास पुरा केला. शंकराचार्यांच्या विद्वत्तेची कीर्ति दिवसेंदिवस अधिकाधिक पसरूं लागली. या वेळीं त्यांनीं आपल्या सामर्थ्याचे कांहीं चमत्कारहि करून दाखविले असें सांगतात. अशा प्रकारें कीर्तिमान् व विद्वान् होऊन शंकराचार्य स्वगृहीं परत आले.

शंकराचार्यांना स्वगृहीं परत आलेले पाहून श्रीअंबिकेला परम संतोष झाला. तिनें आपल्या विद्वान् व कीर्तिमान् मुलाचा विवाह करण्याचा विचार केला. तथापि शंकराचार्य विवाहास तयार नव्हते. त्यांना गृहस्थाश्रम स्वीकारण्यापूर्वींच संन्यासदीक्षा घ्यावयाची होती. हा विचार त्यांनीं आपल्या मातेजवळ बोलून दाखविला. तो ऐकून श्रीअंबिकेस अत्यंत वाईट वाटलें. तिनें शंकराचार्यांची परोपरीनें समजूत घालण्याचा प्रयत्न केला. तथापि शंकराचार्य विवाहास तयार होईनात व श्रीअंबिका त्यांना अनुमति देईना. अखेरीस शंकराचार्यांना मोठ्या योगायोगानें संन्यासदीक्षा घेण्यास अनुमति मिळाली. एकदां पहाटेच्या वेळीं नित्याप्रमाणें शंकराचार्य पूर्णा नदीवर स्नानासाठीं गेले असतां नदींतील मगरीनें त्यांचा पाय पकडला. हां हां म्हणतां ही बातमी श्रीअंबिकेपर्यंत जाऊन पोहोंचली. तेव्हां तिचा जीव अगदीं उडून गेला. ती धावत धावतच पूर्णा नदीच्या तीरावर आली व तेथें तिनें आकांत मांडला. आपल्या भयाकुल मातेचा आकांत ऐकून श्रीशंकराचार्य तिला म्हणाले, “ आई, ही मगरी आतां मला येथून सोडीत नाहीं. मला संन्यासदीक्षा घेण्याची तूं परवानगी देणार असशील तर ही कदाचित् मला सोडील.” शंकराचार्यांचे ते बोल ऐकून त्या प्रेमळ मातेनें त्यांस संन्यासदीक्षा घेण्यास अनुमति दिली. आणि आश्चर्य असें कीं, त्या मगरीनेंहि शंकराचार्यांचा पाय सोडून त्यांना मुक्त केलें.

त्यानंतर शंकराचार्य नर्मदातीरावरील गुरु गोविंदनाथ यांच्या आश्रमांत राहिले. तेथें त्यांनीं संन्यासदीक्षा घेतली. कांहीं कालानंतर गुरु गोविंद-नाथांनीं शंकराचार्यांना काशीस जाऊन स्वमताचा प्रचार करण्याची आज्ञा केली. त्याप्रमाणें शंकराचार्य काशीस येऊन राहिले. तेथें त्यांनीं आपल्या अद्वैतमताचा प्रचार केला. त्या काळीं बौद्ध धर्मास ग्लानि आली होती. समाजांत अनाचार वाढला होता. नास्तिकवादाचा पुरस्कार करणारा पंथ निर्माण झाला होता. लोक परमेश्वरभक्तीस विसरले होते. सदाचरणास पारखे झाले होते. भारतीय जनतेची ही धर्माबद्दलची अनास्था पाहून शंकराचार्यांनीं तिला उपदेश करण्यास आरंभ केला. त्यांनीं जुन्या वैदिक धर्माचें पुनरुज्जीवन केलें. त्यांतील यज्ञयागांसारख्या विधींचा पुरस्कार केला. भगवद्गीतेंत सांगितलेल्या कर्ममार्गाचें श्रेष्ठत्व प्रस्थापित केलें. संन्यास व मूर्तिपूजा इत्यादींचें महत्त्व पटवून दिलें. अद्वैतवादाचा सिद्धान्त मांडला. सर्व भूतमात्रांच्या ठायीं एकच आत्मा वसत असून तो परमात्मस्वरूप आहे या महत्तत्त्वाचें दर्शन घडवून दिलें.

अर्थात् हें कार्य करीत असतांना श्रीशंकराचार्यांना तत्कालीन अनेक पंडितांशीं वाद घालून त्यांच्या मतांचें खंडन करावें लागलें. त्या काळीं कुमारिलभट्ट या नांवाचे एक विद्वान् पुरुष होते. शंकराचार्यांनीं त्यांची गांठ घेतली. तथापि शंकराचार्य कुमारिलभट्टांकडे आले त्यावेळीं ते चिता पेटवून कृतकर्माबद्दल प्रायश्चित्त घेण्याच्या तयारींत होते. तें पाहून शंकरा-चार्यांचा कंठ सद्गदित झाला. तेव्हां कुमारिलभट्टांनीं त्यांचें सांत्वन करून त्यांना आपला मेहुणा मंडनमिश्र व बहीण सरस्वती यांजकडे जाण्याबद्दल सुचविलें. त्याप्रमाणें शंकराचार्य मंडनमिश्र यांच्याकडे गेले. त्यांनीं मंडन-मिश्राशीं धर्मचर्चा केली. या धर्मचर्चेंत हरल्यास आपण शंकराचार्यांचें शिष्यत्व पत्करण्यास तयार आहोंत असें मंडनमिश्रानें प्रथमच कबूल केलें. दोहोंत धर्मवाद चालूं झाला. या वादाचा निर्णय देण्याचें कार्य मंडन-

मिश्राची पत्नी सरस्वती हिजकडे होतें. सरस्वती ही महापंडिता होती. तिनें वादाचा निकाल शंकराचार्यांच्या बाजूनें दिला. तेव्हांपासून मंडन-मिश्रानें शंकराचार्यांचें शिष्यत्व पत्करलें.

नंतर शंकराचार्यांनीं स्वमताचा प्रचार करण्यासाठीं जगन्नाथपुरी, द्वारका, बद्रीकेदार व शृंगेरी असे चार ठिकाणीं आपले मठ स्थापन केले. श्रीशंकराचार्यांनीं केलेलें हें कार्य बहुमोल आहे. त्यामुळें वैदिक धर्मास विशिष्ट वळण लागून त्यास उर्जितावस्था प्राप्त झाली. बौद्ध धर्मात माजलेल्या अनीतिकारक गोष्टींमुळें श्रीशंकराचार्यांनीं उपदेशिलेल्या धर्माचा फार झपाट्यानें प्रसार झाला. अशा प्रकारचें महान् कार्य करून वयाच्या अवघ्या बत्तिसाव्या वर्षीं श्रीशंकराचार्य बदरिकेदार येथें समाधिस्थ झाले. श्रीशंकराचार्यांनीं ब्रह्मसूत्रें, श्रीभद्भगवद्गीता व उपनिषदें इत्यादींवर सुंदर भाष्यें लिहिलीं आहेत.

श्रीशंकराचार्यांची जयंती साजरी करतांना त्यांचें चरित्र आपण विद्यार्थ्यांच्या समोर ठेवलें पाहिजे. तत्कालीन धार्मिक स्थितीचें सिंहावलोकन करून, त्या परिस्थितींत श्रीशंकराचार्यांनीं वैदिक धर्माची घडी नीट बस-विण्यासाठीं कोणते परिश्रम घेतले या गोष्टींबद्दल माहिती दिली पाहिजे. श्रीशंकराचार्यांनीं अद्वैतमताचा पुरस्कार केला. माणसांमाणसांतील श्रेष्ठ-कनिष्ठत्व, उच्च-नीचत्व, भेदाभेद इत्यादि गोष्टी त्यांना मान्य नव्हत्या. एवढेंच नव्हे, तर अस्पृश्यता ही देखील त्यांना मान्य नव्हती. श्रीशंकरा-चार्यांच्या चरित्रांत त्यासंबंधींची एक मजेदार रूपककथा आढळते. एकदां श्रीशंकराचार्य हिंडत असतांना वाटेंत त्यांना एक चांडाळ भेटला. तेव्हां श्रीशंकराचार्यांनीं त्याचा विटाळ होऊं नये म्हणून त्यास बाजूला व्हावयास सांगितलें. तें ऐकून तो चांडाळ चकित झाला. त्यानें शंकराचार्यांशीं युक्ति-वाद केला. तो म्हणाला, "महाराज, आपण मला 'दूर हो' असें म्हटलेंत खरें. परंतु तें आपण माझ्या आत्म्याला म्हटलेंत कीं, माझ्या देहाला? आपण माझ्या आत्म्याला 'दूर हो' असें म्हटलें असलें तर तुमचा आणि माझा

आत्मा भिन्न नाहीं. बरें, माझ्या शरीराला आपण ‘दूर हो’ असें म्हटलें असलें तरी शरीररचनेच्या दृष्टीनें तुमच्या आणि माझ्या शरीरांत कांहीं फरक नाहीं. तेव्हां आपण ‘दूर हो’ असें म्हटलेंत तरी कोणाला आणि कां?” चांडाळाचा ता युक्तिवाद ऐकून शंकराचार्य चकित झाले. त्यांचा सारा अभिमान गळाला व त्यांनीं त्या शिवस्वरूप चांडाळाचे पाय धरले.

श्रीशंकराचार्यांच्या जयंतीच्या निमित्तानें हा संदेश आपण घरोघर पोंचविला पाहिजे. हिंदु धर्मांतील अठरापगड जातींचें स्तोम नष्ट करून व अस्पृश्यतेचा कलंक धुऊन समता, सहिष्णुता, बंधुभाव इत्यादींचा पुरस्कार करणाऱ्या हिंदु धर्माचें माहात्म्य पटवून दिलें पाहिजे. श्रीशंकराचार्यांनीं पंचायतनपूजेचा पुरस्कार करून अनेक दैवतांची उपासना करणाऱ्या लोकांना एकत्र आणलें. हा एकीचा संदेश आपण शंकरजयंतीच्या निमित्तानें सर्वत्र पोंचविला पाहिजे. चराचरांत सर्वत्र एकच परमेश्वर भरून राहिला आहे हें तत्त्व आपण पटवून दिलें पाहिजे.

## समवाय

१. आठव्या शतकांतील वैदिक धर्माच्या स्थितीचें समालोचन करा.
२. श्रीशंकराचर्यांनीं वैदिक धर्मात कोणत्या नवीन गोष्टींचा अंतर्भाव केला तें सांगा.
३. बौद्ध धर्मास या काळांत कां दुरवस्था प्राप्त झाली याचीं कारणें सांगा.
४. गीताधर्मांतील कर्ममार्गाची स्थूलमानानें ओळख करून द्या.
५. जैन, बौद्ध व हिंदु धर्म यांच्या शिकवणुकींतील ठळक गोष्टी विद्यार्थ्यांच्या नजरेसमोर आणून द्या.
६. शंकराचार्यांच्या पीठांबद्दल माहिती द्या.
७. शंकराचार्यांचें चरित्र कथन करा.



# बुध्द जयंती

सिद्धार्थ गौतम बुद्धांनीं बौद्ध धर्माची स्थापना केली. त्याबरोबरच त्यांनीं मानवतेची अपरंपार सेवा केली. गौतम बुद्धांचा जन्म इ. स. पूर्वी ५६३ सालीं झाला. हल्लींच्या नेपाळ प्रांताच्या सरहद्दीलगत प्राचीन काळीं कपिलवस्तु नांवाचें एक नगर होतें. या नगरांत शुद्धोदन नांवाचा राजा राज्य करीत असे. त्यास मायावतीदेवी व महाप्रजापतीदेवी अशा दोन बायका होत्या. त्यांपैकीं गौतम बुद्धांनीं मायावतीदेवीच्या पोटीं लुंबिनी वनांत जन्म घेतला. मायावतीदेवीनें आपल्या बाळाचें नांव सिद्धार्थ असें ठेवलें. सिद्धार्थजन्मानंतर अवघ्या सातच दिवसांत मायवतीदेवी मरण पावली. त्यानंतर सिद्धार्थाचा सांभाळ महाप्रजापतीदेवीनें केला. बाळपणीं सिद्धार्थाच्या शरीरावर कौंडिण्य नांवाच्या एका ज्योतिषास बत्तीस सुलक्षणें आढळून आलीं. तीं पाहून तो शुद्धोदनास म्हणाला, "राजा, तूं मोठा भाग्यवान् आहेस. तुझा पुत्र महापराक्रमी सम्राट् होईल; अथवा तो विरागी होऊन जगास शाश्वत सुखाचा व शांतीचा मार्ग दाखवील."

सिद्धार्थाबद्दलची ही भविष्यवाणी ऐकून शुद्धोदन विचारांत पडला. सिद्धार्थानें पराक्रमी बनून सम्राट् व्हावें अशी त्याची इच्छा होती. त्यानें वैराग्य धारण करून दारोदार भिक्षा मागत हिंडावें या गोष्टीची नुसती कल्पनाहि शुद्धोदनास सहन होत नव्हती. त्यामुळें त्यानें सिद्धार्थास नित्य सुखांत व विलासांत निमग्न ठेवण्याचा प्रयत्न केला. सिद्धार्थास जीवितां-तील दुःखांचें यत्किंचितहि दर्शन घडूं नये यासाठीं त्यानें कडेकोट बंदो-बस्त केला. त्यानें सिद्धार्थासाठीं सुंदर राजवाडे बांधविले. फुलांनीं नित्य बहरलेल्या बागा उभविल्या. सिद्धर्थाच्या सेवेसाठीं सुंदर स्त्रिया ठेवल्या. सुख, सौंदर्य, संगीत, विलास यांचा त्यानें सिद्धार्थाभोंवतीं नुसता पाऊस पाडला !

सिद्धार्थ या सुखांत निमग्न झाला असें आतां शुद्धोदनास वाटूं लागलें. सिद्धार्थानेंहि त्याबद्दल कधीं आपली नापसंती दर्शविली नाहीं. तो युद्ध-कलेंत निपुण झाला. पुढें यथाकाल त्याचा यशोधरा नांवाच्या एका सुस्वरूप स्त्रीशीं विवाह झाला. तथापि या सर्व गोष्टींत सिद्धार्थाला खरें सुख वाटेना. लहानपणापासून त्यास एकान्तांत बसून विचार करण्याची संवय जडली होती. ती आतां उत्तरोत्तर वाढत चालली. एके दिवशीं सिद्धार्थ कपिलवस्तु नगरांतील जीवन पाहण्यासाठीं बाहेर पडला. त्या वेळीं त्यास जरा-व्याधींनीं जर्जर झालेल्या लोकांचें दर्शन घडलें. तें पाहून सिद्धार्थाच्या मनांत विचारांची वावटळ सुरू झाली. कपिलवस्तु राज्यांतील शाक्य लोकांची शेजारच्या कोलिय टोळींतील लोकांशीं रोहिणी नदीच्या पाण्या-वरून नित्य भांडणें होत. त्यांचें पर्यवसान युद्धांत होई. या हिंसक युद्धां-चाहि सिद्धार्थास वीट आला होता. त्यामुळें मानवी जीवनांतील जन्म, जरा, व्याधि आणि मृत्यु या दुःखकारक गोष्टींतून मुक्त होऊन अजात, अजर, अव्याधि, अमर व अशोक अशा जीवनाचा तो मार्ग शोधूं लागला. या गोष्टीबद्दल विचार करतां करतां सिद्धार्थ कित्येक वेळपर्यंत ध्यानमग्न बसे. अशा रप्रकोंध्यानमग्न राहून चिंतन केल्यानें इष्ट त्या गोष्टींचें ज्ञान

प्राप्त होतें असें त्यानें जैन साधूंच्या जीवनावरून पाहिलें होतें. सिद्धार्थ दिवसेंदिवस अधिकाधिक ध्यानस्थ राहूं लागला. तथापि त्याच्या मनाची शांति होईना. अंतःकरणांत चाललेली ही तळमळ शमविण्यासाठीं त्यानें गृहस्थाश्रमाचा त्याग करण्याचें ठरविलें. या वेळीं सिद्धार्थ गौतमास राहुल नांवाचा एक पुत्रहि झाला होता. तथापि त्यानें मायामोहाचे सर्व पाश तोडून एके रात्रीं राजवाड्याचा त्याग केला.

राजवाड्याचा त्याग केल्यानंतर गौतमानें अनोमा नदीच्या कांठीं आपलीं उंची वस्त्रें फेंकून दिलीं. त्यानें संन्याशाचा वेश धारण केला व तो राजगृहांत भिक्षा मागून जीवन कंठूं लागला. राजगृहास त्या वेळीं बिंबिसार नांवाचा राजा राज्य करीत असे. त्यानें एकदां गौतमाचें दर्शन घेऊन त्यास आपलें राज्य देऊं केलें. तथापि गौतम राज्यसुखावर लाथ मारून निघाला होता. राज्यलोभांत तो पडतो कशाला? त्याला शाश्वत सुखाचा मार्ग शोधावयाचा होता. तथापि नुसत्या संन्यस्तवृत्तीनें राहून शाश्वत सुखाचा मार्ग त्याला कसा सांपडणार? 'सद्गुरुवांचूनी सांपडेना सोय' असें पाहून गौतम कांहीं दिवस आडार कालाम व उद्दक रामपुत्त या साधूंच्या सहवासांत राहिला. तथापि या साधूंकडूनहि त्याला अपेक्षित ज्ञान प्राप्त होईना. तेव्हां त्या साधूंचा त्याग करून तो पुढें चालूं लागला. उरुवेला येथें त्यास देह कष्टवून तपाचरण करणारे श्रमण पंथाचे पांच साधू भेटले. गौतम कांहीं दिवस त्यांच्याजवळ राहिला. त्यानें देह कष्टवून घोर तपश्चर्या मांडली. त्यामुळें तो अगदीं कृश झाला. एकदां तर तपश्चर्या करीत असतांना गौतमास भयंकर ग्लानि आली. त्या वेळीं सुजाता नांवाच्या गवळणीनें त्यास खीर पाजून शुद्धीवर आणलें. अशा प्रकारें देह कष्टवून इच्छित ज्ञान प्राप्त होत नाहीं या गोष्टीची खात्री पटतांच गौतमानें त्याहि मार्गाचा त्याग केला.

गौतम आतां नैरंजना नदीच्या कांठीं राहूं लागला. नैरंजना नदीच्या

कांठीं एक पिंपळाचें झाड होतें. त्या झाडाखालीं ध्यानमग्न राहून गौतम विचार करूं लागला.

अशा प्रकारें ध्यानमग्न स्थितींत असतांना गौतमाचें कोडें हळूहळू सुटत चाललें. एके दिवशीं गौतमास जीवित हें 'दुःखमय असून त्या दुःखाच्या बुडाशीं आसक्ति हें कारण आहे' असा विचार स्फुरला. आसक्तीचा नाश केल्याखेरीज शाश्वत सुखाची अभिलाषा बाळगणें व्यर्थ आहे अशी त्याची खात्री झाली. तो दिवस वैशाख पौर्णिमेचा होता. या दिवशीं गौतमास शाश्वत सुखाच्या मार्गाचें खरें ज्ञान झालें, तो बुद्ध झालां. म्हणून गौतम बुद्धाची जयंती साजरी करतात.

त्यानंतर कांहीं दिवस भगवान् बुद्ध त्याच अश्वत्थ वृक्षाखालीं आणखी विचार करीत बसले. या काळांत त्यांजकडे मार या नांवाचा शत्रु आला. त्यानें भोगवासना, असंतोष, क्षुधा, तृष्णा इत्यादि सेनेसहित भगवान् बुद्धांचा तपोभंग करण्याचा प्रयत्न केला. परंतु भगवान् बुद्धांनीं त्यास पराजित केले. त्यानंतर भगवान् बुद्धांनीं आपल्या ज्ञानाचा प्रसार करण्यासाठीं त्या स्थानाचा त्याग केला. ते आडार कालाम व उद्दक रामपुत्त या आपल्या पूर्वींच्या गुरूंना नवीन ज्ञानाचा मार्ग दाखविण्यासाठीं निघाले. तथापि ते दोघेंहि या वेळीं मृत्यु पावले होते. त्यामुळें भगवान् बुद्धांचा नाइलाज झाला. त्यानंतर त्यांनीं आपल्यां पूर्वींच्या पांच सहकाऱ्यांस उपदेश करून शाश्वत सुखाच्या मार्गाचें धर्मचक्रपरिवर्तन केलें. भगवान् बुद्धांच्या या उपदेशास 'बौद्ध धर्म' असें म्हणतात.

बौद्ध धर्माचीं तत्त्वें बहुजन समाजास सहज समजतील अशी आहेत. त्यांना चार आर्यसत्यें म्हणतात. या चार आर्यसत्यांच्या साधेपणामुळें बौद्ध धर्म श्रेष्ठांपासून कनिष्ठांपर्यंत सर्वांस आवडूं लागला. भगवान् बुद्धांनीं कामोपभोग व देहदंड या दोन्ही टोकांचा त्याग करून त्यांतून एक मधला मार्ग शोधून काढला. त्यास अष्टांगमार्ग असें म्हणतात. या अष्टांग-

मार्गांत सम्यक्‌दृष्टि, सम्यक्‌संकल्प, सम्यक्‌वाचा, सम्यक्‌कर्मान्त, सम्यकआजीव, सम्यक्‌व्यायाम, सम्यक्‌स्मृति व सम्यक्‌समाधि या तत्त्वांचा अंतर्भाव होतो. ( १ ) सम्यक्‌दृष्टि म्हणजे चार आर्यसत्यांचें ज्ञान. जग हें जन्म, जरा, व्याधि आणि मरण यांनीं दुःखमय बनलें आहे; या दुःखाचें मूळ आसक्ति अथवा तृष्णा आहे; ही तृष्णा नष्ट केली पाहिजे; ती नष्ट करण्यासाठीं अष्टांगमार्गाचें आचरण केलें पाहिजे, हीं तीं चार आर्य-सत्यें होत. यासच सम्यक्‌दृष्टि असें म्हणतात. ( २ ) अशा प्रकारची सम्यक्‌दृष्टि प्राप्त करून घेण्यासाठीं माणसानें सम्यक्‌संकल्प केला पाहिजे. ‘माझें तें माझें व तुझें तेंहि माझें’ अशी स्वार्थी वृत्ति सोडली पाहिजे. या स्वार्थी वृत्तीमुळेंच जगांत अनेक अनर्थ घडतात. ( ३ ) अर्थात् जगांतील अनर्थांच्या बुडाशीं केवळ स्वार्थी वृत्तीच नाहीं. तोंडांतून एकादा अपशब्द निघाला, असत्य भाषण झालें, निंदा घडली तरी देखील अनर्थास सुरुवात होतें. त्यामुळें आपल्या तोंडून नित्य शुद्ध व गोड वाणी स्रवली पाहिजे. म्हणजेच आपण सम्यक्‌वाचा या तत्त्वाचें आचरण केलें पाहिजे. ( ४ ) प्रतिदिनीं आपण अनेक प्रकारचीं कर्में करतों. हीं कर्में करतांना आपण सतत परहित साधण्याची तत्परता बाळगली पाहिजे. यालाच सम्यक्‌कर्मान्त असें म्हणतात ( ५ ) आपली उपजीविका करतांना देखील आपण दक्षता घेतली पाहिजे. दुसऱ्यास अपाय होईल अशा रीतीनें उपजीविका करणें अयोग्य आहे. अशा प्रकारें आपण साम्यक् आजीव बनलें पाहिजे ( ६ ) मनांतील कुविचार काढून टाकून त्याऐवजीं सुविचारांची व सद्भावनांची स्थापना केली पाहिजे. या दृष्टीनें आपण आपल्या मनास वळण लावण्याचा प्रयत्न करणें म्हणजेच सम्यक्‌व्यायाममार्गाचा अवलंब करणें होय. (७) त्याचप्रमाणें मनांत सारासार विवेकबुद्धि सतत जागृत ठेवली पाहिजे. यासच सम्यक्‌स्मृति असें म्हणतात. (८) इतकें सर्व करूनहि चित्ताची एकाग्रता साधल्याशिवाय आपल्या हातून कोणतेंहि कार्य पार पडणें कठीण असतें.

म्हणून आपण एकचित्त व ध्यानमग्न बनलें पाहिजे. यासच सम्यक्-समाधि असें म्हणतात.

भगवान् बुद्धांनीं सांगितलेला हा अष्टांगमार्ग हळूहळू जनतेचीं मनें आकर्षित करूं लागला. त्यामुळें दिवसेंदिवस त्यांचा शिष्यपरिवार वाढत चालला. बौद्ध धर्मात जातिभेदास, जन्मजात श्रेष्ठकनिष्ठत्वास थारा नसल्यामुळें स्वाभाविकपणेंच त्याचा झपाट्यानें प्रसार होऊं लागला. भगवान् बुद्धांनीं धर्मप्रसारासाठीं आपले शिष्य ठिकठिकाणीं पाठविले. त्यांचे निरनिराळे संघ स्थापन झाले. या बौद्ध भिक्षूंनीं सामान्य जनतेंत जागृति करून तिला प्रेमाच्या व अहिंसेच्या मार्गाचा अवलंब करण्याची थोर शिकवण दिली. त्यानंतर भगवान् बुद्ध राजगृह येथें गेले. त्यांनीं तेथील बिंबिसार राजाची भेट घेऊन त्यास बौद्ध धर्माची दीक्षा दिली. राजाश्रय मिळाल्यामुळें बौद्ध धर्माच्या प्रसारास मोलाची मदत झाली. भगवान् बुद्धांची ही कीर्ति शुद्धोदन राजाच्या कानीं जाऊन पोहोंचली. तेव्हां तो त्यांच्या दर्शनासाठीं तळमळूं लागला. भगवान् बुद्धांनीं कपिल-वस्तूला जाऊन तेथील सर्वांना बौद्ध धर्माची दीक्षा दिली. याप्रमाणें अल्पकाळांतच उत्तर भारतांत बौद्ध धर्माचा बराच प्रसार झाला. बिहार प्रांत तर बौद्ध भिक्षूंच्या विहारांनीं गजबजून गेला. त्याचमुळें पुढें त्यास ‘ बिहार ’ असें नांव प्राप्त झालें.

बौधद्धर्मीय भिक्षूंच्या संघांतील शिस्त अत्यंत कडक असे. ते आपली संघटना करून एकत्र राहात व संघाचे नियम पाळीत. श्रेष्ठ व्यक्तींचा आदर ठेवणें, शीलाची चाड बाळगणें, ब्रह्मचर्यव्रताचें पालन करणें, वासनांचें दमन करणें, एकान्तवासांत ध्यानमग्न राहणें व अधिकाधिक ब्रह्मचारी मिळवून त्यांना भगवान् बुद्धांच्या धर्माचें ज्ञान देणें हें त्यांचें कार्य असे. अन्न, वस्त्र व शयन यांचा ते जरूरीपुरताच उपभोग घेत. संग्रह व परिग्रह या गोष्टींना तेथें थारा नसे.

बौद्ध भिक्षूंच्या या संघांत प्रथम स्त्रियांना मज्जाव असे. तथापि भगवान् बुद्धांची मावशी महाप्रजापतीदेवी हिनें आग्रह धरल्यावरून भगवान् बुद्धांनीं आपल्या संघांत स्त्रियांचा समावेश केला. मात्र ज्यांना संयम राखतां येणें अशक्य आहे अशा तरुण-तरुणींना तेथें मज्जाव असे. पुढें अशा लोकांचा ज्या वेळीं संघांत भरणा होऊं लागला त्या वेळेपासून बौद्ध धर्माच्या अधः-पातास सुरुवात झाली. मोक्षप्राप्तीसाठीं संसारत्याग करणें आवश्यक आहे असा मात्र याचा अर्थ नव्हे. संसारांत राहून व संघ स्थापन करून संघास व भगवान् बुद्धास शरण गेल्यानें निर्वाण लाभणें शक्य आहे अशी बौद्ध धर्माची शिकवण आहे. म्हणूनच 'बुद्धं शरणं गच्छामि। धर्मं शरणं गच्छामि। संघं शरणं गच्छामि।' हा बौद्ध धर्माचा महामंत्र बनला.

भगवान् बुद्धांनीं वयाच्या ८० वर्षापर्यंत असें धर्मचक्रपरिवर्तन केलें. त्यानंतर ते कुशिनगर येथें निर्वाणाप्रत पोहोंचले. भगवान् बुद्धांच्या निर्वाणा-नंतर इ. स. च्या सातव्या शतकापर्यंत हिंदुस्थानांत बौद्ध धर्माची भर-भराट होत गेली. या काळांत अशोक, कनिष्क व हर्षवर्धन इत्यादि सम्राटांनीं बौद्ध धर्माची अपरंपार सेवा केली. सम्राट् अशोकानें तर बौद्ध धर्माचा प्रसार करण्यासाठीं देशोदेशीं बौद्ध भिक्षू पाठविले. त्यानें आपला पुत्र महेंद्र व कन्या संघमित्रा यांनाहि धर्मप्रचारार्थ सीलोन देशास पाठ-विलें. सम्राट् कनिष्काच्या कारकीर्दींत बौद्ध धर्मांत दोन पंथ निर्माण झाले. भगवान् बुद्धांची शिकवण जशीच्या तशी मान्य करणारांचा एक पंथ निर्माण झाला. त्यास 'हीनयान पंथ असें म्हणतात. बौद्ध धर्मांतील दुसरा पंथ 'महायान पंथ' हा होय महायानपंथीय लोकांनीं भगवान् बुद्धास परमेश्वरी अवतार मानून त्यांच्या मूर्तिपूजेचा व भक्तिमार्गाचा अवलंब केला.

बौद्ध धर्म आतां भारतांतून नष्ट झाला आहे. तथापि चीन, जपान तिबेट, ब्रह्मदेश, सीलोन इत्यादि देशांत आजहि त्याचे सुमारें पन्नास कोटी अनुयायी आहेत. बौद्ध धर्मगुरूंनीं धर्मप्रसारार्थ केलेल्या अविश्रांत

श्रमाचें तें फळ आहे. बौद्धधर्मीयांनीं जगांत सुखाचें व शांतीचें साम्राज्य निर्माण करण्याचा प्रयत्न केला. इ. स. च्या सुरुवातीपासून तों इ. स. च्या सातव्या शतकापर्यंत त्यांनीं बौद्ध धर्माचा प्रसार केला. चीन देशांत तर हें धर्मप्रसाराचें कार्य फारच झपाट्यानें चाललें होतें. तेथील लो यांग या प्रांतांत एकेकाळीं बौद्ध भिक्षूंचीं दहा हजार कुटुंबें धर्मप्रसाराचें कार्य करीत होतीं. चीन देशांत धर्मप्रसार करणाऱ्या या धर्मगुरूंपैकीं धर्मपाल, कुमारजीव, नागार्जुन, अश्वघोष, वसुबंधु व अमोघवज्र इत्यादींनीं भारतीय ग्रंथांचीं चिनी भाषेंत व चिनी ग्रंथांचीं भारतीय भाषांत भाषांतरें केलीं. चीन व हिंदुस्थान या देशांतील संस्कृतींची ही देवाणघेवांण अत्यंत महत्त्वाची आहे. या काळांत चीन देशांतील अनेक लोक हिंदुस्थानच्या पवित्र भूमीचें दर्शन घेण्यासाठीं व बौद्ध धर्माचें ज्ञान मिळविण्यासाठीं इकडे आले. त्यांपैकीं फा हैन, इत्सिंग व युंवॉन चांग (हुएनत्संग) यांचीं नांवें सुप्रसिद्ध आहेत.

बौद्धधर्मीयांनीं धार्मिक ज्ञानाबरोबरच इतरहि शास्त्रांचा अभ्यास केला. प्राचीन काळीं अत्यंत प्रसिद्धीस आलेल्या नालंदा, विक्रमशिला, मिथिला, अजिंठा येथील विद्यापीठांत ज्ञानदानाचें व ज्ञानार्जनाचें कार्य अखंड चालत असे. तेथें ज्ञान संपादन करण्यासाठीं चीन, तिबेट इत्यादि देशांतून अनेक लोक इकडे येत. बौद्धधर्मीयांनीं ग्रीक, शक व हूण इत्यादि लोकांचा अंतर्भाव करून धर्मविस्ताराच्या बाबतींत महान् कार्य केलें आहे. बौद्धधर्मीयांनीं ठिकठिकाणीं बांधलेले स्तूप, डोंगर पोखरून तयार केलेलीं कोरींव लेणीं, ठिकठिकाणीं कोरून ठेवलेले स्तंभलेख, शिला-लेख व ताम्रलेख इत्यादींच्या द्वारां भारतीय कलाकौशल्याची थोर सेवा केली आहे. भारतीय इतिहासाचें यथार्थ ज्ञान घडण्यास हीं फार महत्त्वाचीं साधनें आहेत. बुद्धजयंतीच्या निमित्तानें आपण या सर्व गोष्टींची माहिती मिळविली पाहिजे. हल्लींच्या काळांत देखील महात्मा गांधींसारख्या जगद्वंद्य पुढाऱ्यांनीं भगवान् बुद्धांचा संदेश देण्यासाठीं आपली उभी

हयात वेंचली, ही गोष्ट लक्षांत घेऊन आपण सर्व जगभर प्रेमाचें, अहिंसेचें व सदाचरणाचें साम्राज्य निर्माण करण्याच्या कार्यास लागलें पाहिजे व मानवजातीची सेवा केली पाहिजे. आपल्या मनांतील क्षुद्र भेदभाव टाकून देऊन त्याऐवजीं अखिल मानवजातीवर स्वार्थनिरपेक्ष व भेदातीत प्रेम करावयास शिकलें पाहिजे.

## समवाय

१. भगवान् बुद्धांच्या काळीं वैदिक धर्माची स्थिति कशी होती तें सांगा.
२. भगवान् बुद्धांच्या चारित्राचें कथन करून त्यांच्या सामाजिक व धार्मिक कार्याची ओळख करून द्या.
३. बौद्ध धर्माच्या प्रसाराचीं कारणें सांगा.
४. अशोक, कनिष्क व हर्षवर्धन इत्यादि सम्राटांनीं बौद्ध धर्माची कशी सेवा केली तें सांगा.
५. चिनी प्रवासी फा हैन, इत्सिंग व हुएनत्संग यांची माहिती देऊन त्यांच्या प्रवासवृत्तांचें ऐतिहासिक महत्त्व कथन करा.
६. नालंदा, विक्रमशिला, तक्षशिला इत्यादि विद्यापीठांची माहिती देऊन त्यांच्या कार्याची थोरवी लक्षांत आणून द्या.
७. बौद्ध धर्मप्रसारामुळें भारत कसा विशाल बनला तें सांगा.
८. जैन, बौद्ध व हिंदु तत्त्वज्ञानांचा तुलनात्मक विचार करा.
९. बौद्ध धर्मातील पंथाची माहिती देऊन त्याच्या ऱ्हासाचीं कारणें सांगा.
१०. विद्या, कलाकौशल्य व संस्कृति यांत बौद्धधर्मीयांनीं कोणती भर घातली तें निवेदन करा.
११. 'मानवतेचे पुजारी–' भाग १ व 'आशियाचे धर्मदीप' या पुस्तकांतील गौतम बुद्धाचीं चरित्रें वाचा.
१२. कवि वा. ना. देशपांडे यांच्या 'आराधना' या कवितासंग्रहांतील 'कपटवेष' हें नाट्यकाव्य वाचून त्याचें नाटयीकरण करून घ्या.

# दशहरा
## गंगोत्सव



ज्येष्ठ शुद्ध प्रतिपदेपासून तों शु. दशमीपर्यंत गंगा नदीच्या कांठीं गंगोत्सव साजरा करतात. या उत्सवास दशहरा असेंहि म्हणतात. भारतीय जीवनांत गगा नदीचें महत्त्व विशेष आहे. गंगा नदीस हिंदु लोक परम पवित्र मानतात. गंगेच्या पवित्र प्रवाहांत स्नान केल्यानें सर्व पापें नाहींशीं होतात असा समज आहे. त्यामुळें या दिवसांत गंगेच्या कांठीं भाविक लोकांचा मोठा मेळावा जमतो. या वेळीं लोक गंगेंत स्नान करून तिला फळें व रत्नें इत्यादि वाहतात व पितरांस पिंड देतात. प्राचीन काळापासून गंगा नदीस असें पावित्र्य निर्माण झालें आहे.

गंगा नदीच्या माहात्म्याचें वर्णन आजपर्यंत अनेक थोर कवींनीं केलें आहे. पुराणांतरीं गंगा नदीच्या जीवनासंबंधींच्या मजेदार कथा आढळतात. प्राचीन काळीं गंगा ही स्वर्गांत राहात असे असा समज आहे. गंगेचा उगम हिमालयांत झाला असल्यामुळें ती हिमालयांत म्हणजे स्वर्गांत राहते अशी कल्पना निर्माण झाली असावी. त्या काळीं गंगेचा प्रवाह-

हिमालयांतील कडक थंडीमुळें गोठून गेला होता असा या कथेचा आपण अर्थ घ्यावयाचा. पुढें कांहीं काळानंतर गंगा ही शंतनु राजाशीं विवाहबद्ध झाली व तिचा प्रवाह आर्यावर्तांत खेळूं लागला. या वेळीं गंगा शंतनु ( शम्–शपविणारी, कल्याणप्रद,+तनु–प्रवाह ) म्हणजे कल्याणी झाली. तथापि कालांतरानें गंगेचा प्रवाह पुन्हां गोठून गेला व ती हिमालयांत लुप्त झाली. हिमालयांत लुप्त झालेल्या गंगेस पुढें भगीरथ राजानें महत्प्रयासानें पृथ्वीवर आणलें. त्यामुळें तिला भागीरथी असेंहि म्हणतात. तेव्हांपासून तों आजपर्यंत गंगा नदी ही संयुक्तप्रांत, बिहार व बंगाल या प्रांतांतून वाहात असून तेथील असंख्य लोकांना जीवन देत आहे. गंगेच्या कांठीं सांचलेल्या गाळामुळें हा भाग अत्यंत सुपीक झाला असून धनधान्यांनीं समृद्ध बनला आहे. अशा जीवनदात्री गंगामातेस भाविक जनांनीं पवित्र व पापविनाशिनी मानावें यांत नवल तें काय ?

गंगावतरणाची कथा मोठी मनोरंजक आहे. प्राचीन काळीं इक्ष्वाकु कुलांत सगर नांवाचा एक राजा होऊन गेला. सगर राजाला एकंदर साठ हजार पुत्र होते. यावरून त्याच्या बलाची आपण कल्पना करावी. अशा बलवान् सगर राजानें अश्वमेध यज्ञ आरंभिला. त्यानें आपल्या सेनेसहित अश्वमेधाचा घोडा पृथ्वीवर संचार करण्यासाठीं सोडला. हा घोडा एके दिवशीं सर्वांची नजर चुकवून चरत चरत कपिलमुनींच्या आश्रमाजवळ जाऊन पोहोंचला. अश्वमेधाचा घोडा नाहींसा झाला असें पाहून सगर राजाचे साठ हजार पुत्र त्याच्या शोधार्थ निघाले. शोध करतां करतां ते कपिलमुनींच्या आश्रमाजवळ येऊन पोहोंचले. तेथें त्यांना अश्वमेधाचा घोडा चरत असतांना दिसला. तेव्हां कपिलमुनींनीं बुद्धिपुरस्सर आपला अश्वमेधाचा घोडा पळविला असा गैरसमज करून घेऊन त्यांनीं अद्वातद्वा बोलण्यास सुरुवात केली. सगरपुत्रांचें हें उद्दामपणाचें वर्तन पाहून कपिलमुनि संतापले व त्यांनीं सगरपुत्रांस शाप देऊन त्यांना जागच्या जागीं भस्म करून टाकलें !

इकडे अश्वमेधाचा घोडा व त्याबरोबरची सेना परत येत नाहीं असें पाहून सगर राजा चिंतातुर झाला. त्यानें आपला नातु अंशुमान् यास त्यांचा शोध करण्यासाठीं पाठविलें. शोध करतां करतां अंशुमान् कपिलमुनींच्या आश्रमापाशीं येऊन दाखल झाला. त्यास कपिलमुनींनीं घडलेला वृत्तान्त निवेदन केला. तो वृत्तान्त ऐकून अंशुमान् अत्यंत कष्टी झाला. त्यानें नम्रपणानें कपिलमुनींस विचारलें, "महाराज, आतां भस्मीभूत सगरपुत्रांचा उद्धार कसा होईल ?" त्यावर कपिलमुनींनीं उत्तर केलें, "या भूमीवरून गंगेचा प्रवाह वाहील तर सगरपुत्रांचा उद्धार होईल !" तें ऐकून अंशुमान् गंगा नदीला पृथ्वीवर आणण्याच्या खटपटीस लागला. तथापि त्यांत त्याला यश आलें नाहीं. अंशुमानानंतर त्याचा पुत्र दिलीप यानेंहि गंगेची प्रार्थना करून आपल्या पूर्वजांचा उद्धार करण्याचा प्रयत्न केला. परंतु दिलीप राजास देखील तें कार्य जमलें नाहीं. स्वपूर्वजांच्या उद्धाराचें हें कार्य अखेरीस दिलीपाचा पुत्र भगीरथ यानें केलें.

भगीरथानें घोर तपश्चर्या करून गंगामाईस प्रसन्न करून घेतलें व तिला पृथ्वीवर अवतरण्याबद्दल प्रार्थना केली. भगीरथाची ती प्रार्थना ऐकून गंगामाई प्रसन्न झाली व ती भगीरथास म्हणाली, "तुझ्या प्रार्थनेप्रमाणें मी पृथ्वीवर अवतरण्यास तयार आहें. तथापि पृथ्वीवर अवतरल्यानंतर लोक मला मलिन करतील त्याची वाट काय ? " गंगामाईची ती शंका ऐकून भगीरथानें उत्तर केलें, "पृथ्वीवर अवतरल्यानंतर मुनिजन तुला आपल्या पुण्यकर्मांनें पवित्र करतील." तें ऐकून गंगामाईचें समाधान झालें. ती पृथ्वीवर अवतरण्यास तयार झाली. तथापि पृथ्वीवर अवतरतांना आपला भार पृथ्वीस सहन होणार नाहीं, त्यासाठीं तिनें शंकरास प्रसन्न करून घेण्याबद्दल भगीरथास सुचविलें. भगीरथानें शंकराची आराधना करून त्यास प्रसन्न करून घेतलें. शंकरानें गंगामाईच्या प्रवाहाचा भार आपल्या शिरावर धारण करण्याचें कबूल केलें. त्याप्रमाणें ज्येष्ठ शु. १० स

गंगामाईचा प्रवाह स्वर्गातून पृथ्वीवर शंकराच्या जटांत पडूं लागला. तेथून पुढें प्रवाहित होऊन गंगामाई पृथ्वीवर वाहूं लागली व तिनें सगर-पुत्रांचा उद्धार केला.

गंगावतरणाच्यां या कथेपासून आपणांस बराच बोध घेतां येण्यासारखा आहे. भगीरथानें महत्प्रयास करून गंगामाईस पृथ्वीवर आणलें. त्यामुळें चिकाटीनें केलेल्या प्रयत्नास ' भगीरथ प्रयत्न ' असें म्हणण्याचा प्रघात पडला आहे. असा 'भगीरथ प्रयत्न' करून आपण आपलीं कामें तडीस नेलीं पाहिजेत. 'निश्चयाचें बळ, तुका म्हणे तेंचि फळ' हा तुकोबारायांचा संदेश लक्षांत घेऊन अंगीकृत कार्य तडीस नेण्यासाठीं प्रयत्नांची पराकाष्ठा केली पाहिजे. त्याचप्रमाणें भगीरथानें स्वपितरांच्या उद्धारासाठीं केलेला प्रयत्न लक्षांत घेऊन आपणहि आपल्या पूर्वजांची उज्ज्वल परंपरा सतत पुढें चालू ठेवण्याचा व पितृॠणांतून मुक्त होण्याचा संकल्प केला पाहिजे.

प्राचीन काळापासून गंगा नदीस जें पावित्र्य निर्माण झालें आहे त्याच्या पाठीमागें मोठा इतिहास आहे. प्राचीन काळीं उत्तर ध्रुवप्रदेशापासून भटकत भटकत आलेल्या आर्यांच्या टोळया कालांतरानें हिंदुस्थानच्या वेशी-पर्यंत येऊन ठेपल्या. हिंदुस्थानांत प्रवेश केल्यानंतर त्यांनीं गंगा नदीच्या कांठीं आपल्या वसाहती केल्या. गंगा नदीच्या सुपीक खोऱ्यांत आर्यांच्या जीवनास स्थैर्य प्राप्त झालें. त्यांचें जीवन अत्यंत सुखी व समृद्ध झालें. त्यामुळें गंगेच्या कांठीं आर्यसंस्कृति स्थिर होऊन विकसित झाली. त्याच संस्कृतीचा वारसा घेऊन आजपर्यंत आपण आपली सुधारणा करून घेतली आहे. भारतीय संस्कृति म्हणजे गंगा संस्कृति होय. गंगेचें माहात्म्य विलक्षण आहे. त्यामुळें आपल्या देशांतील सर्वच नद्यांना आपण 'गंगा' या नांवानें संबोधून त्यांच्या पावित्र्याचा गौरव करतों. नाशिक-जवळील गोदावरीच्या पात्रास गंगा असें म्हणतात. वाईजवळील कृष्णेसाह

'गंगा' असेंच म्हणतात. पंढरपूर येथील चंद्रभागाहि 'गंगा' याच नामाभिधानानें विभूषित केली जाते.

या सर्व नद्यांनीं जनतेचें जीवन सुखी, समृद्ध, स्थिर व शांतिमय करण्याचें महत्कार्य केलें आहे. जगाच्या इतिहासावरूनहि आपणांस याच गोष्टीचा प्रत्यय येतो. जीवनस्थैर्यासाठीं नदीच्या सान्निध्याची अत्यंत आवश्यकता असते. अर्थात् ज्या नद्यांचें पाणी कधीं आटत नाहीं व ज्यांचें पात्र रुंद व खोल असतें अशा नद्यांच्या कांठीं अधिक वस्ती होते. अशा नद्यांच्या कांठीं जीवनास स्थैर्य मिळाल्यामुळें संस्कृतीचा विकास होतो. प्राचीन काळीं उद्यास आलेल्या थोर संस्कृतींचें उगमस्थान तेथील जीवनदायी नद्यांतच असल्याचें आपणांस आढळून येतें. प्राचीन काळीं मेसोपोटेमिया देशांत युफ्राटिस व तैग्रिस नद्यांच्या कांठीं 'सुमेरियन संस्कृति' उद्यास आली. ईजिप्त देशांतील नाइल नदीच्या कांठीं 'मिसरी संस्कृति' विकसित झाली. चीन देशांतील हो अँग-हो नदीच्या कांठीं 'पीत संस्कृती'चा उदय झाला. आपल्या भारतांत देखील आर्य लोकांच्या आगमनापूर्वीं 'सिंधुसंस्कृति' प्रचलित होती. येथील द्रविड लोकांनीं सिंधु नदीच्या कांठीं आपल्या जीवनास स्थैर्य प्राप्त करून घेतलें होतें. मोहेन–जो–दरो व हराप्पा येथील उत्खननावरून इ. स. पूर्वीं सुमारें तीन हजार वर्षांच्या काळांत येथें संस्कृतीचा विकास झाला होता असें आतां सिद्ध झालें आहे. या सर्व गोष्टींमुळें प्रत्येक देशांतील लोक तेथील नद्यांना पवित्र मानतात.

आपल्या भारतांत तर नद्यांचें महत्त्व विशेषच आहे. आपला भारत हा कृषिप्रधान देश आहे. त्यामुळें भारतीयांचें सारें जीवन पाऊस-पाण्यावर अवलंबून असतें. आपल्या भारतास मोसमी वाऱ्यांपासून पाऊस मिळतो. मोसमी पावसाच्या अनिश्चितपणामुळें येथें बऱ्याच वेळां दुष्काळ पडतात. अशा वेळीं देशांतील नद्यांना कालवे काढून शेतीस पाणी पुरवितां आलें तर जनतेचा बचाव करता येतो. नद्यांचा हा उपयोग फार महत्त्वाचा आहे.

त्याशिवाय नद्यांच्या गाळामुळें सभोंवतालची जमीन सुपीक होते. मोठ-मोठ्या नद्यांचा व्यापारी मालाच्या वाहतुकीसाठींहि उपयोग होतो. नदींतील मासे पकडून उपजीविका करतां येते. याशिवाय आधुनिक काळांत नद्यांच्या प्रवाहापासून वीज निर्माण करून मोठमोठे कारखाने, आगगाड्या वगैरे चालवितां येतात. नद्यांचे असे अनेक उपयोग आहेत. देशाच्या समृद्धीस नद्यांची फार आवश्यकता आहे. मग अशा नद्यांना आपण पवित्र कां मानूं नये ?

गंगोत्सवाच्या निमित्तान आपण या नद्यांच्या कांठीं उदयास आलेल्या निरानिराळ्या संस्कृतींची ओळख करून घेतली पाहिजे. नद्यांचे उपयोग समजावून देऊन त्यांपासून माणसाचें जीवन सुखी होण्यास कशी मदत होते, ही गोष्ट पटवून दिली पाहिजे. अलीकडच्या काळांत विजेच्या शोधामुळें व यंत्रयुगांतील सुधारणांमुळें नद्यांना वेगळेंच महत्त्व प्राप्त झालें आहे. रशियांतील सुप्रसिद्ध क्रांतिकारक लेनिन यानें 'वीज अधिक सोव्हिएट राज्य म्हणजे समाजसत्तावाद' अशी व्याख्या केली आहे. त्यावरून विद्युतशक्तीच्या थोरवीची आपणांस कल्पना येईल. ही विद्युत्शक्ति निर्माण करण्यासाठीं नद्यांची अत्यंत गरज आहे. विद्युतशक्तीच्या उत्पादनानें आपल्या भारतांत आपणांस अनेक प्रकारच्या सुधारणा करून घेतां येतील व आपलें जीवनमान वाढवून देशास सुखसमृद्धीच्या शिखरावर नेतां येईल, ही गोष्ट आपण विद्यार्थ्यांच्या मनावर बिंबविली पाहिजे.

सुदैवानें आपल्या देशांतील विचारवंत लोक आतां या बाबतींत अधिक लक्ष घालूं लागले आहेत व नद्यांना कालवे काढून शेतीचें उत्पादन वाढविण्यासाठीं त्यांचा उपयोग करून घेण्याच्या प्रयत्नांत आहेत. नद्यांचा कालवे काढण्याच्या कामीं उपयोग होतो हें आपल्या देशांतील जनतेस प्राचीन काळापासून माहीत आहे. इ. स. च्या २ ऱ्या शतकांत कावेरी नदीस व १४ व्या शतकांत यमुना नदीला कालवे काढले असल्याचें इतिहासांत नमूद आहे. चंद्रगुप्त, अशोक, राजेंद्र चोल यांसारख्या

थोर राजांनीं देखील या बाबतींत महत्त्वाची कामगिरी बजाविली आहे. आजहि आपल्या भारतांत जगांतील इतर कोणत्याहि देशापेक्षां अधिक कालवे आहेत. या बाबतींत समृद्ध अमेरिकेचा क्रम दुसरा लागतो. तथापि असें असूनहि या कालव्यांनीं आपल्या देशांतील एकंदर ३६ कोटी एकर शेतजमिनीच्या क्षेत्रफळापैकीं अवघी ७ कोटी एकर जमीनच भिजत आहे. आपल्या देशांत उपलब्ध असलेल्या पाण्यापैकीं आपण फक्त ६ टक्के पाण्याचा उपयोग करीत आहोंत. अर्थात् सर्वच नद्यांचा कालवे काढण्याच्या कामीं उपयोग होतो असें नाहीं. आपल्या भारतांतील उत्तरे-कडील व दक्षिणेकडील नद्यांत बराच फरक आहे. उत्तरेकडील नद्यांना वेळीं अवेळीं पूर येऊन नुकसान होतें; तर दक्षिणेकडील नद्या उन्हाळ्यांत आटून निरुपयोगी होतात! तथापि या सर्व नद्यांचा निरनिराळ्या कामीं उपयोग करून घेणें शक्य आहे.

या दृष्टीनें नद्यांचा उपयोग करून घेण्याच्या योजना आखण्यासाठीं इ. स. १९४५ सालीं मध्यवर्ति सरकारनें एका समितीची स्थापना केली आहे. या समितीनें एकंदर ४६ योजना आंखल्या असून त्या १० वर्षांत पूर्ण करण्यासाठीं एकंदर ३७१ कोटी रुपये खर्च लागेल असा अंदाज आहे. या योजनांनुसार आतां ठिकठिकाणीं कालवे काढले जातील. त्यामुळें ८३ लक्ष एकर जमीन अधिक भिजून एकंदर ३० लक्ष टन धान्य अधिक पिकेल व १८॥ लक्ष किलोवॅट वीजशक्ति निर्माण होईल असा अंदाज आहे. या योजनांत अन्नोत्पादनाच्या खालोखाल विजेच्या उत्पादनास महत्त्व दिलें आहे. या योजनेपैकीं कांहीं ठळक योजना खालीं दिल्या आहेत.

(१) **भाक्रा-नांगल योजना**—पूर्व पंजाब प्रांतांतील अंबाला जिल्ह्यांत भाक्रा नांवाचें एक गांव आहे. तेथें सतलज नदीस ६५० फूट उंचीचें धरण बांधून तिचें पाणी साठविलें जाईल. या धरणाची लांबी

एकंदर १४५० फूट असेल. त्यामुळें धरणाच्या वरच्या बाजूस सुमारें ५० मैलांचा तलाव निर्माण होईल. या तलावांत एकंदर ७२ लक्ष एकर फूट पाणी साठविलें जाईल. त्यापैकीं ५४ लक्ष एकर फूट पाणी प्रतिवर्षी वापरलें जाईल व बाकीचें पाणी कायम निधि म्हणून ठेवण्यांत येईल.

भाक्रापासून खालीं आठ मैलांवर नांगल धरण बांधावयाला सुरुवात झाली आहे. तेथें सतलज नदीचें पाणी अडवून त्याचा पुरवठा नांगल हाइडूल् व सरहिंद् कालव्यांना केला जाणार आहे. त्याशिवाय या धरणामुळें भाक्रा येथील धरणांतील अधिक पाण्याचीहि विल्हेवाट लावतां येणार आहे. या सर्व योजनेपासून एकंदर ३५,८१,४३० एकर जमिनीला पाणी मिळून ७,४७,००० टन धान्याचें अधिक उत्पादन होईल. त्याचप्रमाणें या दोन्ही धरणांपासून सुमारें ४,००,००० किलोवॅट वीज उत्पन्न होईल. ही योजना पुरी करण्यास अंदाजें ११५ कोटी २० लक्ष रुपये खर्च येईल.

(२) **तुंगभद्रा**–तुंगभद्रा ही कृष्णा नदीची एक उपनदी आहे. ही नदी पश्चिम घाटांत उगम पावून तेथून म्हैसूर, मुंबई व हैद्राबाद या प्रांतांतून वाहत जाते. या नदीस मद्रास व हैद्राबाद् सरकारच्या नेतृत्वाखालीं बेल्लारी जिल्ह्यांतील मल्लापुरम् या ठिकाणीं सुमारें ६००० फूट लांबीचें व १५८ फूट उंचीचें धरण बांधलें जाणार आहे. या धरणापासून मद्रास व हैद्राबाद् या प्रांताकडे प्रत्येकीं एकेक कालवा काढला जाईल. मद्रासकडील मुख्य कालव्याची लांबी २२५ मैल असेल व त्यामुळें एकंदर ३ लक्ष एकर जमीन भिजेल. हैद्राबादकडील कालवा १२७ मैल लांबीचा राहणार असून त्यामुळें एकंदर ४,१९,००० एकर जमिनीस पाण्याचा पुरवठा होईल. या योजनेमुळें या प्रदेशांत एकंदर २ लक्ष १० हजार टन अधिक धान्य पिकेल व मद्रासच्या भागाला ७,००० किलोवॅट कायमची व १४,००० किलोवॅट हंगामी वीज उत्पन्न होईल. हैद्राबाद् भागाला १,४१,००० किलोवॅट वीज उत्पन्न होईल. या योजनेस अंदाजें ३८ कोटी १५ लक्ष इतके रुपये खर्च येईल. हा खर्च दोन्ही प्रांत वाटून घेतील.

(३) दामोदर व्हॅलि—ही नदी बंगाल व बिहार प्रांतांतून वाहते. य
नदीस एकंदर आठ ठिकाणीं धरणें बांधलीं जाणार आहेत. या योजनेमु
पुराचें पाणी फोडतां येऊन जमिनीची धूप थांबविता येईल व शेती, वा
तूक व वीजपुरवठा यासाठीं तिचा उपयोग होईल. येथील कालव्यामु
एकंदर ९ लक्ष एकर जमीन भिजेल व ३ लक्ष ३३ हजार टन अधिक धान
पिकेल. त्याचप्रमाणें या योजनेमुळें ३ लक्ष ७३ हजार किलोवॅट विद्यु
शक्ति निर्माण होईल. हुगळीपासून ४० मैल आंतपर्यंत या नदीचा वाहतुकी
साठीं उपयोग करतां येईल. या योजनेस एकंदर ५५ कोटी रुप
खर्च येईल.

(४) महानदी—ओरिसा प्रांत सरकारच्या विनंतीवरून मध्यवा
सरकारनें ही योजना हातीं घेतली आहे. या योजनेनुसार हिराकु
नाराज व तिक्करपारा अशा तीन ठिकाणीं कालवे काढण्यांत येतील. त्यामु
महानदीचा सबंध टापू कालव्यांनीं व वीज पुरवठ्यानें व्यापला जाई
हिराकुड धरण हें १५,७०० फूट लांबीचें होणार असून त्यामुळें एकं
१०,९४,९५३ एकर जमिनीला पाणीपुरवठा करतां येईल व ३ लक्ष ४
हजार टन अधिक धान्य पिकेल.

(५) तापी व्हॅलि—सुरतेपासून सुमारें ५० मैल अंतरावर काक्रापा
येथें तापी नदीवर धरण बांधलें जाईल. या धरणाची लांबी १७५० फू
व उंची ४० फूट असेल. या योजनेमुळें एकंदर ५,६२,५२० एक
जमीन भिजेल व १,६६,००० टन अन्नधान्याचें अधिक उत्पादन होई
या योजनेसाठीं एकंदर ६ कोटी २६ लक्ष रु. खर्च लागेल. याशिवा
पुराचें पाणी साठवून ठेवण्यासाठीं या नदीवर आणखी दुसरेंहि धर
बांधण्यांत येणार आहे.

(६) कोसी—ही नदी बिहार प्रांतांत असून ब्रह्मपुत्रा नदीच
खालोखाल मोठी आहे. हिचें पात्र वारंवार बदलत असतें. त्यामु

दरवर्षीं बरेंच नुकसान होतें. या नदीवर नेपाळच्या टापूंत ७७० फूट उंचीचें धरण बांधलें जाईल. हें धरण सर्व जगांत अधिक उंचीचें होईल. या धरणामुळें एकंदर २० लक्ष एकर जमीन भिजेल; नेपाळ व बिहार प्रांतांत मिळून एकंदर ५ लक्ष टन अधिक धान्य पिकेल व ९० हजार किलोवॅट वीजशक्ति निर्माण होईल. ही योजना चार वर्षांत पूर्ण होईल.

(७). **सिंध व्हॅलि**—सिंध ही झेलमचीच एक उपनदी आहे. या नदीवर धरण बांधल्यामुळें काश्मिरदर्‍यांतील प्रदेशास पाण्याचा व विजेचा पुरवठा होईल.

भारत सरकारनें संकल्पिलेल्या या योजना पुर्‍या झाल्या तर आपला देश धनधान्यांनीं समृद्ध होईल. गंगोत्सवाच्या निमित्तानें आपण ही सारी माहिती विद्यार्थ्यांसमोर ठेवून त्यांना नद्यांचें महत्त्व पटवून दिलें पाहिजे. गंगा नदींत स्नान केल्यानें कठोर भाषण, असत्य भाषण, चहाडी, वृथा वल्गना, चोरी, हिंसा, व्यभिचार, परापहार, अनिष्ट चिंतन व दुराग्रह इत्यादि दहा पापांचा नाश होतो असें मानतात. तथापि आपल्या देशांतील नद्यांचा आपण योग्य रीतीनें उपयोग करून घेतल्यास आपल्या देशांतील शतपापांचा नाश होईल. विपन्नावस्था व दारिद्र्य यांतून पापकृत्यांचा उगम होतो. ही विपन्नावस्था व दारिद्र्य नष्ट होऊन सर्वत्र सुबत्ता व समृद्धि नांदूं लागली कीं, देशांत आपोआपच शांतता व स्वास्थ्य प्रस्थापित होऊन पापप्रवृत्तीचा नायनाट होईल. या दिवसांत नदीकांठीं सहल काढून मुलांना त्या नदीचा उपयोग समजावून दिला पाहिजे. गंगेसंबंधींचीं व इतर नद्यांसंबंधीं गोड गाणीं शिकविलीं पाहिजेत. नदीच्या पाण्याची स्वच्छता राखण्यासंबंधींची प्रचार केला पाहिजे. अशा प्रकारें आपणांस ठिकठिकाणीं दशहरा साजरा करतां येईल.

## समवाय

( १ ) गंगावतरणाची कथा सांगा.

( २ ) गंगेस प्राचीन काळापासून पावित्र्य कां निर्माण झालें आहे तें सांगा.

( ३ ) आर्यांच्या गंगाकांठच्या जीवनाची माहिती द्या.

( ४ ) 'सुमेरियन', 'मिसरी', 'पीत' व 'सिंधु' संस्कृतींचा इतिहास कथन करा.

( ५ ) नद्यांचे उपयोग सांगून त्यांचा अधिकाधिक उपयोग करून घेण्यासाठीं भारत सरकारनें आखलेल्या योजनांची माहिती करून द्या.

( ६ ) नदीकांठीं सहल काढून त्यासंबंधींचा वर्णनपर निबंध लिहून घ्या.

( ७ ) मोरोपंतांची 'गंगेची प्रार्थना' व कवि यशवंत यांची 'सरिता का करिते कधिं खंत ?' या कविता शिकवा.

( ८ ) नदीचें पाणी दूषित होण्याचीं कारणें सांगून त्यासंबंधीं आपण कोणती दक्षता घेतली पाहिजे तें समजावून द्या.






शुक्ल व कृष्ण पक्षांतील अकराव्या तिथीस एकादशी असें म्हणतात. एकादशीच्या दिवशीं भाविक जन उपोषण करून परमेश्वराचें भजन-कीर्तन करतात. या एकादशींपैकीं आषाढ व कार्तिक महिन्यांच्या शुक्ल-पक्षांतील एकादशी अधिक महत्त्वाच्या मानतात. यांना महाएकादशी असेंहि म्हणतात. आषाढ शु. ११ स भगवान् विष्णु शयन करतात असें मानलें जातें. त्यामुळें या एकादशीस 'शयनी एकादशी' असें म्हणतात. आषाढ शुद्ध एकादशीला झोंपीं गेलेले भगवान् विष्णु कार्तिक शुद्ध एकादशीस जागे होतात. त्यामुळें कार्तिकी एकादशीस 'प्रबोधिनी एकादशी' असें म्हणतात. आषाढापासून तों कार्तिकापर्यंतच्या महिन्यांत पावसाळा सुरू असल्यामुळें सूर्यदर्शन सहसा घडत नाहीं. त्यामुळें या काळांत भगवान् विष्णु (भगवान् विष्णु ही सूर्य देवता आहे) झोंपीं जातात अशी कल्पना निर्माण झाली असावी. या दोन्ही एकादशींच्या दिवशीं श्रीविष्णूच्या देवळांत टाळांच्या गजरांत भजन-कीर्तनाचा अपूर्व सोहळा चालतो.

पुराणांतरीं एकादशीची कथा आहे, ती अशी : प्राचीन काळीं मृदुमान्य या नांवाचा एक राक्षस होता. त्यानें शंकराची आराधना करून त्यास प्रसन्न करून घेतलें व त्याजकडून अमरत्वाचा वर मागितला. तेव्हां 'एका स्त्री-शिवाय तुला दुसऱ्या कोणाच्याहि हातून मृत्यु येणार नाहीं' असा भगवान् शंकरानें त्याला वर दिला. शंकराचा वर प्राप्त होतांच मृदुमान्य राक्षस देव लोकांना भयंकर त्रास देऊं लागला. त्या काळीं देव-दानवांत सारखा झगडा सुरू असे. त्यांत देवांचा नेहमीं विजय होई. परंतु मृदुमान्यास वर मिळतांच हें पारडें फिरलें. मृदुमान्यानें देवांचा भयंकर संहार करण्यास सुरुवात केली. तेव्हां पृथ्वीचा पालनकर्ता भगवान् विष्णु शंकराजवळ जाऊन मृदुमान्याचा नाश कसा करतां येईल या गोष्टीचा विचार करूं लागला. श्रीशंकरास देखील कांहीं उपाय सुचेना. अखेरीस मृदुमान्याच्या भीतीनें ब्रह्मा, विष्णु व महेश हे तिघेहि एका गुहेंत दडून राहिले. मृदुमान्यानें त्यांचा मागोवा काढला व तो त्या गुहेच्या दाराशीं उभा राहिला. त्यामुळें त्रिमूर्तींना गुहेच्या बाहेर पडतां येईना ! अशा प्रकारें त्यांना तीन दिवस त्या गुहेंत उपवास घडला. त्यानंतर त्रिमूर्तींच्या श्वासापासून एक देवता निर्माण झाली. तीच एकादशी होय. एकादशी देवीनें मृदुमान्याचा नाश करून त्रिमूर्तींना बंधमुक्त केलें व देवांना दानवांच्या तडाख्यांतून सोडविलें. तेव्हांपासून जे लोक एकादशीच्या दिवशीं उपवास करून परमेश्वराचें गुणसंकीर्तन करतात त्यांचीं दुःखें हरण होतात असा समज प्रचलित झाला आहे. पुराणांतरीं या व्रताचें माहात्म्य अनेक कथांनीं वर्णन केलेलें आहे.

भागवत धर्माची स्थापना झाल्यापासून एकादशीच्या व्रताचें माहात्म्य अधिकच वाढलें आहे. तेव्हांपासून भारतांतील बहुजनसमाज या व्रताचें आचरण करूं लागला. भागवत धर्माची स्थापना महाभारत काळापासूनच झालेली दिसते. त्या काळीं भागवत धर्मास 'वासुदेव धर्म' असें म्हणत. तथापि भागवत धर्माचा खरा विकास इ. स. च्या १३ व्या शतकापासून

झालेला दिसतो. भागवतधर्मीयांनीं बहुजनसमाजांत जागृति करून त्यास मोक्षाचें सोपें साधनं प्राप्त करून दिलें आहे. प्राचीन काळीं वैदिक धर्मांत वेदविद्या, तपाचरण व यज्ञयाग इत्यादींचें महत्त्व फार वाढलें होतें. सामान्य जनतेस आपल्या उपजीविकेचा व्यवसाय सांभाळून परमात्मप्राप्तीचा हा मार्ग चोखाळणें अत्यंत दुर्घट झालें होतें. शिवाय धार्मिक ज्ञान प्राप्त करून घेण्यासाठीं या काळीं संस्कृत भाषेच्या अध्ययनाचीहि गरज असे. त्या काळीं सर्व प्रकारचें धार्मिक ज्ञान संस्कृत भाषेंतूनच दिलें जाई. बहुजनसमाजास ही भाषा अवगत नसे. त्यामुळें धार्मिक बाबतींत त्यास ब्राह्मणांवर विसंबल्याखेरीज गत्यंतर नसे. ब्राह्मण लोकांनींहि या परिस्थितीचा फायदा घेऊन परमार्थप्राप्तीची दलाली सुरू केली. त्यांनीं परमेश्वरास स्वर्गांतील सिंहासनावर घट्ट बसवून ठेवलें. त्यामुळें बहुजनसमाजास परमात्मस्वरूपाचें खरें ज्ञान होणें कठीण झालें.

भागवतधर्मीयांनीं या बाबतींत अपूर्व क्रांति केली. त्यांनीं परमेश्वरास आपल्या वैकुंठांतील स्वर्गीय आसनावरून पृथ्वीतलावर आणलें व बहुजनसमाजाच्या जीवनांत सहभागीं केलें. परमेश्वरप्राप्तीसाठीं यज्ञयाग, तपाचरण व वेदविद्या इत्यादींची आवश्यकता नसून भक्तिभावानें परमेश्वराची आराधना केल्यास तो भक्तास पावतो असें त्यांनीं प्रतिपादन केलें. देव भक्तीचा भुकेला असून त्याजवर निष्ठापूर्वक भाव ठेवल्यास आपण मोक्षाचे वाटेकरी होतो अशी त्यांनीं बहुजनसमाजाला शिकवण दिली. मोक्षप्राप्तीसाठीं त्यांनीं भजन–कीर्तन–प्रवचनाच्या सोप्या मार्गाचा उपदेश केला व निर्गुण आणि निराकार परमेश्वरास सगुण व साकार बनवून भक्तिमार्गाचा प्रसार केला. समाजांतील उच्चनीच भाव नष्ट करून त्यांनीं ‘ सर्वांभूतीं एकच परमेश्वर वसत आहे ’ या तत्त्वाचा पुरस्कार केला.

त्यामुळें स्वाभाविकपणेंच भागवत धर्माची शिकवण बहुजनसमाजास आवडूं लागली. त्यांनीं भक्तिमार्गाचा अवलंब केला. भागवतधर्मीय भक्ति-

मार्गाचा प्रसार करण्यासाठीं या काळांत अनेक संतमंडळी पुढें आली. त्यांनीं देशी भाषांत वाङ्मयनिर्मिति करून बहुजनसमाजासाठीं धार्मिक ज्ञानाचें भांडार खुलें केलें. या संतमंडळींत सर्व जातींचे व सर्व दर्जाचे लोक होते. उत्तर हिंदुस्थानांत संत कबिरांनीं राम व रहिम यांतील द्वैत काढून टाकलें. बंगाल्यांत चैतन्य स्वामींनीं श्रीकृष्णभक्तीचा प्रसार केला. कर्नाटकांत दास साधू उदयास आले. त्यांपैकीं व्यासराय, पुरंदरदास, कनकदास इत्यादींनीं हरिभक्तीचे मळे पिकविले. तामिळनाडमधलि अळवार साधूंनीं श्रीकृष्णभक्तीचा प्रसार केला या अळवार साधूंत राजापासून तों अंत्यजापर्यंत सर्व जातींचे व सर्व दर्जाचे साधू होते. त्यांत गोदा ऊर्फ आंदाल या नांवाची एक भगवद्भक्त स्त्रीदेखील होती. गुजराथेंत नरसी मेहतांनीं हरिभक्तीचा प्रसार केला. दादू पिंजाऱ्यांनीं राजपुतान्यांतील लोकांस विष्णुभक्तीचा उपदेश केला. मेवाडांत राणा कुंभाची राणी मीरा हिनें श्रीकृष्णास आळवून जनतेचीं मनें हरिभक्तींत तल्लीन करून सोडलीं. आपल्या महाराष्ट्रांत तर ही संतमालिका फार मोठी आहे. त्यांत ज्ञानेश्वर, एकनाथ, नामदेव, तुकाराम इत्यादि कित्येक थोर संतांचा समावेश होतो. येथें ब्राह्मण-शूद्र, स्त्री-पुरुष, श्रीमंत—गरीब, कुलीन-अकुलीन इत्यादि प्रकारच्या भेदभावांस थारा नाहीं. महाराष्ट्रांतील या संतमालिकेंत गोरा कुंभार, सेना न्हावी, चोखा महार, सांवता माळी, नरहरी सोनार इत्यादि नाना जातीचे लोक होते. त्यांनीं टाळ, मृदंग व वीणा इत्यादींच्या तालस्वरांत विठ्ठलनामाचा गगनभेदी गजर केला. हरिभक्तीचा तो गजर ऐकून भक्तवत्सल परमेश्वर पृथ्वीवर अवतरला व पुंडलीकानें फेकलेल्या विटेवर ‘कर कटेवरी ठेऊनिया’ अठ्ठावीस युगें पंढरपुरच्या प्रतिवैकुंठांत निवास करूं लागला! भागवतधर्मीयांची ही कामगिरी बहुमोल आहे.

महाराष्ट्रांतील या भागवतधर्मीय संतांस आपण वारकरी असें म्हणतों. या वारकरी सांप्रदायास संत ज्ञानेश्वरांपासून सुरुवात झाली. नामदेव,

तुकाराम इत्यादि संतांनीं त्याला बहुजनसमाजाच्या घरोघरीं पोहोंचविलें. वारकरी सांप्रदायिकांस महाएकादशीचा दिवस म्हणजे परमेश्वरभक्तीची एक पर्वणींच होय. या दिवशीं दिंड्या, पताका घेऊन टाळमृदंगांच्या गजरांत पांडुरंगाला आळवीत भक्तजन पंढरीची वारी करतात. संत ज्ञानेश्वरांनीं पंढरीच्या वारीस सुरुवात केल्यापासून हा क्रम प्रतिवर्षी असाच अव्याहत चालत आला आहे. सुमारें एका शतकापूर्वी भगवद्भक्त हैबतरावांनीं महाएकादशीस आळंदीहून संत ज्ञानेश्वरांची पालखी पंढरपुरास नेण्याचा प्रघात पाडला. त्याचप्रमाणें आतां देहूहून तुकाराम महाराजांची, पैठणहून एकनाथ महाराजांची, त्र्यंबकहून निवृत्तिनाथांची, एदलाबादेहून मुक्ताबाईची, मच्छेंद्रगडाहून मच्छेंद्रनाथांची, सासवडाहून सोपानदेवांची व आरणगांवाहून सांवता माळी यांची, या व अशा इतर अनेक मिळून सुमारें ७०-८० पालख्या आषाढी एकादशीस पंढरपुरास जातात. त्याचप्रमाणें कार्तिकी एकादशीच्या दिवशीं आळंदीसहि मोठी यात्रा भरते. त्या वेळीं आळंदीस भक्त पुंडलीक व संत नामदेव यांच्या पालख्या येतात. आपली शिधासामुग्री बरोबर घेऊन, नुसत्या लक्तरानिशीं उन्हातान्हांतून, पाणीपावसांतून शेंकडों मैलांचा पायीं प्रवास करणारा हा भाविकांचा मेळावा पाहिला कीं मन भक्तिभावानें व आदरानें भरून येतें. विठ्ठलनामाचा गजर करीत जाणारी ती भाविकांची अखंड रीघ पाहून अभाविकाच्या मनांत भाव निर्माण होतो; अधार्मिकाच्या मनांत धर्मरति उत्पन्न होते.

महाएकादशीच्या दिवशीं पंढरपुरास या भक्तांची मोठी यात्रा भरते. त्या ठिकाणीं लाखों लोकांचा समुदाय विठ्ठलाच्या दर्शनासाठीं बारी लावून तासचे तास उभा राहतो. चंद्रभागेच्या विस्तीर्ण वाळवंटावर भाविकांच्या भजन-कीर्तनाची रेलचेल उडते. तुकोबांच्या रसाळ अभंगांत भक्तगण तल्लीन होतो. ज्ञानेश्वरीवरील प्रवचनांत तो तन्मयतेनें रमून जातो; एकनाथांच्या भारुडांनीं तो खदखदून हसूं लागतो. भगवद्भक्तीचे येथें अनंत प्रकार चालू असतात. त्यांचें वर्णन तें काय करावें ?

पंढरपुरच्या प्रतिवैकुंठास प्रतिवर्षीं जाणाऱ्या या भाविकांना बऱ्याच यातना सहन कराव्या लागतात. या दिवसांत रेल्वेनें प्रवास करण्यासाठीं किती प्रयास पडतात! या लाखों भाविकांच्या प्रवासाची यापेक्षां अधिक चांगली सोय करतां आली तर किती बरें होईल! पंढरपुरास ठिकठिकाणचे लोक या निमित्तानें एकत्र येतात. त्यामुळें विचारांची व सद्भावनांची देवाण-घेवाण होते; मैत्रीची जोपासना होते; जातीय व प्रांतिक भेदाभेद नष्ट होण्यास अनुकूल संधि निर्माण होते. तथापि या लाखों लोकांच्या वास्तव्या-मुळें पंढरपुराचें आरोग्यहि बरेंच धोक्यांत येतें. ठिकठिकाणीं नाना प्रकारची घाण सांचते. चंद्रभागेंत स्नान केल्यामुळें तिचें पाणी दूषित होतें. त्यामुळें पटकीसारख्या रोगांचा प्रादुर्भाव होतो. पटकीनें पछाडलेल्या रोग्यास एकसारख्या वांत्या होतात. अतिसार होतो. त्यामुळें अगदीं अल्प वेळांतच रोगी गार पडून दगावण्याचा संभव असतो. शिवाय रोग्यानें भोंवतालीं निर्माण केलेल्या घाणीमुळें पटकीचा प्रसार होण्यासहि उशीरं लागत नाहीं. या गोष्टीचा प्रतिबंध करण्यासाठीं आतां पंढरपुरास जाणाऱ्या प्रत्येकावर सरकारनें टोचून घेण्याचा निर्बंध घातला आहे. अज्ञ जनतेला या गोष्टीचें महत्त्व अद्याप नीटसें पटलेलें नाहीं. त्यामुळें सर्व प्रकारची दक्षता घेऊन देखील पंढरपुरचें आरोग्य धोक्यांत येण्याचा संभव असतो. खेड्यापाड्यांतील लोकांना या गोष्टीची योग्य ती जाणीव करून देणें हें आपलें कर्तव्य आहे. मुंबई प्रांताचें आरोग्यखातें या बाबतींत बरीच दक्षता घेत असतें. या कामीं अलीकडे स्वयंसेवकांचीहि योजना केली जाते. याशिवाय पंढरीच्या वारकऱ्यांना तेथील बडवे लोकांचाहि बराच बडगा सहन करावा लागतो. या बाबतहि कांहीं दक्षता घेणें जरूर आहे. महा-एकादशीच्या निमित्तानें या सर्व गोष्टींची आपण योग्य ती चर्चा करून त्यांतून ही यात्रा अधिक यशस्वी करण्याचे विधायक मार्ग शोधून काढले पाहिजेत.

महाएकादशीच्या दिवशीं उपवास करावयाचा असतो. उपवास केल्या-

मुळें शरीरास मांद्य न येतां एकचित्त होऊन परमेश्वराची आराधना करणें सुलभ जातें. ज्यांना निराहार करणें जड जातें असे लोक या दिवशीं शास्त्रसंमत आहार करतात. त्यामुळें जठरास विश्रांति मिळून प्रकृति निरोगी राहण्यास मदत होते. हे दिवस पावसाळयाचे असल्यामुळें सर्वत्र रोग-राईचा फैलाव झालेला असतो. अशा स्थितींत प्रकृतीची काळजी घेणें अत्यंत जरूरीचें असतें. त्यामुळेंच आपल्या शास्त्रांत या दिवसांत चातुर्मासाचें व्रत सांगितलें आहे. चातुर्मासाच्या व्रतास आषाढी एकादशीपासून सुरुवात होते. या दिवसापासून कांदा, लसूण, वांगीं, इत्यादि पदार्थांचें सेवन चार महिनेपर्यंत वर्ज्य करतात. या गोष्टीचें महत्त्व आपण नीट ध्यानांत घेतलें पाहिजे.

आषाढी एकादशीच्या दिवशीं गीतेच्या ९ व्या अध्यायाचें व कार्तिकी एकादशीच्या दिवशीं १५ व्या अध्यायाचें पठण करावें असें शास्त्रांत सांगितलें आहे. संस्कृत न जाणणारांनीं या दिवशीं ज्ञानेश्वरींतील हे अध्याय वाचले तरी त्यांना योग्य ती फलप्राप्ती होईल.

महाएकादशीच्या निमित्तानें वरील सर्व गोष्टींची आपण विद्यार्थ्यांना माहिती दिली पाहिजे.

## समवाय

१. एकादशीची कथा सांगा.
२. महाएकादशीचें माहात्म्य विद्यार्थ्यांच्या नजरेस आणून द्या.
३. भागवत धर्माची ओळख करून देऊन भारतांत भक्तिमार्गाचा प्रसार कोणीं व कसा केला तें सांगा.
४. महाराष्ट्रीय संतांच्या कामगिरीचें वर्णन करा.
५. पंढरपूरच्या यात्रेसंबंधीं माहिती देऊन यात्रेच्या वेळीं अनारोग्यकारक गोष्टींचा उद्भव होऊं नये याबद्दल कोणती काळजी घेतली पाहिजे तें सांगा.

६. साथीच्या रोगांसंबंधीं—विशेषतः पटकी या रोगासंबंधीं—माहिती द्या.

७. यात्रांचें सामाजिक व सांस्कृतिक महत्त्व विद्यार्थ्यांना पटवून द्या.

८. भारतांतील तीर्थक्षेत्रांची माहिती द्या.

९. उपवासाचें महत्त्व पटवून चातुर्मासांत अन्नसेवनाच्या बाबतींत निर्बंध कां घातले आहेत तें पटवून द्या.

१०. तुकाराम महाराजांचे अभंग शिकवा.

११. ज्ञानेश्वरीची ओळख करून देऊन तिच्यांतील ९ व्या व १५ व्या अध्यायांचें वाचन करा.




ज्येष्ठ शु. १५ स सुवासिनी वटसावित्री पौर्णिमेचें व्रत आचरतात. या दिवशीं सुवासिनी वडाच्या झाडाखालीं एकत्र जमून ब्राह्मणांकरवीं त्याची पूजा करतात व ब्राह्मणास दान देतात. शहरांतील सुवासिनी आपल्या घरीं वडाची डहाळी आणून अथवा वटवृक्षाचें चित्र काढून त्याची पूजा करतात व उपोषित राहून सती सावित्रीच्या आख्यानाचें श्रवण करतात. सावित्रिच्या पतिभक्तीचा आदर्श डोळयांपुढें ठेवून सुवासिनी आपल्या पतीची अनन्यभावें सेवा करतात व त्यांस प्रसन्न ठेवतात. पतीस दीर्घायुरारोग्य लाभावें यासाठीं त्या यमाचीहि पूजा करतात.

सावित्रीची कथा मोठी उद्बोधक आहे. प्राचीन काळीं मद्र देशांत अश्वपति या नांवाचा एक कर्तव्यदक्ष व सदाचरणी राजा होता. त्यांस मूलबाळ नव्हतें. कालांतरानें त्यास परमेश्वराच्या कृपाप्रसादामुळें एक कन्यारत्न प्राप्त झालें. तिचें नांव सावित्री. अश्वपतीनें सावित्रिचा पुत्रा-

प्रमाणें प्रतिपाळ केला; तिला उत्तम प्रकारचें शिक्षण दिलें. स्वतंत्र वातावरणांत वाढल्यामुळें सावित्री तेजस्विनी झाली. तिच्या ठिकाणचें तेज व धर्मरति पाहून थोर ऋषी–मुनींना देखील तिच्याबद्दल आदर वाटे. सावित्री उपवर झाली तेव्हां अश्वपति राजानें तिचा विवाह करण्याचें ठरविलें. तथापि सावित्रीची कीर्ति ऐकून तिच्याशीं विवाह करण्यास कोणताहि राजपुत्र धजेना! प्रत्येक राजपुत्रास सद्गुणी, सदाचरणी व धर्मनिष्ठ सावित्रीबद्दल नितांत आदर वाटे. तथापि अशा साध्वीशीं विवाह करण्यास आपण पात्र नाहीं असें समजून तो तिच्याशीं विवाहबद्ध होण्यास तयार नसे. त्यामुळें अश्वपति राजापुढें मोठाच प्रश्न पडला. त्यानें सावित्रीलाच आपला पति निवडण्याबद्दल आज्ञा केली.

पितृआज्ञा होतांच सावित्री एका वृद्ध मंत्र्यास बरोबर घेऊन वरसंशोधनासाठीं निघाली. योग्य वर निवडण्यासाठीं तिनें अनेक नगरांतून व रानावनांतून संचार केला. परंतु तिला अनुरूप असा वर आढळला नाहीं. या वेळीं शाल्व देशाचा राजा द्युमत्सेन् हा राज्यभ्रष्ट होऊन अरण्यांत राहात होता. वृद्धावस्थेमुळें तो आंधळा झाला होता. तथापि त्याच्या तपश्चर्येंत कधीं खंड पडला नव्हता. द्युमत्सेनास सत्यवान् नांवाचा एक सद्गुणी व सदाचरणी पुत्र होता. सावित्री शोध करीत करीत द्युमत्सेन राजाच्या आश्रमांत आली. तेव्हां तिनें सत्यवानाचें तेज पाहिलें व त्यास मनोमन वरिलें. याप्रमाणें सावित्रीनें वरसंशोधन केल्यानंतर ती आपल्या पित्याकडे परत गेली. तिनें आपल्या पित्यास घडलेला सर्व वृत्तान्त निवेदन करून सत्यवानाशीं विवाह करण्याचा आपला निश्चय सांगितला. तो ऐकून अश्वपतीस आनंद झाला. आपल्या सद्गुणी कन्येनें योग्य पतीची निवड केली असें पाहून तो विवाहाच्या तयारीस लागला. इतक्यांत नारदमुनींची स्वारी तेथें येऊन थडकली. नारदमुनींनीं अश्वपतीस सर्व कुशल वृत्त विचारून सावित्रीबद्दल चौकशी केली. तेव्हां अश्वपतीनें साबित्रीचा सत्य-

वानाशीं लवकरच विवाह होणार असल्याचें सांगितलें. तें ऐकतांच नारद्-मुनि खिन्न होऊन म्हणाले, "सावित्रीनें सर्वगुणसंपन्न अशा सत्यवानाची निवड केली हें पाहून वास्तविक संतोष व्हावा. तथापि विधिघटना विचित्र आहे. सत्यवान् अल्पायुषी असून आतां त्याचें आयुष्य फक्त एक वर्षा-पुरतेंच उरलें आहे. तेव्हां सावित्रीनें अन्य वराची निवड करावी हें उत्तम."

नारद्मुनींचें तें बोलणें ऐकून अश्वपतीस अत्यंत खेद् झाला. त्यानें नारद्मुनींनीं सांगितलेली सर्व हकिकत सावित्रीस निवेद्न केली. तथापि सावित्री आपल्या निश्चयापासून ढळली नाहीं. तेव्हां अश्वपतीचा नाइलाज झाला. यथाकाल तो सावित्रीस बरोबर घेऊन द्युमत्सेनाच्या आश्रमांत गेला. तेथें सावित्री–सत्यवानाचा विवाह झाला. विवाहप्रसंगीं आपल्या पित्यास संतोष व्हावा म्हणून सावित्रीनें अंगावर उत्तमोत्तम अलंकार घातले. तथापि अश्वपति राजा आपल्या राजधानीस परत जातांच तिनें ते सर्व अलंकार काढून ठेवले व ती एखाद्या योगिनीप्रमाणें अरण्यांताल जीवन कंठूं लागली. आपल्या मधुर भाषणानें व धर्मशील वागणुकीमुळें तिनें सासुसासऱ्याची अपरंपार मर्जी संपाद्न केली. सत्यवानास तर ती जीव कीं प्राण वाटूं लागली.

याप्रमाणें सत्यवान्–सावित्रीचें जीवन आनंदांत चाललें होतें खरें. परंतु सत्यवानाचा निधनकाल समीप आला आहे या जाणिवेनें सावित्रीच्या मनांत कालवाकालव होई. तरी ती धर्मनिष्ठ स्त्री डगमगली नाहीं. असें होतां होतां सत्यवानाचा निधनकाल अवघ्या चार द्विवसांवर येऊन ठेपला. तेव्हांपासून सावित्रीनें कडकडीत उपोषणाचें व्रत आरंभिलें. तिनें निद्रेचाहि त्याग केला. त्यामुळें तिच्या शरिरांत त्राण उरलें नाहीं. तथापि तिच्या पातिव्रत्याच्या तेजामुळें तिचें मुख मोठें तेजस्वी द्विसे. अखेरीस सावित्रीच्या व्रताचा चौथा द्विवस उजाडला. सत्यवानाच्या आयुष्यांतील हा अखेरचा द्विवस. या द्विवशीं सावित्रीला खाणेंपिणें सुचावें कसें ? नित्याप्रमाणें सका-ळच्यावेळीं सत्यवान् होमाकरितां लागणारीं लाकडें तोडण्यासाठीं रानांत

जावयास निघाला. त्याच्याबरोबर सावित्रीहि निघाली. सत्यवान्-सावित्री अरण्यांतील शोभा पाहात पाहात इच्छित स्थळीं जाऊन पोहोंचलीं. तेथें सत्यवान् वाळलेलीं लाकडें तोडूं लागला. लांकडें तोडतां तोडतां सत्य-वानास ग्लानि आली व तो जमिनीवर पडला. सावित्रीनें त्याचें डोकें आपल्या मांडीवर ठेवून श्रमपरिहार करण्याचा प्रयत्न केला. परंतु तिला आपलें भविष्य कळून चुकलें होतें. इतक्यांत सावित्रीस समोरून एक दिव्य पुरुष येतांना दिसला. खाचित तो यमच होता. क्षणांत त्यानें आपले मृत्युपाश सत्यवानाच्या प्राणाभोंवतीं आवळले. सत्यवानाचे प्राण हरण करून यम आपली वाट चालूं लागला. सत्यवानाचा देह काष्ठवत् झाला. तेव्हां सावित्रीनें त्याचें शिर आपल्या मांडीवरून उतरून हलकेंच खालीं ठेवलें व ती यमाच्या पाठोपाठ जाऊं लागली. तें पाहून यम तिला म्हणाला, "सावित्री, तूं फार सुशील व पतिव्रता आहेस. तुझ्या धर्मनिष्ठेवर व सद्गुणांवर मी संतुष्ट आहें. सत्यवानाच्या प्राणांखेरीज तुला काय मागा-यचें तें माग आणि परत जा. तुझ्यासारख्या नाजुक मुलीला हा कष्टतर प्रवास योग्य नाहीं." तेव्हां सावित्रीनें यमाकडून क्रमशः आपल्या सास-ऱ्याची दृष्टि व त्याचें राज्य मागून घेतलें. शेवटीं मोठ्या खुबीखुबीनें तिनें स्वतःस पुत्र व्हावा असेंहि मागणें मागून घेतलें! अखेरीस यमानें 'तथास्तु' म्हटलें तेव्हांच तिनें त्याचा पिच्छा सोडला.

अपला हेतु साध्य झाल्यावर सावित्री हर्षित होऊन आपल्या पतीच्या प्रेताजवळ गेली. तिनें सत्यवानाचें शिर हळूच उचलून मांडीवर घेतलें. हळूहळू सत्यवान् भानावर येऊं लागला. त्यानें डोळे उघडून सावित्रीकडे पाहिलें. तेव्हां सावित्रीस किती बरें धन्यता वाटली असेल! अत्यंत प्रमुदित मनानें ती आपल्या पतीस आधार देत देत सासु-सासऱ्याजवळ जाऊन पोहोंचली. त्या वेळीं द्युमत्सेनास दृष्टि प्राप्त झाली होती. हा चमत्कार झाला तरी कसा याचें कारण द्युमत्सेनानें सावित्रीस विचारलें. तेव्हां तिनें सर्व

वृत्तान्त निवेदन केला. तो ऐकून द्युमत्सेनाच्या आनंदास पारावार राहिला नाहीं. दुसऱ्या दिवशीं शाल्व राज्यांतील लोकप्रतिनिधी द्युमत्सेनाकडे आले व त्यांनीं शाल्व देशाच्या सिंहासनावर अधिष्ठित होण्याबद्दल त्यास विनंति केली. सर्वत्र आनंदी आनंद झाला!

सती सावित्रीच्या या कथेपासून बराच बोध घेतां येण्यासारखा आहे. मनोनिग्रह, आत्मविश्वास, चिकाटी इत्यादि गुणांमुळें सावित्रीनें प्रत्यक्ष मृत्यूस मागें हटविलें व आपला इच्छित हेतु साध्य करून घेतला. कोणतेंहि कार्य करीत असतांना सावित्रीचा हा आदर्श सर्वांनीं डोळ्यांसमोर ठेवण्यासारखा आहे. सती सावित्रीनें आपल्या पतिव्रताधर्मामुळें अलौकिक दिव्यत्व प्राप्त करून घेतलें आहे. त्यामुळें भारतीय कन्येस ‘तूं सावित्री हो’ असा शुभाशीर्वाद देतात.

सावित्रीनें सत्यवानाच्या अंगच्या गुणांस पूजास्थान मानून अल्पायुषी असतांना देखील त्याची पति म्हणून निवड केली. ‘मुहूर्तं ज्वलितं श्रेयः नच धूमायितं चिरम्।’ हेंच खरें. दीर्घकाल धुमसत राहण्यापेक्षां क्षणांत तेज होऊन जळून जाणें श्रेयस्कर असतें. सावित्रीनें हें तत्त्व बरोबर जाणलें होतें. त्यामुळेंच सत्यवानाची निवड करतांना त्याच्या दारिद्र्याचा विचार कधीं तिच्या मनास शिवला नाहीं; अरण्यवासांतील कष्टी जीवनामुळें तीं भांबावून गेली नाहीं अथवा सत्यवान् अल्पायुषी आहे असें समजूनदेखील ती आपल्या निश्चयापासून परावृत्त झाली नाहीं. अशा साध्वी सावित्रीच्या संयमापुढें प्रत्यक्ष यम-नियमांचा देव देखील हरला हें केवढें विशेष आहे! सती सावित्रीचा हा आदर्श डोळ्यांसमोर ठेवून आर्य स्त्रिया हजारों वर्षांपासून वटसावित्री पौर्णिमेच्या व्रताचें आचरण करीत आहेत.

सत्यवानाचे प्राण यमानें हरण केले त्या वेळीं सत्यवान्-सावित्री वटवृक्षाखालीं बसलीं होतीं. त्यामुळें या दिवशीं वटपूजेची प्रथा पडली आहे. वटवृक्षाला वेदान्तामध्यें फार महत्त्व आहे. वेदान्तांत वड, पिंपळ व औदुंबर

हे वृक्ष संसारवृक्षाचे प्रतीक मानले जातात. संस्कृत भाषेंत वडाच्या झाडास न्यग्रोध ( न्यग् + रोध – खालीं वाढणारा ) असें म्हणतात. वडाच्या पारंब्या पुन्हां जमिनींत मूळ धरतात व त्यापासून नवीन वृक्ष निर्माण होतात. अशा प्रकारें मानवी संसाराप्रमाणेंच वटवृक्षाचा सारखा विस्तार होत जातो. वडाची उत्पत्ति अत्यंत सूक्ष्म अशा बीजापासून होते. त्याच-प्रमाणें परमेश्वरी सूक्ष्मांशापासून जन्म घेऊन मानवी संसारवृक्ष पृथ्वीतलावर विस्तारत राहतो. मार्कंडेय ऋषींनीं अव्यय व अविनाशी असा बालरूपी परमेश्वर वटवृक्षावरच पाहिला. वटवृक्षाच्या मुळाचा शोध करण्यासाठीं त्याच्या फांद्यांना दूर करावें लागतें. त्याचप्रमाणें संसारवृक्षाचें बीज जो परमेश्वर त्याचा शोध घेण्यासाठीं संसारवृक्षाच्या फांद्या बाजूस सारल्या पाहिजेत असाहि विचार मनांत आल्याशिवाय राहात नाहीं. वटपौर्णिमेच्या निमित्तानें सामान्यजनास सूक्ष्म परमेश्वरी सूत्राचें दर्शन घडवून देणें सर्वथा उचित होईल.

## समवाय

१. सती सावित्रीची कथा सांगा.
२. आर्य स्त्री धर्माचें विवेचन करा.
३. आर्य स्त्रियांच्या स्थितीचें एतिहासिक दृष्टया समालोचन करून निरनिराळ्या विवाहप्रकारांची माहिती द्या.
४. वटवृक्षासंबंधीं निबंध लिहून ध्या.

---



# नागपंचमी



श्रावण महिना सुरू झाला कीं, ऊन-सावलीचा जणूं शिवांशिवीचा डाव चालतो. मधूनच पावसाची सर येते व क्षणार्धात सर्व धरणी भिजून ओलीचिंब होते. या दिवसांत सगळीकडे हिरवेंगार गवत उगवलेलें असतें. शेतांतील पिकें मोठीं तजेलदार व आल्हादकारक दिसतात. वाऱ्याच्या झुळकीबरोवर होणारी त्यांच्या पानांची कर्णमधुर सळसळ ऐकली कीं, मन आनंदून जातें. सर्व सृष्टींत जणूं या वेळीं आनंदाचें व उत्साहाचें वातावरण पसरलेलें असतें. म्हणूनच कीं काय, या महिन्यापासून हिंदु लोकांच्या सणांचा बहर सुरू होतो.

श्रावण शुद्ध पंचमीस नागपंचमी असें म्हणतात. या दिवशीं घरोघर नागाची पूजा करतात. लहान मुलें नागाच्या प्रतिमा तयार करतात, तर मोठीं माणसें वारुळाजवळ जाऊन त्याची पूजा करतात; अथवा पाटावर गंध, हळद, कुंकु, चंदन, केशर इत्यादींच्या मिश्रणानें पांच फडांचा नाग काढून त्याची पूजा करतात. लहान मुली व स्त्रिया या सणांत विशेष

उत्साहानें भाग घेतात. झोपाळ्यावर बसून त्या नागपंचमीचीं निरनिराळीं गाणीं गातात. त्या वेळीं उंच झोके घेण्याची त्यांच्यांत शर्यतच लागते.

नागपंचमीच्या दिवशीं गांवांत गारुड्यांचाहि खूप सुळसुळाट झालेला दिसतो. 'नागोबाला दूध पाजा' असें म्हणून ते घरोघर हिंडतात व गल्ल्या-गल्ल्यांतून पुंगी वाजवून नागोबास डोलवितात. नागोबाची गंमत पाहण्यांत मुलें–माणसें रमून जातात. गारुड्याजवळील नागोबाची त्यांना मुळींच भीति वाटत नाहीं.

तथापि एरव्ही जर एखादा नागोबा दृष्टीस पडला तर त्यांची भीतीनें नुसती गाळणच उडते! आणि तेंहि स्वाभाविकच आहे. नाग म्हणजे महा-विषारी प्राणी! तो चावला कीं जीवितांची आशाच बाळगावयास नको! अशा या विषारी नागास मग लोक कां भिणार नाहींत? नागाचीच गोष्ट कशाला? एखादा साधासा साप दृष्टीस पडला तरी आपली नुसती पांचावर धारण बसते! वास्तविक पाहतां सर्वच साप कांहीं विषारी नसतात. आपल्या देशांत सापाच्या सुमारें १२५ जाती आढळतात. परंतु त्यांपैकीं अवघ्या २५ जातींचे सापच काय ते विषारी आहेत. बाकीचे सारे साप बिन-विषारी आहेत. विषारी सापांच्या या २५ जातींपैकींहि फक्त नाग, घोणस, मण्यार व फुरसें इत्यादि सापांचें विष तेवढें जालीम असतें. बाकीच्या विषारी सापांचें विष औषधोपचारानें उतरवितां येतें. सापाच्या विषावर औषधें शोधून काढण्यासाठीं अलीकडे खूप प्रयत्न चालू आहेत. मुंबईस हाफ्किन इन्स्टिटयूट या नांवाची एक संशोधनसंस्था आहे. तिनें तर या कार्यासाठीं स्वतःस वाहून घेतलें आहे. ठिकठिकाणचे निर-निराळ्या प्रकारचें साप मिळवून येथें त्यांच्या विषाची तपासणी करतात. व तें विष एखाद्या घोड्यास टोचून त्यापासून एक प्रकारचें नवें प्रतिद्रव्य तयार करतात. हें प्रतिद्रव्य अंगांत टोचलें कीं सापाचें विष उतरतें.

याशिवाय साप चावला कीं कोणते उपाय योजावेत याचेंहि अलीकडे

आपणांस बरेंच ज्ञान झालें आहे. सर्पदंश झालेल्या जागेच्या जरा वरच्या बाजूस आपण फडक्यानें घट्ट बांधलें कीं, तेथील रक्तप्रवाह बंद होतो व सापाचें विष अंगांत भिनत नाहीं. फडकें बांधल्यापासून दहा मिनिटांनंतर मात्र तें जरा सैल करावें लागतें. कारण तसें केलें नाहीं तर सर्पदंश झालेला अवयव कायमचा मृत होण्याचा संभव असतो. सर्पदंश झालेल्या ठिकाणीं सुमारें पाव इंच रुंद व पाव इंच खोल अशी जखम केली कीं, तेथील रक्त शरीराबाहेर पडूं लागतें व त्या रक्ताबरोबरच सापाचें विषहि शरीराबाहेर पडतें. त्यानंतर डॉक्टराकडून योग्य प्रकारचें इंजेक्शन घेतलें कीं, मग तर निर्धास्त राहावयासहि हरकत नसते. सर्पदंशाच्या ठिकाणीं केलेल्या जखमेंतील रक्त तोंडानेंहि शोषून घेतां येतें. अर्थात् असें करतांना रक्त-शोषण करणाराच्या तोंडांत सापाचें विष मात्र जातें. परंतु तोंडास जखम झालेली नसली कीं त्या विषाचा कांहीं वाईट परिणाम होत नाहीं. सापाच्या विषाची हीच गंमत आहे. तें मुखावाटें पोटांत गेलें, तर त्यापासून अपाय होत नाहीं. परंतु तें जखमेवाटें रक्तांत भिनलें कीं मग मात्र त्यापासून अपाय होतो. हे सर्व उपचार करतांना आपण बरीच काळजीहि घ्यावी लागते. सर्पदंशाच्या ठिकाणीं जखम करतांना रक्तवाहिन्या कापल्या जाणार नाहींत या गोष्टीस जपावें लागतें. शिवाय ही जखम वारंवार मिठाच्या पाण्यानें धुवावी लागते.

सापाचें विष उतरविण्यासाठीं खेड्यांतील लोक मंत्रतंत्रादींचा उपयोग करतात. बिनविषारी साप चावलेलीं व त्यामुळें नुसतींच भीतीनें भेदरून गेलेलीं माणसें मात्र या मंत्रतंत्रादींच्या उपायांनीं बरीं झाल्याचें आढळून येतें. कारण मंत्रानें विष उतरविण्यास तेथें मुळीं विषच नसतें ! साराच मनाचा खेळ ! सापाचें विष अंगांत भिनलें आहे हें मनानें ठरवायचें व तें मंत्रानें उतरलें हेंहि मनानेंच ठरवायचें !

सर्पदंश झाला कीं, इतक्या प्रकारें उपाययोजना करण्याचें आपणांस

ज्ञान झालें आहे. त्यामुळें सर्पदंश झाला कीं, खंबीर मनाचा माणूस सहसा डगमगत नाहीं. परंतु घाबरट माणसाची मात्र स्थिति अत्यंत शोचनीय होते. सर्पांच्या निरनिराळया जातींबद्दल, त्यांच्या विषारीपणाबद्दल, सर्पदंश झाला असतांना करावयाच्या उपचारांबद्दल आपणांस इतकें ज्ञान झालें तरी आपली भीति कांहीं अजून जात नाहीं. मग अतिप्राचीन काळीं साप दिसला कीं, माणसाची काय त्रेधा उडत असेल याची कल्पनाच करावी. नाग हा त्यांतल्या त्यांत महा भयंकर विषारी साप! तो दिसला कीं, त्याच्या सर्वांगांत भीतीचें कापरें सुटे. आपले प्राण घेण्यासाठीं हा यमदूतच आला आहे असें त्यास वाटे. त्यास खूष ठेवून आपल्या जिवावरचें संकट टाळण्यासाठीं त्याची सारखी धडपड चाललेली असे. या भीतीच्या पोटींच पुढें तो सापास देव.. मानूं लागला. त्या काळीं माणूस कोणत्याहि भयावह गोष्टीस देव मानीत असे. झंझावात सुटला कीं त्याचें सारें जीवन उध्वस्त होई. त्यामुळें तो वाऱ्यास देवता मानी. आकाशांत गडगडाट होई, चमचम विजा चमकत, सरसर पाऊस पडे व पृथ्वीवर जिकडे तिकडे पाणीच पाणी होऊन जाई. त्याला या सर्व गोष्टी अद्भुत वाटत. त्यामुळें त्या देवता आहेत असेंच त्यास वाटे. इंद्र, वरुण, अग्नि, वायु इत्यादि देवतांचा जन्म अशा प्रकारें भीतीच्या पोटींच झाला आहे. त्याचप्रमाणें माणसानें पुढें नागासहि आपलें दैवत मानलें व तो त्याची पूजा करूं लागला. नागपंचमीच्या दिवशीं आपण नागाची पूजा करतों या गोष्टीचा उगम हा असा आहे.

तथापि नाग हें दैवत कांहीं सर्व लोकांचें असणें शक्यच नाहीं. इंद्र, वरुण, अग्नि, वायु यांचा प्रभाव सर्व सृष्टीवर दिसतो. परंतु नागाचें तसें नाहीं. पृथ्वीवरील प्रदेशांत नाग कांहीं सर्वत्र आढळत नाहींत. जंगलाच्या भागांत ते विशेषत: आढळतात. अर्थात् अशा भागांत राहणारे लोकच नागास देवता मानणार! आपल्या हिंदुस्थानांतील दक्षिणेकडचा मुलूख

बराच जंगलमय आहे. तेथें नागाचें भय अधिक आहे. त्यामुळें तेथील लोक प्राचीन काळापासून नागास देवता मानून त्याची पूजा करीत आले आहेत. हे लोक द्रविड वंशाचे आहेत. हिंदुस्थानांत आर्य लोक येण्यापूर्वी येथें द्रविड लोकांनीं आपली वस्ती केली होती. एवढेंच नव्हे तर त्यांनीं आपल्या जीवनांतहि बरीच सुधारणा करून घेतली होती. इ. स. पूर्वी सुमारें १२०० वर्षांच्या काळांत देखील हे लोक समुद्रमार्गें ईजिप्त व मेसोपोटेमिया इत्यादि देशांशीं व्यापार करीत. त्यासंबंधींचे अनेक दाखले आतां मिळूं लागले आहेत. इमारती लाकूड, कापूस, मसाल्याचे पदार्थ, कापड व मोतीं इत्यादि जिनसांचा ते व्यापार करीत व रोमहून भांडीं, सोनें व कांच-सामान वगैरे आणीत. त्यांनीं येथें मोठमोठीं गांवेंहि वसविलीं होतीं.

कालांतरानें या देशांत उत्तरेच्या बाजूनें आर्य लोक आले. भारताच्या उत्तर प्रदेशांत त्यांच्या वसाहती वाढूं लागल्या तसतसे ते दक्षिणेकडे सरकूं लागले. अशा रीतीनें त्यांचा नागपूजक द्रविड लोकांशीं संबंध आला. प्रथम प्रथम आर्य व द्रविड लोकांत अनेक लढाया झाल्या. आर्यांच्या पराक्रमापुढें द्रविडांना हार खावी लागली. परंतु पुढें मात्र 'पाण्यांत राहून माशाशीं वैर करण्यांत अर्थ नाहीं' हें जाणून आर्यांनीं त्यांना आपल्यांत समाविष्ट करून घेण्यास सुरुवात केली व त्यांच्या स्त्रियांशीं विवाह केले. त्यामुळें आर्य–द्रविडांत सलोखा निर्माण होण्यास फार मदत झाली.

यासंबंधीं महाभारत काळांतील अशी कथा सांगतात कीं, आर्य लोक जसजसे भारताच्या पूर्व भागाकडे सरकूं लागले, तसतसा आसाम प्रांताच्या आसमंतांतील नाग लोकांनीं त्यांना कसून विरोध केला. नाग हे आपल्या भारतांतील आदिवासी जन आहेत. नाग राजा तक्षक यानें आर्यांचा पुढारी परीक्षित याचा वध केला. त्यामुळें परीक्षिताचा पुत्र जनमेजय चिडला व आपल्या पित्याच्या वधाचा सूड घेण्यासाठीं त्यानें नाग जातीचा होम आरंभिला. कांहीं दिवस हें वैर वाढतच गेलें. परंतु पुढें अगस्ति

नांवाच्या ऋषीनें या उभय जमातींत सलोखा घडवून आणला. अगस्ति ऋषींचा पिता आर्य असून माता नाग ज्ञातींतील होती. त्यामुळें त्यास हें सलोख्याचें कार्य घडवून आणणें सुकर झालें. हे नाग लोक आपणास अद्यापिहि आसाम प्रांतांतील डोंगराळ भागांत आढळून येतात. ते देखणे असून शूर व कलाप्रिय आहेत. प्राचीन काळीं पौरोहित्य करण्यापर्यंत देखील त्यांनीं आपली प्रगति करून घेतली होती असें दिसतें.

नागपूजेच्या माहात्म्यासंबंधीं एक कथा प्रचलित आहे. मणिपूर संस्थानांतील गोष्ट. तेथें एक शेतकरी आपलें शेत नांगरीत होता. शेत नांगरीत असतां त्याच्या नांगराचा फाळ एका वारुळावरून फिरला. त्या वारुळांत नागिणीचीं पिलें होतीं. तीं सर्व ठार झालीं. त्यामुळें ती नागिण चवताळली. तिनें त्या शेतकऱ्याच्या सर्व कुटुंबियांस दंश करून त्यांना यमसदनास पाठविलें. त्या शेतकऱ्याची एक मुलगी सासरीं गेली होती. ती मात्र जिवंत राहिली. परंतु चवताळलेली नागीण तिलाहि दंश करण्याकरितां निघाली. तो दिवस श्रावण शुद्ध पंचमीचा होता. त्या दिवशीं ती शेतकऱ्याची मुलगी पाटावर नागाचें चित्र काढून त्याची पूजा करीत होती. तें पाहून ती संतप्त नागीण शांत झाली. एवढेंच नव्हें तर त्या मुलीवर खूष होऊन तिनें त्या शेतकऱ्याच्या सर्व कुटुंबियांस पुन्हां जिवंत केलें. तेव्हांपासून श्रावण शुद्ध पंचमीस नागाची पूजा करण्याची प्रथा पडली असल्याचें सांगतात.

याच दिवशीं कृष्णानें यमुनेच्या डोहांतील महाविषारी कालिया नागास ठार मारलें. परंतु कालिया नागाच्या फडेवर उभा राहिलेल्या श्रीकृष्णास पाहून कालिया नागानेंच श्रीकृष्णाचें संरक्षण केलें असें गोकुळवासियांना वाटलें. त्यामुळें त्यांनीं त्यास दूध पाजलें. तेव्हांपासून नागाची पूजा करून त्यास दूध पाजण्याची प्रथा पडली असावी असेंहि मानलें जातें.

## समवाय

१. नागपंचमीची कथा सांगा.

२. द्रविड व नाग लोकांची माहिती देऊन आर्यांच्या जीवनावर त्यांचा काय परिणाम झाला तें सांगा.

३. विषारी व बिनविषारी सापांची माहिती देऊन सर्पदंशावरील उपचार सांगा.

४. गारुड्याचें शब्दचित्र रेखाटा.

५. नागपंचमीचें गाणें शिकवा.




श्रावण महिन्यांतील पौर्णिमेचा दिवस अनेक दृष्टींनीं वैशिष्ट्यपूर्ण असा आहे. या दिवशीं भारतांतील वेगवेगळया भागांत वेगवेगळया लोकांत वेगवेगळया प्रकारचे विधि केले जातात. उत्तर भारतांतील लोक या दिवशीं रक्षाबंधनाचा विधि साजरा करतात. त्यामुळें या दिवसाला 'राखी पुनव' असें म्हणतात. भारतांतील ब-याच भागांतील लोक या दिवशीं आपल्या मनगटावर, गळयांत अथवा बोटावर सुताचें पोवतें बांधतात. त्यामुळें या दिवसाला 'पोवती पौर्णिमा' असेंहि म्हटलें जातें. समुद्रकांठचे लोक या दिवशीं समुद्राची पूजा करून त्यास यथाविधि नारळ अर्पण करतात. त्यामुळें या दिवसाला 'नारळी पौर्णिमा' असेंहि म्हणतात. श्रावणी पौर्णिमेचें असें अनेकविध प्रकारचें वैशिष्ट्य आहे. भारतीय इतिहासाचीं व संस्कृतीचीं विविध अंगें त्यांत प्रतिबिंबित होतात.

समुद्रकांठचे लोक हा दिवस मोठ्या उत्साहानें साजरा करतात. समुद्र म्हणजे त्यांच्या जीवनाचा साथी. दर्यावर्दी लोकांचें सारें जिणें समुद्राच्या

कृपेवर अवलंबून असतें. मोठमोठ्या व्यापारी लोकांचेंहि समुद्र हेंच खरें दैवत आहे. समुद्रमार्गानें त्यांना देशोदेशीं मालाची ने-आण करता येतें. त्यामुळें समुद्रकांठचे व्यापारी या दिवशीं समुद्राच्या किनाऱ्यावर जाऊन त्याची विधिपूर्वक पूजा करतात व त्यास सोन्याचा अथवा चांदीचा नारळ अर्पण करतात. सामान्य माणसें या दिवशीं समुद्रास श्रीफल अर्पण करतात. श्रीफल म्हणजे पावित्र्याचें मूर्तिमंत प्रतीक आहे. तें अर्पून समुद्रास संतुष्ट करतांना समुद्रकांठच्या लोकांना मोठी कृतकृत्यता वाटते.

नारळी पौर्णिमेच्या दिवसापासून समुद्रकांठच्या लोकांचें दर्यावर्दी जीवन सुरू होतें. यापूर्वींचे दिवस पावसाळ्याचे असल्यामुळें समुद्र खवळलेला असतो. त्यावर प्रचंड वादळें होतात. त्यामुळें समुद्रावर प्रवास करणें धोक्याचें असतें. नारळी पौर्णिमेस पावसाळा संपून समुद्र शांत होतो व नौकानयनास अनुकूल परिस्थिति निर्माण होते. त्यामुळें या दिवसापासून समुद्रांत गलबतें, होड्या, पडाव यांचा संचार सुरू होतो. अर्थात् हा संचार करण्यापूर्वीं दर्यावर्दी जनतेनें आधीं जलदेवतेस संतुष्ट करणें क्रमप्राप्तच ठरतें.

देशाच्या उत्कर्षासाठीं व्यापाराच्या अभिवृद्धीची अत्यंत आवश्यकता असते. पाश्चिमात्य राष्ट्राच्या सद्यःकालीन उन्नतीचीं बीजें त्यांच्या व्यापारवृद्धींतच दिसून येतात. व्यापारासाठीं नवनवीन क्षेत्रें मिळविण्यासाठीं गेल्या चार-सहा शतकांत त्यांनीं नवे जलमार्ग शोधण्याचे कसे प्रयत्न केले या गोष्टीचा इतिहास अभ्यासणें मनोरंजक होईल. सुप्रसिद्ध धाडसी दर्यावर्दी ख्रिस्तोफर कोलंबस यानें अमेरिकेचा शोध लावून युरोपीय जनतेस एक नवी समृद्ध भूमि मिळवून दिली. त्या अमेरिकेचें व्यापारी प्रभुत्व आज अखिल जगांतील सर्व व्यवहारांवर गाजत असल्याचें आपण पाहतों. सुप्रसिद्ध पोर्तुगीज दर्यावर्दी वास्को-द-गामा यानें हिंदुस्थानच्या जलमार्गाचा शोध लावून पाश्चात्यांना व्यापारासाठीं मोठें

क्षेत्र मिळवून दिलें. त्यामुळें पाश्चिमात्य देश संपन्न बनले. हिंदुस्थानांतील व्यापार काबीज करण्यासाठीं इंग्रज, फ्रेंच, डच व पोर्तुगीज लोकांची आपसांत कशी स्पर्धा चालली होती हें आपण जाणतों. पाश्चात्य राष्ट्रांतील या व्यापारी स्पर्धेत इंग्रज पुढें सरसावले व त्यांनीं हिंदुस्थानांत व्यापार करून हळूहळू तेथील राज्यहि मिळविलें ! या सर्व गोष्टींवरून राष्ट्राच्या उत्कर्षासाठीं व्यापाराच्या अभिवृद्धीची किती आवश्यकता आहे ही गोष्ट आपणांस पटते व व्यापाराच्या अभिवृद्धीसाठीं नौकानयनकलेचें महत्त्वहि आपल्या लक्षांत येतें. या दृष्टीनें नारळी पौर्णिमेचा दिवस हा आपण राष्ट्रीय सण मानला पाहिजे व या दिवशीं आपल्या भारताच्या आयात व निर्यात व्यापाराची मुलांना यथायोग्य कल्पना देऊन त्यांच्या मनांत दर्यावर्दी जीवनाबद्दल विशेष जिव्हाळा व प्रेम निर्माण केलें पाहिजे.

सुदैवानें आपला भारत आतां स्वतंत्र झाला आहे व त्यास जगांतील अग्रेसर राष्ट्रांत मानाचें स्थान प्राप्त झालें आहे. अशा स्थितींत भारताचा अभ्युदय घडवून आणण्यासांठीं अविरत परिश्रम करणें हें आपलें परम पवित्र कर्तव्य आहे. भारतीय व्यापाराच्या अभिवृद्धीसांठीं नवीं क्षितिजें धुंडाळणें आतां आवश्यक झालें आहे. आपण भारतीय लोक प्राचीन काळीं कुशल दर्यावर्दी व्यापारी होतों. इ. स पूर्वीं सिंधु नदीच्या कांठीं राहणारे द्रविड लोक नौकानयनांत अत्यंत कुशल होते. मोठमोठीं गलबतें बांधून ते समुद्रमार्गानें मेसोपोटेमिया, ईजिप्त, ग्रीस इत्यादि देशांशीं व्यापार करीत. त्यासंबंधींचे अनेक पुरावे अलीकडे उपलब्ध होत आहेत. प्राचीन काळीं वैभवाशिखरावर चढलेल्या तक्षशिला नगरीच्या उत्खननांत अनेक ग्रीक नाणीं सांपडलीं आहेत. याशिवाय दक्षिण हिंदुस्थानांतील अनेक ठिकाणीं प्राचीन काळचीं रोमन नाणीं आतां सांपडलीं आहेत. प्राचीन काळीं चीन देशाशीं आपला जोराचा व्यापार चालत असे. या देशांतून कापड, मसाल्याचे पदार्थ, रत्नें, हस्तिदंत, पोवळीं इत्यादि जिनसा परदेशीं पाठविल्या जात.

तथापि आपल्या व्यापारी उत्कर्षाच्या व नौकानयनपटुत्वाच्या या उज्ज्वल इतिहासाला मध्यंतरीं आपण विसरलों होतों. त्यामुळें भारतीय लोक दर्यावर्दी कधींच नव्हते अशी खोटी कल्पना आपण कित्येक वर्षें उराशीं बाळगत आलों आहोंत. ही कल्पना आतां आपण सोडून दिली पाहिजे. मध्यंतरींच्या काळांत भारतीयांनीं जलपर्यटन करणें निषिद्ध असल्याचेंहि प्रतिपादन केलें होतें. त्यामुळेंच ब्रिटिशांनीं हिंदी शिपायांना जलपर्यटन करण्याची सक्ति करतांच त्यांनीं वेळोवेळीं बंडाचा उठाव केल्याचें आपण पाहिलें आहे. इ. स. १८५७ च्या स्वातंत्र्य युद्धांतहि हीच गोष्ट आपल्या नजरेस आली आहे.

तथापि प्राचीन काळीं भारतीयांनीं जलपर्यटन कधींच निषिद्ध मानलें नव्हतें. एवढेंच नव्हे तर जलपर्यटन करून त्यांनीं देशोदेशीं आपल्या संस्कृतीचा प्रसार केला होता व तेथें आपलीं राज्येंहि स्थापन केलीं होतीं. कलिंग देशावर राज्य करणाऱ्या शैलेंद्र घराण्यांतील राजांनीं तर ७०० वर्षें-पर्यंत आपली हिंदी व पॅसिफिक महासागरावरील सत्ता अबाधित ठेवली होती. इ.स.च्या ११ व्या शतकापर्यंत शैलेंद्र घराण्याची ही भरभराट अव्याहत चालूं होती. इ.स.च्या पहिल्या व दुसऱ्या शतकांत ताम्रलिप्ति व मच्छलीपट्टण हीं बंदरें भारतीयांच्या जलसंचाराचीं स्फूर्तिदायक केंद्रें होतीं. या बंदरांतून जलपर्यटनास सुरवात करून भारतीयांनीं पूर्वेकडील अनाम, चंपा, सयाम, कंबोडिया, जावा, बोर्निओ व बाली बेटें इत्यादि देशांत आपल्या वसाहती स्थापन केल्या होत्या. या देशांत त्या काळीं हिंदु संस्कृतीचा बराच प्रसार झालेला होता. या देशांचीं नांवेंहि आपल्या भारतीय नांवांचीं अपभ्रष्ट रूपेंच आहेत. जावा, सुमात्रा, मलाया, कंबोडिया, बोर्निओ व बाली या देशांचीं नांवें अनुक्रमें यव, मलय, सुमित्र, कंबुद्वीप, भरणी व बाली इत्यादि भारतीय शब्दांपासून बनलेलीं आहेत. या देशांतील बहुतांश जनतेच्या जीवनावर अद्यापिहि हिंदु संस्कृतीची छाप दिसून येते. तेथें भारतीय संस्कृतीचे अनेक

अवशेष अजूनहि दृष्टीस पडतात. जावा बेटांतील अंगकोर थोम व अंगकोर वट येथील श्रीविष्णूचीं देवळें तर भारतीय शिल्पकलेचे अप्रतिम नमुने आहेत.

नारळी पौर्णिमेच्या निमित्तानें आपल्या पूर्वजांच्या परदेशसंचाराच्या या उज्ज्वल इतिहासाची आपण ओळख करून घेतली पाहिजे. त्याचप्रमाणें चालू काळांतहि व्यापारवृद्धीसाठीं भारताचे कसे प्रयत्न चालूं आहेत या गोष्टीची आपण माहिती मिळविली पाहिजे. समुद्रमार्गानें व्यापार करण्या-साठीं जहाजांची फार आवश्यकता असते. त्यामुळें सरकारनें आतां नवनवीन जहाजें बांधण्याचा प्रयत्न सुरू केला आहे. ‘ जल आझाद ’ व ‘ जल उषा ’ या नव्या जहाजांचीं नांवें आपण कदाचित् ऐकलीं असतील. अशीं कितीतरी जहाजें आपणांस अद्याप बांधलीं पाहिजेत. जुन्या जहाजांची डागडुजी केली पाहिजे. श्री. वालचंद हिराचंद या धनाढ्य व्यापाऱ्यांनीं विजगापट्टण येथें जहाजें बांधण्याचा कारखाना सुरू करण्याचा प्रयत्न केला होता. अशा प्रयत्नाला हल्लीं सरकारकडून बरेंच प्रोत्साहन मिळत असून लहान लहान होड्या बांधण्याच्या अथवा त्यांची दुरुस्ती करण्याच्या प्रश्नाकडेहि हल्लीं आस्थेवाईकपणानें लक्ष दिलें जात आहे.

जहाजावर काम करण्यासाठीं आपल्या देशास खलाशी लोकांची फार आवश्यकता आहे. त्याकरितां खलाशाच्या धंद्याचें शिक्षण देणाऱ्या संस्था निर्माण झाल्या पाहिजेत. या प्रश्नाचा विचार करण्यासाठीं भारत सरकारनें इ. स. १९४७ सालीं ‘ मर्चंट नेव्ही ट्रेनिंग समिति ’ स्थापन केली आहे. हल्लीं जहाजावर काम करणाऱ्या अधिकाऱ्यांना शिक्षण देण्यासाठीं मुंबई येथें एक कॉलेज काढण्यांत आलें आहे. ‘ डफरिन ’ नांवाच्या जहाजाचाहि या कामीं बराच उपयोग करून घेतला जातो. याशिवाय खलाशांच्या उतरण्याची व जेवणाखाणाची सोय करण्यासाठीं मुंबई व कलकत्ता या बंदरांत उत्तम वसतिगृहें स्थापन करण्यांत आलीं आहेत.

सुदैवानें आपला देश आतां स्वतंत्र झाला आहे. त्यामुळें आज त्यास जगांत मानाचें स्थान प्राप्त झालें आहे. त्याचा उत्कर्ष घडवून आणण्यासाठीं ही सर्वस्वीं अनुकूल अशीच परिस्थिति आहे. या परिस्थितीचा आपण योग्य तो सदुपयोग करून घेऊन आपल्या देशाचा व्यापार वाढविला पाहिजे. या गोष्टीचा विचार करण्यासाठीं भारत सरकारच्या व्यापार-खात्यानें इ. स. १९४५ सालीं 'दी डायरेक्टोरेट जनरल ऑफ शिपिंग' या नांवाची एक समिति स्थापन केली होती. या समितीनें व्यापारी जहाजांची वाहतूक वाढविण्याचा बराच प्रयत्न केला आहे. मध्ययुगीन काळांत भारतीय जहाजांना हिंदुस्थानचा किनारा सोडून इतरत्र संचार करण्याची मोकळीक नसे. तथापि आतां आंतरराष्ट्रीय समुद्रमार्गावर संचार करण्याची भारतीय जहाजांना परवानगी मिळाली आहे. त्यामुळें पौर्वात्य देशांत पाठविला जाणारा माल अलीकडे आपल्या जहाजांतूनच पाठविला जातो. त्याचप्रमाणें एस्. एस्. 'बंगाल' व एस्. एस्. 'बॉम्बे' या जहाजांतून ऑस्ट्रेलियाच्या मार्गावरहि वाहतूक चालू आहे. याशिवाय तुतिकोरिन ते कोलंबो या मार्गावरहि भारतीय जहाजें व्यापारी वाहतूक करीत आहेत. या सर्व प्रयत्नांमुळें परदेशी मालाच्या आयातीसाठीं भारतास येणारा खर्च वांचेल व देशी मालाच्या निर्यातीबद्दल पैसा मिळवितां येईल. गेल्या दोन वर्षांत परदेशी मालाच्या आयातीसाठीं भारतास ४५ लक्ष डॉलर्स-पेक्षां अधिक खर्च आल्याचें जाहीर झालें आहे. या कामासाठीं देशी जहाजांची योजना करता आली असती तर हा अवाढव्य खर्च आपणांस वांचवितां आला असता. त्याचप्रमाणें गेल्या दोन वर्षांत देशी मालाची निर्यात करून भारतानें ५० लक्ष डॉलर्सपेक्षां अधिक कमाई केली आहे. अशा प्रकारें आपल्या देशाची मिळकत वाढूं लागल्यास आपला देश लवकरच समृद्ध होईल अशी आशा बाळगावयास हरकत नाहीं. नारळी पौर्णिमेच्या निमित्तानें या सर्व परिस्थितीची आपण नीटपणें जाणीव करून घेतली पाहिजे.

समुद्रकिनाऱ्यापासून दूर असलेल्या ठिकाणीं नारळी पौर्णिमेच्या दिवशीं रक्षाबंधनास विशेष महत्त्व आहे. या दिवशीं रेशमाच्या सुताची राखी करून ती बहिणीनें भावाच्या मनगटावर बांधावयाची असते. असें केल्यानें बहिणीच्या रक्षणाची भावावर जबाबदारी येऊन पडते. त्यामुळें ज्याला रक्षणाची आवश्यकता भासते असे लोक रक्षण करण्यास समर्थ असलेल्या पुरुषांच्या हातांत राखी बांधतात. प्राचीन काळीं रक्षाबंधनाच्या या विधींस विशेष महत्त्व असे. रजपूत लोक हा दिवस मोठ्या भाविकतेनें साजरा करतात. त्यामुळें शत्रूंतील वैरभाव क्षणांत नष्ट होतो. प्राचीन काळीं विधर्मीय लोक देखील रक्षाबंधनाचें महत्त्व जाणून राखीचा योग्य तो मान ठेवीत. गुजराथ देशाची राणी कर्मवती हिनें हुमायुनास राखी पाठवून त्याच्याशीं बंधुत्वाचें नातें जोडलें होतें व हुमायुनानेंहि राणी कर्मवतीस आपली भगिनी मानून तिच्या रक्षणाची जबाबदारी आपल्या शिरावर घेतली होती. राखी ही आपणांस असमर्थांचें संरक्षण करण्याचा महान् संदेश देते. तो आपण नीट लक्षांत घेतला पाहिजे. विजातयि अथवा विधर्मीय बांधवांस रक्षाबंधनाच्या दिवशीं राखी बांधून आपणांस जातीय व धार्मिक वैमनस्य नाहींसें करता येईल व परस्परांत बंधुभाव निर्माण करतां येईल. या दिवशीं रक्षणाची अपेक्षा बाळगणाऱ्या शाळेंतील मुलांनीं आपल्या गांवांतील वडील माणसांना राखी बांधल्यास त्यांच्या मनांत शाळेबद्दल एक प्रकारचा जिव्हाळा निर्माण होईल व शाळेच्या प्रगतीबद्दल व मुलांच्या शिक्षणाबद्दल ते अधिक काळजी वाहतील.

याच दिवशीं सुताचीं पोवतीं करून तीं देवांना व गुरूंना अर्पण करण्याचीहि चाल आहे. पोवतें म्हणजे पावित्र्य. प्रत्येक कार्य करीत असतांना आपण पावित्र्य राखलें पाहिजे हेंच तत्त्व या विधीच्या बुडाशा आहे. हल्लींच्या काळांत स्वतःच्या हातानें कांतलेल्या सुताचें कापड हेंच खरें

पावित्र्याचें प्रतीक मानलें पाहिजे. अशा प्रकारचें खादीचें कापड अर्पण करून गुरूची पूजा करणें या दिवशीं अधिक योग्य ठरेल.

## समवाय

१. श्रावणी पौर्णिमेचा दिवस ठिकठिकाणीं कोणत्या रीतीनें साजरा करतात, तें सांगा.
२. नारळी पौर्णिमेचें महत्त्व पटवून देऊन प्राचीन काळांतील भारतीय लोकांच्या परदेशसंचाराचा इतिहास सांगा व विशाल भारताची कल्पना द्या.
३. व्यापारवृद्धीसाठीं भारत सरकारचे कसे प्रयत्न चालू आहेत तें सांगा व या विषयाचें महत्त्व पटवून द्या.
४. समुद्रप्रवासाचा वृत्तान्त वाचा व धाडशी दर्यावर्दी लोकांच्या जीवनाची ओळख करून द्या.
५. दर्यागीत शिकवा.
६. समुद्रावरील निरनिराळे मार्ग दाखवा व त्यांचीं वैशिष्ट्यें सांगा.
७. रक्षाबंधनामुळें ऐक्यसाधनेस कशी मदत होईल तें पटवा.
८. खादीचें पावित्र्य पटवून द्या.
९. राखी व पोवतीं तयार करून घ्या.

---



# श्रावणी

श्रावण महिन्यांतील पौर्णिमेच्या दिवशीं ब्राह्मण लोक यज्ञोपवीत (जानवें) घालतात. हा विधि श्रावण महिन्यांत करावयाचा असल्यामुळें त्यास 'श्रावणी' असें म्हणतात. यज्ञोपवीत धारण करावयाची ही प्रथा प्राचीन काळापासून चालत आलेली आहे. यज्ञोपवीतासंबंधीं प्रजापतीची कथा रूढ आहे. प्रजापतीला आपण जगाचा निर्माता मानतों. हें जग व माया त्यापासूनच निर्माण झाली आहे. या प्रजापतीनें एकदां देवाचा यज्ञ मोडण्याचां प्रयत्न केला. त्यामुळें त्याला शासन करण्यासाठीं भगवान् शंकर निघाले. तें पाहून प्रजापतीनें हरिणाचें रूप घेतलें व तो पृथ्वीवर पळाला. तेव्हां त्याचा वध करण्यासाठीं शंकरानींहि व्याधाचें रूप घेतलें. त्यांनीं मृगरूप प्रजापतीचा पाठलाग करून त्याला आपल्या तीक्ष्ण बाणानें ठार केलें. रात्रीच्या वेळीं आकाशांत आपण व्याधाचा तारा पाहतों तोच हा व्याध. तेथून थोड्याच अंतरावर आपणांस मृगाच्या पोटांत बाण गेला असल्याचें दर्शन घडविणारा मृग नक्षत्राचा तारकासमूह दिसतो. व्याधाच्य

ताऱ्याचें तेज मोठें मनोवेधक असतें. कवि अनंत काणेकर यांनीं आपल्या 'चांद्रात' या कवितेंत त्याचें 'निळया तांबड्या हिरवट पिवळया तेजाची सांडणी । करितसे व्याधाची चांद्णी' असें बहारीचें वर्णन केलें आहे. प्रजापतीचा नाश झाला त्या वेळीं त्याचा कमरपट्टा गळून पडला. तोच यज्ञोपवीताच्या रूपानें श्रावणीच्या दिवशीं धारण करतात.

प्राचीन काळीं यज्ञोपवीत धारण करण्याचा हा विधि अत्यंत थाटानें साजरा केला जाई. या प्रसंगीं पूर्वीं हातानें विणलेलें वस्त्र म्हणजे उत्तरीय अथवा उपरणें धारण करण्याचा व मृगाजीन वापरण्याचा प्रघात होता. तथापि कालांतरानें ही प्रथा नष्ट होऊन त्याऐवजीं त्या वस्त्राचें प्रतीक असें सुताचें यज्ञोपवीत तेवढें राहिलें व मृगाजिनाच्या ऐवजीं त्याचा लहानसा तुकडा यज्ञोपवीतांत धारण करण्याची प्रथा पडली. हल्लीं श्रावणीच्या दिवशीं ब्राह्मण लोक एकत्र जमून आपल्या अनामिकेंत (करंगळीजवळच्या बोटांत) दर्भाचें पवित्रक घालतात व पंचगव्य प्राशन करून आत्मशुद्धि करतात. त्यानंतर होमास आरंभ होतो. होमांत आहुति देऊन झाल्यानंतर ब्राह्मण उपाध्यायास नमस्कार करतात व प्रथम अग्नीस व नंतर उपाध्यायास यज्ञोपवीत देऊन नंतर तें स्वतः धारण करतात.

प्राचीन काळीं यज्ञोपवीत धारण करण्याच्या या विधीपासून मुलांच्या शिक्षणास सुरुवात होत असें. मुलगा आठ वर्षांचा होईपर्यंत त्याचा सर्वतोंपरी सांभाळ करण्याची जबाबदारी ही मातेची आहे असें समजलें जाई. त्यामुळें मुलाच्या वयास आठ वर्षें पुरीं होतांच माता आपल्या या विशेष जबाबदारींतून मुक्त होत असे. यापुढें मुलास शिक्षण देऊन त्यास कर्मकुशल व व्यवहारचतुर बनविण्याची जबाबदारी पित्याची मानली जाई. त्यामुळें या दिवशीं मातृभोजनाचा सोहळा होई. हा सोहळा झाल्यानंतर पित्याच्या कर्तव्यास आरंभ होत असे. या वेळीं पिता आपल्या पुत्रास गुरुगृहीं नेऊन पुढील शिक्षणासाठीं त्यास विधिपूर्वक गुरूच्या

ताम्यांत देई. या विधीस उपनयनविधि असें म्हणतात. उपनयन म्हणजे जवळ नेणें. या प्रसंगीं पिता हा आपल्या पुत्रास गुरूच्या जवळ नेतो. पूर्वी उपनयन विधीच्या वेळीं विद्यार्थी व गुरुजन एकत्र बसून होम करीत व नंतर यज्ञोपवीत धारण करीत. या वेळीं गुरु आपल्या शिष्यास गायत्री मंत्राचा उपदेश करीत असे. 'श्रेष्ठ तें तेज सूर्याचें। आम्ही ध्यातों मनें सदा। प्रेरणा बुद्धि ते देवो। मागणें स्मरुनि पदा' अशा प्रकारें गायत्री मंत्राचा उच्चार करून शिष्य आपल्या गुरूपासून विद्या-दानाची याचना करीत असे.

श्रावणीचा विधि करीत असतांना प्रत्येक विद्यार्थ्यास त्याच्या गोत्रां-तील प्रवरांच्या नांवाचा उच्चार करावा लागतो. प्रवर म्हणजे श्रेष्ठ असे पूर्वज. श्रावणीच्या निमित्तानें आपल्या आदरणीय पूर्वजांचें स्मरण केल्यानें विद्यार्थ्यांच्या मनांत आत्मविश्वास निर्माण होतो व आपल्या कर्तृत्ववान् पूर्वजांचें अनुकरण करण्याचा आदर्श त्यांच्या डोळयापुढें सतत राहतो. हल्लीं आपण आपल्या शाळांतून थोर व्यक्तींच्या जयंत्या व पुण्यतिथ्या साजऱ्या करतों त्याच्या मुळाशीं हाच हेतु असतो.

श्रावणीच्या दिवशीं नवीन शिष्यांना दीक्षा देण्याच्या विधीबरोबरच अध्ययन पूर्ण झालेल्या शिष्यांना निरोप देण्याचाहि समारंभ होत असे. या दोन्ही विधींस त्या काळीं अनुक्रमें उपाकर्म व उत्सर्जन असें म्हणत. अध्ययनपूर्तीनंतरच्या विधीस समावर्तन असेंहि म्हणतात. या वेळीं गुरुजी आपल्या शिष्यांना निरोप देतांना त्यांस नवीन जोडा, नवीन वस्त्र, शिरावर धारण करण्यासाठीं नवें छत्र इत्यादि वस्तु अर्पण करीत व सुवासिक तेलानीं आंघोळ घालून त्याची पूजा करीत. ब्रह्मचर्याश्रमाची समाप्ति झाल्यामुळें विद्यार्थ्यांस आतां साधें राहून जीवितांतील आनंदोपभोगापासून अलिप्तता बाळगण्याची आवश्यकता नसे. शेवटीं आपल्या शिष्यांस निरोप देतांना

गुरु बहुमोल असा उपदेश करीत. "सत्य भाषण कर. धर्माप्रमाणें वाग. अध्ययन सोडूं नकोस. अध्ययनसमाप्तीनंतर गुरुदक्षिणा दिली कीं, विद्यार्जनाची जबाबदारी संपली असें समजूं नकोस. आपलें भलें व्हावें यासाठीं खोटें कर्म करूं नकोस. परमेश्वर, पिता व माता यांच्याविषयींच्या आपल्या कर्तव्यास चुकूं नकोस." असा त्यांचा उपदेश असे. गुरूच्या आश्रमाचा त्याग केल्यानंतर शिष्य ठिकठिकाणीं हिंडून इतर विद्वानांशीं चर्चा करीत व अनुभवाच्या निकषावर आपलें ज्ञान लावून पाहात. त्यामुळें त्यांस ज्ञानाच्या अनंतत्वाची कलपना येऊन त्यांच्या ठिकाणीं नम्रभाव निर्माण होई. गृहस्थाश्रमाचा स्वीकार केल्यानंतरहि चातुर्मासाच्या काळीं कांहीं शिष्य आपल्या गुरुगृहीं जाऊन प्राप्त केलेल्या ज्ञानास उजळा देत. प्राचीन काळीं स्त्रियांना व इतर वर्णियांना देखील ज्ञानार्जनाची मोकळीक असे.

उत्सर्जन व उपाकर्म या विधीसाठीं श्रावणमासाची योजना बुद्धिपुरस्सर झालेली दिसते. त्या काळीं शिक्षण हें केवळ पुस्तकी ज्ञानापर्यंतच मर्यादित नव्हतें. गुरुगृहीं गेल्यानंतर शिष्यास तेथें सर्व प्रकारचीं कामें करावीं लागत. आश्रमाची झाडलोट करणें, होमासाठीं लाकडें आणणें, कंदमुळें गोळा करणें, गुरूच्या गाई राखणें, शेत राखणें व याशिवाय गुरूनें व गुरुपत्नीनें सांगितलेलीं अन्य कामें करणें या सर्व गोष्टी तत्कालीन शिक्षणक्रमांतच समाविष्ट होत्या. अर्थात् माघ ते आषाढापर्यंतच्या पावसाळयाच्या दिवसांत या कृतिशिक्षणासाठीं फारशी अनुकूल परिस्थिति नसे. त्यामुळें या दिवसांत गुरु आपल्या शिष्यांना सुट्टी देत. या सुट्टीच्या मुदतींत विद्यार्थी स्वगृहीं जाऊन आपल्या आईवडिलांस त्यांच्या उद्योगधंद्यांत मदत करीत. त्यामुळें शिक्षण आणि जीवन या दोन्ही गोष्टींचा सहयोग घडून येत असे. ही स्थिति खरोखर अनुकरणीय अशीच आहे. त्या दृष्टीनें आपल्या शालेय सुट्टयांची मांडणी करणें आतां अगत्याचें झालें आहे. हल्लीं आपल्या भारतांत जीवनशिक्षणाचा प्रसार करण्यासाठीं तर या गोष्टीची

फार आवश्यता आहे. मुलांनीं केवळ शाळेंत केलेल्या कामावर संतुष्ट न राहतां त्यांस प्रत्यक्ष उद्योगधंद्याच्या जीवनाचा अनुभव घेण्याची संधी दिली पाहिजे. हल्लीं प्रचलित असलेल्या सुट्टया देण्याच्या पद्धतीमुळें मुलांना आपल्या आईवडिलांच्या धंद्यांस मदत करण्यांत बरीच अडचण उत्पन्न होते. त्यामुळें शाळेंतील गैरहजेरी वाढते. पेरणीच्या व सुगीच्या दिवसांत ग्रामीण शाळांतीलं मुलांचें गैरहजेरीचें प्रमाण पाहिलें कीं, ही गोष्ट लक्षांत आल्याशिवाय राहात नाहीं. अशा स्थितींत शाळेचें काम चालू ठेवण्याचा अट्टाहास बाळगणें योग्य नाहीं. आपल्या भारताचे भूतपूर्व गव्हर्नर जनरल श्री. राजगोपालचारियर यांनीं आठवड्यांतून फक्त तीन दिवसच शाळा चालवाव्या असें एकदां म्हटलें होतें. त्याचें मर्म हेंच होय. श्रावणीच्या विधीपासून आपण हा बोध अवश्य घेण्यासारखा आहे.

श्रावणीच्या दिवशीं शाळेच्या आजी व माजी विद्यार्थ्यांचें संमेलन भरविणें सयुक्तिक ठरेल. या संमेलनास पालकांना उपस्थित राहण्याची विनंति केली पाहिजे. त्यामुळें पालकांच्या मनांत शाळेबद्दल आपुलकी निर्माण होईल व त्यांच्यासमोर विद्यार्थ्यांच्या प्रगतीचा आढावा सादर करता येईल. या प्रसंगीं माजी विद्यार्थ्यांचा गुणगौरव केल्यास त्यापासून विद्यमान विद्यार्थ्यांना सुयशप्राप्तीची स्फूर्ति मिळेल. माजी विद्यार्थ्यांनींहि या वेळीं आपले अनुभव सांगून शाळेबद्दलच्या विद्यार्थ्यांच्या कर्तव्याची मुलांस योग्य ती जाणीव करून द्यावी. अशा तऱ्हेचें संमेलन घडवून आणल्यास शाळा व गांव यांचे संबंध दृढ होतील व ग्रामस्थांच्या मनांत शाळेच्या उत्कर्षासाठीं झटण्याची तळमळ उत्पन्न होईल ही गोष्ट अवश्य लक्षांत ठेवली पाहिजे. अलीकडे शाळा सोडून गेलेल्या खेड्यांतील लोकांना शाळेबद्दल विशेष आपुलकी वाटत नाहीं. अशा स्थितींत शालेय जीवनाकडे त्यांचीं मनें आकर्षून घेण्यासाठीं व त्यांच्याहि ज्ञानास उजळा देण्यासाठीं श्रावणीच्या दिवशीं स्नेहसंमेलन घडवून आणण्याची फार आवश्यकता आहे.

## समवाय

१. प्राचीन काळची शिक्षणपद्धति कशी होती तें सांगा.

२. श्रावणीच्या विधीचें महत्त्व कथन करा.

३. स्नेहसंमेलन घडवून आणून त्यांत आजी व माजी विद्यार्थ्यांच्या प्रगतीचा आढावा घेतां येईल व त्यांच्या कार्यांचा गौरव करता येईल, असे कार्यक्रम ठेवा.

४. आपल्या आदर्श पूर्वजांचें स्मरण करून देऊन त्यांच्याप्रमाणेंच ज्ञानाची ज्योत अखंड तेवत ठेवण्याचा शपथविधि करा.



# गोकुळ अष्टमी

श्रावण वद्य अष्टमीस कंसाच्या बंदिशाळेंत भगवान् श्रीकृष्णाचा जन्म झाला. त्यास दुष्ट कंसाच्या तडाख्यांतून सोडविण्यासाठीं वसुदेव रातोरात नंदाघरीं घेऊन गेला. त्या वेळीं नंदाची पत्नी यशोदा ही नुकतीच प्रसूत होऊन तिला मुलगी झाली होती. वसुदेवानें त्या मुलीस उचलून आपणाजवळ घेतलें व तिच्या जागीं श्रीकृष्णास ठेवून तो बंदिशाळेंत परत आला. दुसऱ्या दिवशीं सकाळीं देवकी प्रसूत झाल्याची बातमी कंसाला समजली. तेव्हां तो बंदिशाळेंत आला. त्यानें देवकीजवळील मुलीस खसकन् ओढून शिळेवर आपटलें. तथापि ती शक्तिस्वरूप मुलगी गतप्राण न होतां दिव्य तेज धारण करून आकाशांत निघून गेली. आकाशांत जात असतांना ती कंसाला म्हणाली, “अरे दुष्टा कंसा, माझा घात करून तूं निर्भय होऊं पाहात होतास काय ? पण ऐक. तुझे प्राण हरण करणारा श्रीकृष्ण या वेळीं गोकुळांत सुखरूप आहे. आतां तुझीं शंभर वर्षें भरलींच म्हणून समज ! ”

शक्तिदेवीची ती भविष्यवाणी ऐकून कंस भयभीत झाला. त्यानें श्रीकृष्णाचा घात करण्यासाठीं नाना युक्त्या योजिल्या. तथापि त्या सर्व निष्फळ ठरल्या. श्रीकृष्ण नंदाच्या घरीं सुखानें वाढूं लागला. बाळ-गोपाळांत मिसळून तो नाना तऱ्हेच्या क्रीडा करूं लागला. गोपींच्या खोड्या काढून सर्वत्र हास्याचे फवारे उडवूं लागला. सकाळच्या वेळीं श्रीकृष्ण गोपाळांबरोबर गाई चारण्यासाठीं रानांत जाई. तेथें तो गोपाळांबरोबर अनेक प्रकारचे खेळ खेळे. श्रमपरिहार करण्यासाठीं श्रीकृष्ण आपली मधुर बांसरी वाजवी. श्रीकृष्णाच्या बांसरीचे मधुर स्वर ऐकतांच गाई कान टवकारून त्याच्याभोंवतीं उभ्या राहात. गोकुळांतील गोपी तर श्रीकृष्णाचा मुरलीरव ऐकतांच कामधंदा सोडून त्याच्या भोंवतीं जमत. तेथें श्रीकृष्ण गोपीं समवेत रासनृत्य करी. अशा प्रकारें गोकुळांत श्रीकृष्णाचें जीवन मोठ्या आनंदांत चाललें होतें. श्रीकृष्णाच्या अंगच्या दैवी शक्तीचीहि गोपाळांस जाणीव झाली होती. श्रीकृष्णानें कालिया नागास ठार मारून गोकुळवासियांस निर्भय केलें होतें. त्यामुळें गोकुळवासियांचें श्रीकृष्णावर निरतिशय प्रेम जडलें. श्रीकृष्णाच्या सांगण्यावरून त्यांनीं इंद्राच्या ऐवजीं गाईची पूजा करण्यास आरंभ केला. त्यामुळें इंद्र चिडला. त्यानें गोकुळावर जलप्रलय मांडला. त्या वेळीं श्रीकृष्णानें गोवर्धन पर्वताखालीं सर्व गोकुळवासियांस सुरक्षित ठेवलें. श्रीकृष्णाचें हें कर्तृत्व विस्मयकारक होतें त्यामुळें गोकुळांतील गोपाळांचा तो पुढारी बनला. श्रीकृष्णाचें तेज मोठा विलक्षण दिसे. त्यानें मल्लविद्या संपादन करून शरीरबलहि प्राप्त करून घेतलें होतें.

श्रीकृष्णाच्या या सर्व लीला कंसाच्या कानावर जात. त्यावेळीं त्याच्या सर्वांगाचा थरकांप होई. अखेरीस त्यानें श्रीकृष्णास ठार मारण्यासाठीं मोठा व्यूह रचला, व मथुरेंत एक सुंदर आखाडा बांधून तेथें कुस्त्या करण्या-साठीं श्रीकृष्णास बोलावणें पाठविलें. श्रीकृष्णास घेऊन जाण्यासाठीं अक्रूर गोकुळास आला. त्याप्रमाणें कृष्ण व त्याचा बंधु बळराम हे मथुरेस

गेले. कंसानें त्यांच्या अंगावर दोन हत्ती सोडले. परंतु श्रीकृष्ण-बळरामाच्या जोडीनें त्यांना ठार केलें. त्यानंतर त्यांची मुष्टिक व चाणूर या राक्षसांशीं झोंबी जुंपली. त्यांनाहि या जोडीनें ठार केलें. तेव्हां कंसाचें भीतीनें भान हरपलें. तो श्रीकृष्णास अद्वातद्वा बोलूं लागला. तें निमित्त साधून श्रीकृष्णानें त्यास ठार मारलें.

कंसाचा वध केल्यानंतर श्रीकृष्णानें बंदिशाळेंतील सर्व सज्जनांना सोडविलें. मथुरेचें राज्य कंसाचा पिता उग्रसेन याच्या हवालीं करून तो विद्याभ्यासासाठीं उज्जयनी येथें सांदिपनी ऋषींच्या आश्रमांत निघून गेला. तेथें त्यानें धनुर्विद्या संपादन केली. अध्ययनसमाप्तीनंतर श्रीकृष्ण पुन्हां मथुरेस आला. तथापि मथुरेंतील जीवन आतां सुखाचें राहिलें नव्हतें. कंसाचा सासरा, मगध देशाचा राजा—जरासंध हा आपल्या जामाताच्या वधाचें उट्टें काढण्यासाठीं मथुरेवर चालून आला. त्या वेळीं श्रीकृष्णानें सेनापतित्व स्वीकारून जरासंधाचा पराभव केला. परंतु तेवढ्यानें जरासंध डगमगला नाहीं. तो मथुरेवर पुन्हां चाल करून आला. त्यामुळें मथुरेंतील लोकांचें जीवन अत्यंत दुःखाचें झालें. तें पाहून श्रीकृष्ण बळरामासह मथुरा सोडून गोमंत पर्वतावर निघून गेला. जरासंधानें गोमंत पर्वत पेटवून श्रीकृष्ण व बळराम यांना ठार मारण्याचा प्रयत्न केला. तथापि श्रीकृष्ण—बळरामाची जोडी सुखरूपपणें गोमंत पर्वताबाहेर पडली. त्यांनीं जरासंधाशीं युद्ध करून त्याचा पराभव केला. त्यानंतर ते पुन्हां मथुरेंस येऊन राहिले.

या वेळीं विदर्भ देशाचा राजा भीष्मक यानें आपली मुलगी रुक्मिणी हिचें स्वयंवर मांडलें होतें. श्रीकृष्ण त्या स्वयंवरासाठीं हजर राहिला. ही गोष्ट श्रीकृष्णाच्या विरुद्ध असलेल्या राजांना आवडली नाहीं. त्यांनीं श्रीकृष्णाशीं युद्ध आरंभिलें. त्या युद्धांत श्रीकृष्णानें जरासंध व कालयवन इत्यादि राजांचा पराभव केला. त्यानंतर श्रीकृष्ण आपल्या यादव

कुलांतील बांधवांसह द्वारका बेटावर राहूं लागला. पुढें त्यानें रुक्मिणी हरण करून तिच्याशीं विवाह केला.

द्रौपदीस्वयंवराच्या वेळीं श्रीकृष्णाची पांडवांशीं गांठ पडली. तेव्हांपासून पांडवांच्या हितसंरक्षणासाठीं श्रीकृष्णानें आपलें जीवित वेंचलें. अज्ञातवास संपविल्यानंतर इंद्रप्रस्थ नगरीस येऊन पांडवांनीं राजसूय यज्ञ करण्याचें ठरविलें. राजसूय यज्ञाचा मार्ग निर्वेध करण्यासाठीं भीमानें जरासंधाचा वध केला. राजसूय यज्ञाच्या वेळीं पांडवांनीं श्रीकृष्णास अग्रपूजेचा मान दिला. ही गोष्ट श्रीकृष्णाविरोधी चेदि देशाचा राजा शिशुपाल याला आवडली नाहीं. तेव्हां श्रीकृष्णानें शिशुपालाचा वध केला. त्यानंतर कौरव–पांडवांतील वैमनस्य नाहींसें करण्यासाठीं श्रीकृष्णानें अतोनात परिश्रम घेतले. त्यानें पांडवांच्या वतीनें कौरवांकडे शिष्टाई करून भारतीय युद्ध टाळण्याचा प्रयत्न केला. तथापि तो निष्फळ ठरला. कौरव–पांडवांची सेना कुरुक्षेत्रावर युद्धासाठीं समोरासमोर सज्ज झाली. कौरवांच्या सेनेंतील आपल्या आप्तेष्ट मंडळींस पाहून अर्जुनाच्या मनांत वैराग्य बाणलें. त्यानें आपलें शस्त्र खालीं टाकलें. या वेळीं श्रीकृष्ण अर्जुनाचें सारथ्य करीत होता. त्यानें अर्जुनास उपदेश करून त्यास आपल्या कर्तव्यांची ओळख करून दिली. श्रीकृष्णाचा हा दिव्य उपदेश व्यास ऋषींनीं गीताग्रंथांत लिहून ठेवला आहे, श्रीकृष्णाचा उपदेश ऐकून अर्जुन लढण्यास तयार झाला. भारतीय युद्धास सुरुवात झाली. अठरा दिवसांच्या भयंकर रणकंदनानंतर पांडवांच्या गळयांत विजयश्रीची माळ घालून भारतीय युद्ध संपलें. त्यानंतर आपलेंहि कार्य संपलें असें पाहून श्रीकृष्ण तपाचरणासाठीं अरण्यांत निघून गेला. तेथें एका झाडाखालीं बसला असतांना त्यास हरीण समजून एका व्याधानें बाण मारला. त्यांतच श्रीकृष्णाचा अंत झाला.

भगवान् श्रीकृष्णांनीं गीताग्रंथांत जो उपदेश केला आहे तो अत्यंत बहुमोल आहे. गीताग्रंथांची रचना इ. स. पूर्वीं सुमारें ५०० वर्षांच्या

काळांत झाली. या ग्रंथांत एकंदर अठरा अध्याय असून ७०० श्लोक आहेत. त्यांत तत्कालीन धार्मिक कल्पनांचा सामाजिक स्थितीशीं समन्वय घडवून आणला आहे. यापूर्वी वैदिक धर्मांत यज्ञयागादि कर्म करण्यांतच जीविताची सफलता आहे असें मानलें जात असे. वेद, ब्राह्मणें, आरण्यकें या ग्रंथांत याच मार्गाची मीमांसा केली आहे. याला 'मीमांसामार्ग' असें म्हणतात. तथापि मीमांसामार्गानें परमेश्वराच्या स्वरूपाचें आकलन होणें शक्य नाहीं असें पाहून पुढें ब्रह्मज्ञानासंबंधींच्या चर्चेस सुरुवात झाली. या पंथास वेदान्त असें म्हणतात. या वेदान्तमार्गांत पुन्हां दोन पक्ष निर्माण झाले. त्यांपैकीं एक पक्ष केवळ ज्ञानास श्रेष्ठ मानूं लागला. त्यामुळें त्यानें संन्यास मार्गाचा पुरस्कार केला. तथापि दुसऱ्या पक्षांतील लोकांना हें मत पटलें नाहीं. 'ज्ञान प्राप्त झालें तरी कर्मे कधीं सुटत नाहींत; म्हणून माणसानें निष्कामबुद्धीनें कर्म करीत राहिलें पाहिजे,' असें ते प्रतिपादन करूं लागले. या वादांतूनच पुढें ज्ञानमार्ग, कर्ममार्ग व कर्मज्ञानसमुच्चयमार्ग यांचा उगम झाला.

ज्ञानमार्गानुसार परमेश्वराच्या स्वरूपाचें ज्ञान होण्यासाठीं मनाची जी तयारी करावी लागते, तिला 'योग' असें म्हणतात. यापासूनच पुढें अवताराची कल्पना निघून सगुण परमेश्वराची भक्ति करण्याचा पंथ निर्माण झाला. भागवत धर्माचें प्रारंभींचें स्वरूप हेंच होय. भागवत धर्मांत चातुर्वर्ण्य व्यवस्थेनुसार कर्में करण्यावर विशेष भर दिला आहे. तो पुढें कमी होऊन त्याऐवजीं तपश्चर्या, दान, सचोटी, अहिंसा व सत्यवचन हीं पांच अंगें लक्षांत घेऊन भक्तिपूर्वक कर्में करण्याचा मार्ग प्रचारांत आला.

भगवान् श्रीकृष्णांनीं या सर्व मतांच्या आधारें भक्तिपूर्वक निष्काम कर्म करण्याचा संदेश दिला. कम करीत असतांना फलाची आशा न बाळगतां कर्म यशस्वी करण्याच्या पद्धतीवर सर्व लक्ष केंद्रित करणें एवढाच व्यक्तीचा अधिकार आहे असें त्यांनीं प्रतिप दन केलें. फळाची आशा बाळगल्यास

माणसाच्या पदरीं निराशाच येण्याचा संभव असतो. त्यामुळें माणसानें मनाची एकाग्रता करून आत्मविश्वासपूर्वक व चिकाटीनें आपलें कार्य करीत राहावें हेंच योग्य आहे. अर्थात् हें कर्म ज्ञानपूर्वक केलें पाहिजे. 'बाबावाक्यं प्रमाणम्' या पद्धतीनें तें करतां कामा नये. हातीं घेतलेल्या कामांत प्राण ओतून तें आयुष्याच्या अंतापर्यंत सतत टिकविणें आपलें कर्तव्य आहे. भगवान् श्रीकृष्णांनीं भगवद्गीतेंत सांगितलेल्या धर्माचें स्वरूप असें आहे. श्रीकृष्णजयंतीच्या निमित्तानें गीतेचा हा संदेश आपण नीटपणें समजावून घेतला पाहिजे.

त्याचप्रमाणें श्रीकृष्णजन्मोत्सवाचा सोहळा साजरा करीत असतांना महाभारतकालीन आर्यांच्या स्थितीचेंहि ज्ञान दिलें पाहिंजे. रामायण काळा-प्रमाणेंच या काळांताहि चातुर्वर्ण्यव्यवस्था व आश्रमव्यवस्था चालू होती. शिष्य गुरुगृहीं जाऊन विद्याभ्यास करीत. क्वचित् प्रसंगीं श्रीमंत लोक आपल्या मुलांना शिक्षण देण्यासाठीं स्वतःच्या घरींच गुरूची योजना करीत. या-प्रमाणें द्रोण हे कौरवांना शिक्षण देण्यासाठीं त्यांजकडे राहिले होते. ज्ञानदान करणाऱ्या गुरूंना राजांकडून मदत मिळत असे. शूद्रांना मात्र विद्यार्जनाचा अधिकार नसे. या दृष्टीनें एकलव्याची कथा सांगणें उद्बोधक होईल. या काळांत स्त्रियांना वडिल माणसांकडून घरच्या घरींच शिक्षण मिळे. त्यांना नृत्य, गायन, वादन इत्यादि कलांचेंहि शिक्षण दिलें जाई. स्वयंवर-पद्धतीनें मुलींचे विवाह होत. एकाच स्त्रीनें एकाच कुटुंबांतील अनेक पुरुषांशीं विवाह करण्याचीहि या काळीं प्रथा होती असें द्रौपदीच्या उदा-हरणांवरून दिसून येतें. पुनर्विवाहाची चालहि या काळांत रूढ होती. उच्च वर्णीयांस कनिष्ठ वर्णांतील स्त्रियांशीं विवाह करता येत. अशा मिश्र विवाहापासून होणाऱ्या संततीच्या निरनिराळ्या जाती मानल्या जात. पंडु राजाची पत्नी माद्री ही पतिनिधनानंतर सती गेली होती. त्यावरून या काळांत सती जाण्याची प्रथा रूढ असावी असें दिसतें.

महाभारत काळांतील राजे आपल्या प्रजेचा सल्ला घेत. भारतीय युद्धास आरंभ करण्यापूर्वीं धर्मराजानें प्रजेचा सल्ला घेतला होता. राज्याचा कारभार सुव्यवस्थितपणें चालविण्यासाठीं सचिव, सेनापति, हेर, दुर्गाध्यक्ष, ज्योतिषी व वैद्य असे निरनिराळे अधिकारी नेमले जात. प्रजेकडून उत्पन्नाच्या व पशूच्या द्वारां कारभार वसूल केला जाई. निष्क या नांवाचें नाणें या काळीं प्रचलित होतें. ग्रामपंचायतीच्या मार्फत गांवांतील कारभार पाहिला जाई. व्यापार व उद्योगधंदे यांच्याकडे विशेष लक्ष दिलें जाई. शेतीस पाणीपुरवठा करण्यासाठीं कालवे व पाटबंधारे बांधण्याचाहि या काळीं प्रघात होता. शेतकऱ्यांस राजांकडून बी–बियाणें दिलें जाई. या काळांत शिल्पकलेंत बरीच प्रगति झाली असल्याचें दिसून येतें. मोठमोठ्या नगरांत सुंदर व कलापूर्ण इमारती आढळून येत. नगराचें संरक्षण करण्याठीं किल्ले, तट, खंदक इत्यादि गोष्टी बांधल्या जात. या काळीं लोकांची स्थिति सामान्यतः चांगली होती. लोक सुताचे, रेशमाचे व लोकरीचे कपडे वापरीत. तांदूळ, गहूं, ज्वारी, सातू, मांस व दूध इत्यादि पदार्थांनीं युक्त असा त्यांचा आहार असे. घरोघरीं गाईंचीं खिल्लारें असत. या लोकांना द्यूत खेळणें व मद्यपान करणें या गोष्टींचीं व्यसनें होतीं. ते लढाईंत फार तरबेज असत. धनुर्विद्या, गदायुद्ध, मल्लयुद्ध इत्यादि युद्धप्रकारांत ते निष्णात असत. श्रीकृष्णजयंतीच्या निमित्तानें या सर्व गोष्टींची आपण विद्यार्थ्यांना माहिती दिली पाहिजे. भगवान श्रीकृष्णांनीं केलेल्या गोसेवेचें महत्त्व पटवून दिलें पाहिज.

श्रीकृष्णजन्माष्टमीस श्रीकृष्णाच्या व विष्णूच्या देवळांत श्रीकृष्णजन्मोत्सव मोठ्या थाठानें साजरा करतात. सायंकाळीं दहीहंडीचा कार्यक्रम होतो. रात्रींच्या वेळीं भजनाची रेलचेल उडते. मध्यरात्रीं बाळकृष्णास पाळण्यांत घालून पाळणा म्हणतात. त्यानंतर कृष्णलीलेचे अनेक खेळ होतात. मथुरा, वृंदावन इत्यादि ठिकाणीं हा उत्सव फारच थाटानें साजरा केला

जातो. या दिवशीं भगवद्गीतेचें वाचन करणें योग्य होईल. त्याचप्रमाणें महाभारत या ग्रंथाची ओळख करून देऊन त्यांतील कांहीं भागाचें वाचन करणेंहि योग्य होईल.

## समवाय

१. श्रीकृष्णचरित्र कथन करा.

२. महाभारताची ओळख करून देऊन भारतीय युद्धाचीं कारणें सांगा.

३. सनदशीर राजकारणाचें महत्त्व पटवून द्या.

४. गोरक्षण व भारतांतील दूधदुभत्यांचा प्रश्न यासंबंधीं माहिती द्या.

५. महाभारतकालीन सामाजिक, धार्मिक व सांस्कृतिक स्थितींचीं ओळख करून द्या.

६. महाभारत व गीता अथवा गीताईचें वाचन करा.

७. रासनृत्यें–गर्बानृत्यें बसवा.

८. श्रीकृष्णचरित्रांतील प्रसंगांचें नाट्यीकरण करा.

९. पाळणा तयार करा.

१०. 'गौळणी' अथवा श्रीकृष्णासंबंधींचीं गाणीं शिकवा.

११. 'मानवतेचे पुजारी–भाग १', 'आशियाचे धर्मदीप' या पुस्तकांतील श्रीकृष्णाचीं चरित्रें वाचा.




श्रावण महिन्यांतील अमावास्येच्या दिवशीं शेतकरी लोक पोळ्याचा सण साजरा करतात. सातारा जिल्ह्यांत हा सण आषाढांतील मूळ नक्षत्रावर साजरा केला जातो; तर सोलापूर, पुणें, कर्नाटक इत्यादि भागांत तो भाद्रपद महिन्यांतील अमावास्येला साजरा केला जातो. यास बेंदूर असेंहि म्हणतात. पोळा हा बैलांच्या पूजेचा सण आहे. या दिवशीं पहाटेस उठून शेतकरी लोक आपल्या बैलांना तेलानें माखून न्हाऊं घालतात. त्यांच्या शिंगांना शेंदरी रंग लावून त्यावर बेगड चिकटवितात व अंगावर चित्र-विचित्र तऱ्हेची नक्षी काढतात. माथ्यावर बाशिंगें बांधतात. पायांत खुळ-खुळणारे वाळे घालतात व गळ्यांत घुंगुरमाळा घालतात. अशा प्रकारें बैलांना सजविल्यानंतर शेतकरी लोक त्यांची पूजा करतात. त्यांच्यावरून आरती ओवाळतात व त्यांना पुरणाचा नैवेद्य चारून घरोघरीं मिरवितात. नंतर गांवांतील सर्व बैलांची वाजतगाजत सामुदायिक मिरवणूक निघते.

या दिवशीं बैलांच्या शक्तीचें व चपलतेचें प्रदर्शन करण्यासाठीं निरनिराळे शर्यतीचें कार्यक्रमहि ठेवतात. शेतकऱ्याचीं लहान मुलें या दिवशीं मातीचे बैल तयार करून त्यांची पूजा करतात व त्यांना हातांत धरून धावण्याच्या शर्यती लावतात. वृषभोपासनेची ही प्रथा किती स्तुत्य आहे ?

शेतकरी लोकांचें सारेंच जीवन बैलांवर अवलंबून असतें. शेतांतील कामें उरकण्यास त्यांना बैलांचीच खरी मदत होते. त्यामुळें बैलांना दैवत मानून पोळ्याच्या दिवशीं त्यांची पूजा करणें योग्यच ठरतें. आपल्या भारतांत शेतीच्या कामीं अद्याप ट्रॅक्टर वगैरेसारख्या यांत्रिक साधनांचा फारसा उपयोग केला जात नाहीं. त्यामुळें शेतकऱ्यांच्या जीवनांतील बैलांचें स्थान अत्यंत महत्त्वाचें राहिलें आहे. शिवाय मालाची ने-आण करणें, खळ्यांतील कामें उरकणें इत्यादींसाठीं बैलांची फार आवश्यकता असते. बैलांपासून शेतकऱ्यांस खत मिळतें. त्यांच्या हाडांचा व कातड्याचाहि अन्य कामीं उपयोग करतां येतो. त्यामुळें प्राचीन काळापासून भारतांत बैलांचें विशेष महत्त्व मानलें गेलें आहे. आर्य लोक हे पशुपालन वृत्तीचे होते. त्यांचे सर्व व्यवहार गाईच्या माध्यमानें चालत. गाईस ते धन मानीत त्यामुळें अर्वाचीन काळीं पैसे मिळविण्यासाठीं जसे दरोडे पडतात त्याप्रमाणें पूर्वी गाई पळविल्या जात. गाई चोरल्यामुळें आर्य लोकांत अनेक चकमकी उडाल्याचे दाखले आपणांस प्राचीन ग्रंथांतून आढळून येतात. गाईपासून ज्याप्रमाणें आर्य लोकांना दूध मिळे त्याचप्रमाणें बैलांचा त्यांना शेतीच्या कामासाठीं उपयोग होई. त्यामुळें गाय व बैल यांना ते देव मानीत. मोहेन-जो-दरो येथील उत्खननांत बैलांचीं चित्रें सांपडलीं आहेत, त्यावरून बैलांची पूजा करण्याची प्रथा या देशांत प्राचीन काळापासून रूढ दिसते. शिवाचें वाहन नंदी हें आहे. त्यावरूनहि याच गोष्टीस दुजोरा मिळतो. भारतीय लोक बैलास पुरुषत्वाचें प्रतीक मानतात. त्यामुळें शक्तिशाली पुरुषास ‘ नरपुंगव ’ असें म्हणण्याची प्रथा पडली आहे.

बैलांचें माहात्म्य हें असें आहे. पोळयाच्या दिवशीं तें आपण विद्यार्थ्यांस पटवून दिलें पाहिजे.

त्याचप्रमाणें या दिवशा आपल्या देशांत आढळून येणाऱ्या बैलांच्या निरनिराळयां जातींची माहिती देणेंहि बरेंच उद्‌बोधक होईल. आपल्या देशांत सिंधी, कॉंक्रेजी, गीर, खिलारी, डांगी अशा बैलांच्या अनेक जाती दृष्टीस पडतात. सिंधी जातीचे बैल सिंध प्रांतांत आढळतात. हे बैल धुष्टपुष्ट असून कामास चांगले असतात. ते कोणत्याहि हवेंत टिकाव धरतात. पालनपूर संस्थानांतील कॉंक्रेज या गांवीं कॉंक्रेजी जातीचे बैल आढळतात. या जातीचे बैल अत्यंत चपळ असून वाहतुकीच्या कामासाठीं अत्यंत उपयुक्त असतात. गिरनार पर्वताच्या भागांत आढळणारे गीर जातीचे बैलहि धष्टपुष्ट व मजबूत असतात. धिम्मेपणानें काम शेवटास नेण्यासाठीं त्यांचा चांगला उपयोग होतो. काठेवाड व बडोदें इत्यादि भागांत याच जातीचे बैल वापरले जातात. महाराष्ट्रांत खिलारी बैलांची जात प्रसिद्ध आहे. सोलापूर, सातारा, कर्नाटक, खानदेश इत्यादि भागांत या बैलांचा उपयोग करतात. या जातीच्या बैलांच्या छातीचा घेर मोठा असून त्यांचे पाय आखूड पण मजबूत असतात. यांच्यांत ताकद अधिक असल्यामुळें शेतीचें कामें करण्यास त्यांचा फार उपयोग होतो. याशिवाय अहमदनगर, नाशिक, ठाणें इत्यादि जिल्ह्यांत डांगी जातीचे बैल आढळतात. शेतीच्या कामास व वाहतुकीस हे बैल चांगले असतात. बैलांच्या या निरनिराळया जातींची योग्य ती माहिती देऊन त्यांची निगा राखण्यासंबंधीं आपण कोणती काळजी घ्यावयास पाहिजे, या गोष्टीचें ज्ञान पोळयाच्या सणाच्या निमित्तानें दिलें जाणें आवश्यक आहे. भारत हा कृषिप्रधान देश असल्यामुळें येथें बैलांचें माहात्म्य पटवून देणें अत्यंत आवश्यक आहे.

## समवाय

१. शेतकऱ्यांच्या जीवनासंबंधीं माहिती द्या.

२. बैलांच्या निरनिराळ्या जातींची माहिती द्या व त्यांचे उपयोग सांगा.

३. पशूंची निगा राखण्यासंबंधीं कोणती काळजी घेणें आवश्यक आहे तें सांगा. पशूंच्या रोगांचें ज्ञान करून द्या.

४. पोळ्याच्या सणाविषयीं वर्णनपर निबंध लिहून घ्या.

५. कवि के. नारखेडे यांची ' पोळा ' ही कविता शिकवा.

---



# गणेश चतुर्थी

भाद्रपद शु. ४ पासून तों शु. १४ पर्यंत ठिकठिकाणीं गणेशोत्सव साजरा केला जात असल्याचें आपण पाहतों. भाद्रपद शु. ४ ला 'गणेश चतुर्थी' असें म्हणतात. या दिवशीं घरोघर गणपतीच्या मूर्तीची विधिपूर्वक स्थापना करतात व त्यास दूर्वा, तुळशीपत्र, फुलें इत्यादि वाहून मोदकाचा नैवेद्य दाखवितात. याप्रमाणें भाद्रपद शु. १४ पर्यंत म्हणजे अनंत चतुर्दशीपर्यंत गणेशाची पूजाअर्चा होते. अनंत चतुर्दशीस गणपतीची मूर्ति वाजत गाजत गांवाबाहेर नेतात व नदींत अथवा एखाद्या जलाशयांत तिचें विसर्जन करतात. महाराष्ट्रांत गणेशोत्सव विशेष उत्साहानें साजरा केला जातो. या दिवसांत ठिकठिकाणीं सार्वजानिक गणपतींची स्थापना केली जाते. या प्रथेस लो. टिळकांनीं सुरुवात केली. जनतेंत राजकीय जागृति घडवून आणण्यासाठीं त्यांनीं या उत्सवाचा विशेष उपयोग करून घेतला. गणेशोत्सवाच्या दिवसांत गणपतीची मूर्ति तयार करणें, मूर्तीभोंवतीं मखर तयार करणें, निरनिराळीं चित्रें, रांगोळ्या

व देखावे काढून आरास करणें, रंगाचे गालिचे काढणें इत्यादि कलात्मक गोष्टींस बहर येतो. त्याचप्रमाणें या दिवसांत सार्वजनिक ठिकाणीं व्याख्या-नांच्या रूपानें ज्ञानसाधना होते. निरनिराळया करमणुकीच्या प्रकारांनीं जनमनरंजन होतें व लोकांना एकत्र येऊन कामें करण्याची संधि मिळते.

गणेशोत्सवास भाद्रपद शु. ४ स आरंभ होतो. कारण गणपतीचा जन्म या दिवशीं झाला असें मानलें जातें. आपण संकटपरिहार होण्या-साठीं चतुर्थीचें व्रत पाळतों. गणपति ही विघ्ननिवारक देवता असल्या-मुळें तिची पूजा प्रत्येक चतुर्थीस करण्याचा प्रघात आहे. प्रत्येक महिन्यांतील शु. चतुर्थीस 'विनायकी चतुर्थी' व कृष्ण पक्षांतील चतुर्थीस 'संकष्टी चतुर्थी' म्हणतात. संकष्टी चतुर्थी मंगळवारीं आल्यास तिला 'अंगारकी चतुर्थी' म्हणतात. भाद्रपद शु. ४ स महासिद्धि विनायकी चतुर्थी असें म्हणतात. या सर्व चतुर्थींच्या दिवशीं लोक गणपतीची पूजा करतात.

गणपतीच्या जन्मासंबंधीं पुराणांत निरनिराळया कथा आढळतात. एकदां शंकराची पत्नी पार्वती ही स्नान करण्यासाठीं स्नानगृहांत गेली असतांना शंकरानें तेथें प्रवेश करूं नये म्हणून तिनें आपल्या मळा-पासून एक मूर्ति तयार केली व तिला स्नानगृहाच्या दरवाजावर पहारा करण्यासाठीं ठेवलें. इकडे पार्वती स्नान करूं लागली तेव्हां शंकर तेथें आले. पार्वतीस भेटण्यासाठीं शंकर स्नानगृहांत प्रवेश करणार तोंच पार्वतीपुत्र द्वाररक्षकानें त्यांना हटकलें. तें पाहून शंकर कोपा-यमान झाले व त्यांनीं एका क्षणांत त्या मूर्तीचें शिर धडावेगळें केलें. इतक्यांत पार्वती आपलें स्नान आटोपून स्नानगृहाबाहेर आली. तिनें घडलेला सर्व प्रकार पाहिल्यानंतर शंकरास त्या मूर्तीच्या जन्माचा वृत्तान्त निवेदन केला. तो ऐकून शंकरास वाईट वाटलें व त्यानें आपल्या गणांतील लोकांस जो प्रथम भेटेल त्याचें शिर कापून आणण्याची आज्ञा

केली. शिवगणांतील लोकांच्या दृष्टीस प्रथम एक मृत हत्ती दिसला. त्यांनीं शंकराच्या आज्ञेप्रमाणें त्याचें शिर कापून आणलें. भगवान् शंकरानें तें शिर त्या पार्वतीपुत्राच्या धडास चिकटवून त्याला जिवंत केलें. यासंबंधीं कांहीं ठिकाणीं असाहि उल्लेख सांपडतो कीं, तारकासुराच्या सैन्यांतील गजासुर फार उन्मत्त झाला होता. त्यानें शंकराचा कमंडलु लाथाडून त्याचा अंपमान केला. तेव्हां आपला कमंडलु या द्वाररक्षकानेंच लाथाडला अशी समजूत करून घेऊन शंकरानें त्याचा शिरछेद केला. परंतु थोड्याच वेळांत त्यास खरा प्रकार समजला व त्यानें गजासुराचा संहार करून त्याचें शिर द्वाररक्षकाच्या धडास जोडलें व त्यास सजीव करून त्याजकडे गणांचें आधिपत्य दिलें. त्यामुळें त्यास 'गणपति' असें नांव प्राप्त झालें.

गणपतीच्या उत्पत्तीसंबंधीं काका कालेलकरांचें मत याहून बरेंच भिन्न आहे. त्यांच्या मतें गणपति ही देवता मंगळ या ग्रहापासून बनलेली असावी असें आहे. आपण चंद्र, सूर्य इत्यादींना देवता मानतों. त्याचप्रमाणें प्राचीन काळीं मंगळ ही देखील देवता मानली गेली असली पाहिजे व गणपति हें त्याच देवतेचें रूप असावें असें त्यांचें म्हणणें आहे. कारण गणपतीचा संबंध मंगळाशीं अनेक रीतीनें जोडतां येतो. मंगळ हा ग्रह रंगानें लाल आहे. त्याचप्रमाणें गणपतीस देखील लाल रंगाचीं फुलें आवडतात. गणपतीला ' मंगलमूर्ति ' असेंहि म्हणतात. त्यांत मंगळ या ग्रहाचा स्पष्ट उल्लेख दिसतो. शिवाय गणपतीच्या उपासनेसाठीं महत्त्वपूर्ण मानली गेलेली अंगारकी चतुर्थी यांतील अंगारक या शब्दाचा अर्थ मंगळ असाच होतो. त्यावरून गणपति ही देवता मंगळावरून निश्चित झाली असावी असें ते मानतात. ज्योतिषशास्त्रांत मंगळ हा अत्यंत तापदायक ग्रह मानला जातो. तसाच गणपतीहि पूर्वीं ' विघ्नकर्ता ' असावा व नंतर भक्तांनीं त्याची आराधना करून त्यास ' विघ्नहर्ता ' बनविलें असावें, असें त्यांचें म्हणणें आहे. आजहि आपण प्रत्येक कामाची सुरुवात करण्यापूर्वीं विघ्नहर्त्या

गणपतीची स्थापना करून त्याची पूजा करतों. गणपति ही गुणाची देवता असून तिचें खरें नांव गुणेश आहे असेंहि मानलें जाते. त्याचप्रमाणें गणपति हा सत्त्व, रज व तम या त्रिगुणांचा अधिपति ठरतों. गणपतीस विनायक असेंहि म्हणतात. 'विनायक' या शब्दाचा अर्थ मार्गदर्शन करणारा असा होतो. त्यावरून गणपति ही विद्येची देवता मानली गेली आहे. विद्यार्जनास आरंभ करतांना 'श्रीगणेशा' चा पहिला महामंत्र गिरवावा लागतो तो यामुळेंच.

गणेशचतुर्थीच्या दिवशीं चंद्रदर्शन करणें निषिद्ध मानलें जातें. या दिवशीं चंद्रदर्शन झाल्यास माणसावर खोटे आळ येतात असा समज प्रचलित आहे. यासंबंधींची कथा अशी आहे कीं, एकदां गणपति आपल्या उंदरावर स्वार होऊन भाद्रपद शु. ४ च्या दिवशीं रस्त्यानें चालला असतां त्यास चंद्रानें पाहिलें. गणपतीच्या मानवी देहास तें हत्तीचें विचित्र तोंड पाहून चंद्रास मोठी मौज वाटली. इतक्यांत गजाननाची स्वारी तोल न सावरतां आल्यामुळें आपल्या वाहनावरून खालीं पडली. तें पाहून चंद्रास हसूं आलें. चंद्राचा तो उद्धटपणा लक्षांत येतांच गणपति त्याजवर रागावला. त्यामुळें संतप्त गणपतीनें 'या दिवशीं जे लोक तुझें दर्शन घेतील त्यांच्यावर खोटे आळ येतील' असा त्यास शाप दिला. गणपतीचा शाप ऐकून चंद्र कष्टी झाला. त्यानें गणपतीची आराधना केली. तेव्हां गणपति संतुष्ट झाला व 'वद्य चतुर्थीच्या दिवशीं तुझें दर्शन घेतल्याशिवाय लोक अन्नग्रहण करणार नाहींत' असा त्यानें चंद्रास उःशाप दिला. तथापि हा कथाभाग बराच प्रतीकात्मक दिसतो. गणपतीचें वाहन उंदीर हा कालस्वरूप आहे. उंदीर ज्याप्रमाणें निरनिराळया वस्तू कुरतडून कणाकणानें त्यांचा नाश करतो त्याप्रमाणें काळहि सृष्टीवरील वस्तुमात्रांचा क्षणाक्षणानें नाश करीत असतो. अशा काळास देखील आपला सेवक बनविणारा गणपति हा स्वाभाविकपणेंच गणाचा श्रेष्ठ अधि-

पति मानला पाहिजे. गणपति हा त्रिगुणांचा अधिपति आहे. या त्रिगुणाबरोबरच योगांत तुर्यावस्थेचा उल्लेख केला आहे. ही चतुर्थ अवस्था असल्याकारणानें स्वाभाविकपणेंच चतुर्थीस महत्त्व आलें आहे. त्यामुळें चतुर्थीच्या दिवशीं चन्द्रदर्शन निषिद्ध मानणें योग्य ठरतें. कारण चंद्र ही मनाची देवता आहे व तुर्यावस्थेंत तर मनाचें निरोधन करणें आवश्यक असतें. वरील प्रतीकात्मक कथेचा आपणास अशा प्रकारें अर्थ लावता येतो.

महाभारतांत गणपतीसंबंधानें एक मजेदार कथा आहे. व्यास महर्षींनीं महाभारताची रचना केली. परन्तु तें लिहून ठेवण्यासाठीं त्यांना योग्य असा लेखक मिळेना. तेव्हां ब्रह्मदेवानें त्यांना गणपतीकडे जाण्यास सांगितलें. गणपति त्या वेळीं त्रिविष्टप म्हणजे तिबेट येथें राहात होते. व्यासांच्या विनंतीवरून त्यांनीं महाभारतलेखनाचें काम करण्याचें कबूल केलें. तथापि आपण लेखन करीत असतांना मध्यें खंड पडणार नसेल तरच आपण लेखन करण्यास तयार आहोंत अशी त्यांनीं अट घातली. तेव्हां व्यासांनींहि 'प्रत्येक श्लोकाचा अर्थ समजल्याशिवाय तो लिहावयाचा नाहीं' अशी गणपतीला अट घातली. दोघांनींहि एकमेकांच्या अटी मान्य केल्या. व्यास अवघड श्लोक रचूं लागले. त्यांचा अर्थ समजावून घेण्यासाठीं गणपतीस वेळ लागे. त्या मुदतींत व्यास पुन्हां दुसरा श्लोक रचीत. याप्रमाणें महाभारताचें लेखन झालें. या कथेवरून लिहिण्याची कला आपल्या देशांत तिबेटकडून आली असावी असें मानलें जातें.

गणपतीस शूद्र देवता मानण्याचा प्रघात आहे. शंकर हा ब्राह्मण, विष्णु हा क्षत्रिय, ब्रह्मदेव हा वैश्य, तर गणपति हा शूद्र आहे असें मानलें जातें. देवादिकांत देखील ही चातुर्वर्ण्यव्यवस्था कां मानली गेली हें समजत नाहीं. तथापि प्राचीन काळीं गणपति ही अनार्यांची ॐ स्वरूपी देवता होती असें समजतात. ॐकारांत हत्तीच्या सोंडेचा आकार असल्यामुळें गजाननाशीं त्याचें साधर्म्य जुळतें. त्यामुळें

गणपति ही शूद्र देवता मानली गेली असावी. तें कसेंहि असो. तथापि या गोष्टीपासून एक बोध निश्चित घेतां येण्यासारखा आहे. तो हा कीं, शूद्रानें कर्तबगारी दाखविल्यास त्यास श्रेष्ठ प्रतीचें स्थान निश्चित प्राप्त होतें.

गणपतीच्या उपासकांचा 'गाणपत्य' या नांवाचा एक वेगळा पंथ आहे. सुमारें अडीचशें वर्षांपूर्वीं पुण्याजवळील चिंचवड येथें 'श्रीमोरया' या नांवाचा एक साधु होऊन गेला. त्यानें गणपतिभक्तीचा प्रसार केला. त्यामुळेंच गणपतीस 'मंगलमूर्ति मोरया' या नांवानें संबोधिलें जातें. सर्व वर्णांतील लोक गणपतीची भक्ति सारख्याच आवडीनें करतात.

गणेशोत्सवाच्या निमित्तानें या सर्व गोष्टींची आपण माहिती करून घेतली पाहिजे. त्याचप्रमाणें गणेशचतुर्थीस शाडूची मूर्ति तयार करून तिची अनंत चतुर्दशीपर्यंत अथवा ५ किंवा ७ दिवस विधिपूर्वक पूजाअर्चा केली पाहिजे. गणपति ही विद्येची देवता असल्यामुळें प्रत्येक शाळेंत हा उत्सव साजरा करणें अगत्याचें आहे. या उत्सवप्रसंगीं चित्रकला, हस्तव्यवसाय, गायन, वादन, नाट्य, वक्तृत्व व लेखन इत्यादींच्या चढाओढी ठेवून ज्ञानसंवर्धनाच्या दृष्टीनें बरेंच विधायक कार्य करणें शक्य आहे. तथापि असें करतांना गणेशोत्सवास केवळ मनोरंजनाचें स्वरूप दिलें जाणार नाहीं अथवा त्यांत कांहीं बीभत्स प्रकार घडणार नाहींत याबद्दल काळजी घेणेंहि आपलें कर्तव्य आहे.

### समवाय

१. आर्य व अनार्यांच्या देवतांची ओळख करून द्या.

२. प्राचीन काळीं प्रचलित असलेल्या गणराज्यांची माहिती द्या.

३. गणपतीबद्दलच्या कथा सांगा.

४. गणपतींच्या क्षेत्रांसंबंधीं व गाणपत्य सांप्रदायासंबंधीं माहिती द्या.

५. विद्येची उपासना करण्यासाठीं चित्रकला, हस्तव्यवसाय, गायन, वादन, नाट्य, वक्तृत्व, लेखन इत्यादींच्या चढाओढी लावा.

६. लेखनकलेचा इतिहास सांगा.

७. गणपतीची मूर्ति तयार करून घ्या.




**भाद्रपद** महिन्यांत गणपतीच्या उत्सवाबरोबरच महालक्ष्मीचाहि उत्सव साजरा केला जातो. या उत्सवांत स्त्रिया उत्साहानें भाग घेतात. भाद्रपद शुक्लपक्षांतील अनुराधा नक्षत्रावर महालक्ष्म्या येतात; ज्येष्ठा नक्षत्रावर त्यांची पूजा होते व मूळ नक्षत्रावर त्यांचें विसर्जन करतात. पुराणांतरीं महालक्ष्मीसंबंधीं कथा आहे ती अशी : प्राचीन काळीं कोलासुर नांवाचा दैत्य स्त्रियांना फार त्रास देत असे. तेव्हां कोलासुराच्या त्रासापासून आपली मुक्तता करून घेण्यासाठीं सर्व स्त्रिया एकत्र जमल्या व त्यांनीं ब्रह्मा, विष्णु व महेश यांची प्रार्थना करून त्यांना कोलासुराचा नाश करण्याबद्दल विनंती केली. त्रिमूर्तींनीं भगवान् विष्णूची पत्नी महालक्ष्मी हिजकडे कोलासुराचा नाश करण्याची कामगिरी सोंपविली. त्याप्रमाणें महालक्ष्मीनें कोलासुराचा नाश करून लोकांस संकटमुक्त केलें. महालक्ष्मीनें केलेल्या या उपकाराचें स्मरण करण्याकरितां हा उत्सव साजरा केला जातो. गणपतीच्या स्थापनेबरोबरच कांहीं ठिकाणीं गौरीचीहि स्थापना केली जाते. त्यामुळें

महालक्ष्मी व गौरी या दोघांच्या पूजेचा एकच उत्सव मानला जातो. महालक्ष्मीच्या उत्सवास भाद्रपद शु. ८ च्या दिवशीं सुरुवात होते. या दिवसाला दुर्वाष्टमी असें म्हणतात. दुर्वाष्टमीच्या दिवशीं दुर्वांची पूजा करण्याचा प्रघात आहे. त्यामुळें दुर्वांच्या विस्ताराप्रमाणें वंशविस्तार होतो असें मानलें जातें. अखंड सौभाग्य प्राप्त करून घेण्यासाठीं सुवासिनी महालक्ष्मीचा उत्सव साजरा करतात.

गौरीचा उत्सव साजरा करण्याचें स्थलपरत्वें भिन्न भिन्न प्रकार आहेत. या उत्सवप्रसंगीं कोणी खड्यावर तर कोणी मडक्यावर गौरीचा मुखवटा बसवून त्याची पूजा करतात. कोंकण प्रांतांतील कोळी लोक हा उत्सव विशेष आनंदांत साजरा करतात. या वेळीं त्यांच्यांत नाच-गाण्याची रेलचेल उडते. त्यांत स्त्रियांबरोबर पुरुषहि भाग घेतात. कोळी लोकांचे थवेच्या थवे रस्त्यारस्त्यांतून 'गौरी गणपती येऊन गेले' अशा प्रकारचीं गाणीं गात नाचत असतात. गौरीजवळ धनधान्यसमृद्धि व दीर्घायुष्य मागणें हाच या सणाचा हेतु असतो.

लक्ष्मी ही समृद्धिदेवता आहे. तिनें कोलासुराचा नाश करून पृथ्वीवर समृद्धि नांदविली. कोलासुर म्हणजे रानडुक्कर. रानडुक्करांपासून शेतीस फार उपद्रव होतो. शेतांत आलेल्या पिकांची नासधूस करून ते शेतकऱ्यांच्या जीवनावर मोठाच घाला आणतात. कोलासुरानें स्त्रियांना त्रास देण्यास सुरुवात केली म्हणजे शेतीस त्रास देण्यास सुरुवात केली असें मानणें योग्य होईल. महालक्ष्मीच्या उत्सवाच्या निमित्तानें आपण मुलांना शेतीस उपद्रव देणाऱ्या प्राण्यांची व कृमिकीटकांची माहिती दिली पाहिजे व त्यांचा नाश करण्यासाठीं कोणते उपाय योजावेत तें सांगितलें पाहिजे. त्याचप्रमाणें उद्योगधंद्यांत येणाऱ्या अनेक असुरी अडथळ्यांची मुलांना जाणिव देऊन करून हे समृद्धिविघातक अडथळे कसे नाहींसे करतां

येतील त सांगितलें पाहिजे. देशांत कारखान्यांची वाढ झाली कीं जनता समृद्ध होईल असें समजणें चुकीचें आहे. कारण कारखान्यांच्या वाढीबरोबरच भांडवलदारीची भरभराट होईल व त्यामुळें सामान्य जनतेस समृद्धि प्राप्त होणें कठीण जाईल. शेती, ग्रामोद्योग व कारखानदारी यांच्या समतोलपणावरच देशांत समृद्धि नांदूं लागेल ही गोष्ट आपण पटविली पाहिजे.

## समवाय

१. महालक्ष्मीची कथा सांगा.
२. शेतीस उपद्रव देणाऱ्या प्राण्यांची व कृमिकीटकांची माहिती देऊन त्यांचा नायनाट करण्याचे उपाय सांगा.
३. स्वतंत्र भारत समृद्ध होण्यासाठीं कोणत्या गोष्टींची आवश्यकता आहे या गोष्टीची चर्चा करा.
४. "गौरी" गीतें शिकवा.




**आश्विन** महिन्यांत हस्त नक्षत्रास सुरुवात होते. या दिवसापासून सोळा दिवसपर्यंत मुली हादग्याचा सण साजार करतात. याला हस्तगा, अथवा हादगा असेंहि म्हणतात. हादगा हा मुलींचा विशेष आवडता सण आहे. या दिवसांत मुलीं घरोघरीं जमिनीवर अथवा पाटावर रांगोळयांनीं अथवा धान्यांनीं हत्ती काढतात. हस्त नक्षत्र हें हाताच्या पंजासारखें दिसतें व त्यांत हत्तीच्या सोंडेसारखा मुसळधार पाऊस पडतो म्हणून हस्त नक्षत्राचें प्रतीक असें हत्तीचें चित्र काढणें युक्त ठरतें. शिवाय हत्ती हें नक्षत्राचें वाहन मानलें जातें. या हत्तीच्या अंगावर मुली रंगीबेरंगी फुलांच्या माळांची अथवा रांगोळयांच्या ठिपक्यांची झूल काढून त्याला सजवितात. त्याच्या भोंवतीं एकत्र जमून हादग्याचीं अथवा भुलोबाचीं गाणीं गाऊन फेर धरतात. हीं गाणीं म्हणजे स्त्रीगीतांचा उत्कृष्ट नमुना आहे. पहिल्या दिवशीं एक, दुसऱ्या दिवशीं दोन याप्रमाणें दरराज ही गाण्यांची संख्या सारखी

वाढत जाते. शेवटच्या दिवशीं सोळा गाणीं गाईलीं जातात. हीं गाणीं दिवसेंदिवस जसजशीं वाढूं लागतात, तसतसा अधिकाअधिक वेळ लागत जातो. त्यामुळें पुढें पुढें मुली एकेकीच्या घरींच पाळीपाळीनें एकत्र जमून फेर धरून गाणीं गातात. गाणीं संपल्यानंतर खिरापत वाटण्याचा विधि होतो. खिरापत वाटण्यापूर्वीं मुली ती ओळखण्याचा प्रयत्न करतात. त्या वेळीं त्यांचीं होणारीं प्रश्नोत्तरें मोठीं मनोरंजक असतात. खिरापतीचा पदार्थ दररोज वेगवेगळा असतो. शेवटच्या दिवशीं या सर्व पदार्थांचें मिश्रण करून त्याची खिरापत वाटतात.

या सणाच्या द्वारें हस्त नक्षत्राचा गौरव केला जातो. मागें पंचांगाचा अभ्यास करीत असतांना सूर्य प्रत्येक नक्षत्रांत १५ दिवस राहतो हें आपण पाहिलें आहे आश्विन महिन्यांत सूर्यानें हस्त नक्षत्रांत प्रवेश केल्यानतर हा सण पुढें १५ दिवस साजरा करावयाचा असतो. हस्त नक्षत्रानंतरहि पावसाळा समाप्त होतो. आपण पावसाचीं मृग, आर्द्रा (ज्येष्ठ); पुनर्वसु पुष्य (आषाढ); आश्लेषा, मघा (श्रावण); पूर्वा, उत्तरा (भाद्रपद) व हस्त, चित्रा (आश्विन) अशीं दहा नक्षत्रें मानतों. त्यांतील हस्त हें *नववें नक्षत्र होय. त्यानंतर चित्रा* हें पावसाळी नक्षत्र असलें तरी हस्त नक्षत्रांतच पावसाची खरी परिसमाप्ति होते. त्यामुळें पावसाळयांतील शेवटच्या हस्त नक्षत्राचा गौरव करून मुली हादग्याच्या सणाच्या निमित्तानें पावसाळयाचा निरोप घेतात.

हादग्याच्या सणाच्या दिवसांत आपण मुलांना पावसाळी नक्षत्रांची माहिती करून देणें उचित ठरेल. पावसाळी नक्षत्रांच्या निरीक्षणावरून शेतकऱ्यांनीं बांधलेल्या कामांच्या आडाख्यांचीहि या वेळीं आपण त्यांना योग्य ती कल्पना करून दिली पाहिजे. पावसाळी नक्षत्रांची माहिती पुढील तक्त्यांत दिली आहे. तिचा या कामीं आपणांस नीट उपयोग करून घेतां येईल.

| महिना | नक्षत्र | वाहन | परिणाम | कामें |
|---|---|---|---|---|
| (१) ज्येष्ठ | मृग | घोडा | पर्वतावर वृष्टि होते. जमीन चांगली भिजून वाफसा होतो. | पेरणी. |
| | आर्द्रा | कोल्हा | पाऊस कमी पडतो. | पेरणी. |
| (२) आषाढ | पुनर्वसु | मंडूक (बेडूक) | पाऊस बराच पडतो. याला 'तरणा' पाऊस असें म्हणतात. | दोर वळणें, घराची दुरुस्ती करणें व बैठीं कामें करणें. |
| | पुष्य | मेंढा | पाऊस कमी पडतो. याला 'म्हातारा' पाऊस म्हणतात. | ” |
| (३) श्रावण | आश्लेषा | मोर | पाऊस कमी. क्षणांत पावसाची सर येते तर क्षणांत ऊन पडतें. | खुरपणी. |
| | मघा | मूषक (उंदीर) | वळीव पाऊस. | ” |
| (४) भाद्रपद | पूर्वा | महिष (रेडा) | आभाळ भरून येतें व अतिवृष्टि होते. | ” |
| | उत्तरा | गर्दभ (गाढव) | पाऊस बेताचा. सुरंवट पिकाचीं पानें खातात. | उडीद-मुगाची कापणी. |
| (५) आश्विन | हस्त | हत्ती | मुसळधार पाऊस त्यामुळें जमिनींत ओलावा. रब्बीच्या पिकांस उपयुक्त. | गहूं, हरबरा, शाळू वगैरेंचीं पेरणी |
| | चित्रा | | पाऊस सहसा पडत नाहीं | वेचणीं, कापणी इत्यादि सुगीचीं कामें करणें. |

हादग्याचा सण साजरा करण्याच्या पद्धतींत ठिकठिकाणीं किंचित् फरक आढळून येतो. महाराष्ट्रांत हा सण सोळा दिवस साजरा करून सोळा गाणीं गातात व दोन हत्ती काढतात. कर्नाटकांत पाटावर एकच हत्ती काढण्याची प्रथा असून त्याभोंवतीं भोंडल्याचीं ९ गाणीं म्हणण्याचा प्रघात आहे. उत्तरेकडील प्रदेशांत भाद्रपद पौर्णिमेपासून तों कोजागिरी पौर्णिमे-पर्यंत शंकर पार्वती ( भुलाबाई ) व गणपति यांच्या मूर्तींची स्थापना करून भुलाबाईचीं गाणीं म्हणतात.

## समवाय

१. हादगा, भुलाबाई व भोंडला यांचीं गाणीं शिकवा.
२. शेतांत सहल काढून शेतकऱ्यांच्या कामाचें प्रत्यक्ष निरीक्षण करून माहिती मिळवा.
३. पावसाळी नक्षत्रांची माहिती द्या.
४. स्त्रीगीतें संकलित करण्याचा प्रयत्न करा.
५. कमलाबाई देशपांडे यांचें ‘अपौरुषेय वाङ्मय’ हें पुस्तक वाचा.
६. बाळकृष्णाविरचित हादग्याचीं नवीन गाणीं वाचा.



# दसरा

**आश्विन** शु. प्रतिपदेपासून नवरात्राचा प्रारंभ होतो. या दिवसापासून शु. नवमीपर्यंत महिषासुरमर्दिनी अष्टभुजा शक्तिदेवीचा उत्सव साजरा करतात. शक्तिदेवीच्या जन्माची कथा अशी आहे : प्राचीन काळीं स्वर्गात महिषासुर या नांवाचा राक्षस फार उन्मत्त झाला होता. सर्व वस्तुमात्रांवर आपली सत्ता चालावी यासाठीं त्यानें इंद्राच्या राज्यकारभाराचीं सर्व सूत्रें आपल्या हातीं घेतलीं. त्यामुळें सृष्टीवर भयंकर अनर्थ ओढवला. तें पाहून देव भयभीत झाले व त्यांनीं महिषासुराच्या जाचांतून मुक्तता करण्यासाठीं ब्रह्मा, विष्णु व महेश यांना विनंती केली. देवांनीं कथन केलेल्या महिषासुराच्या कृष्णकृत्यांची हकीगत ऐकून ब्रह्मा, विष्णु व महेश अत्यंत क्रुद्ध झाले. त्यांनीं आपल्या शक्तीच्या अंशापासून एक देवी निर्माण केली व तिला आयुधांनीं सज्ज करून महिषासुराचा नाश करण्यासाठीं पाठविलें. शक्तिदेवीनें महिषासुराशीं घनघोर युद्ध आरंभिलें. आश्विन शु. प्रतिपदे-

पासून तों शु. ९ पर्यंत हें युद्ध चाललें होतें. अखेरीस शक्तिदेवीनें महिषासुरास ठार मारून सृष्टीला त्याच्या जाचांतून मुक्त केलें. त्यामुळें शक्तिदेवीस महिषासुरमर्दिनी असें म्हणतात व नवरात्रांत तिचा उत्सव मोठ्या थाटानें साजरा करतात.

दुष्टांचा नाश करून सज्जनांचें संरक्षण करण्यासाठीं परमेश्वर नानारूपें धारण करतो असें आपण मानतों. त्यांपैकीं परमेश्वराच्या शक्तिस्वरूपानें स्त्रीचा अवतार धारण केला आहे. या अवताराचें निरनिराळया रूपांत पूजन केलें जातें. ब्रह्मा, विष्णु व महेश यापासून अनुक्रमें महासरस्वति, महालक्ष्मी व महाकाली या देवी उत्पन्न झाल्या. याखेरीज शक्तिदेवीचीं मुख्य नऊ रूपें प्रसिद्ध आहेत. चैत्रांतील गौरी, अन्नपूर्णा, भाद्रपदांतील गौरी, हरतालिका, श्रावणांतील मंगलागौरी, अश्विनांतील ललिता या सौम्य देवता व दुर्गा, काली, चंडी इत्यादि रौद्र देवता हीं सर्व शक्तिदेवीचीं विविध रूपें होत. प्रत्येक महिन्यांतील शुक्ल पक्षांतील अष्टमीस शक्तिदेवीची पूजा करण्याचा प्रघात आहे. या दिवसाला ‘ दुर्गाअष्टमी ’ असें म्हणतात. याशिवाय मंगळवार व शुक्रवार हे देवीच्या उपासनेचे वार मानले जातात. या दिवशीं देवीची उपासना करणें अगत्याचें आहे. या उपासनेपासून आपण बोध घेण्यासारखा आहे. आजपर्यंत आपण स्त्री ही अबला असून संरक्षणास पात्र आहे असें मानीत आलों आहोंत. शक्तिदेवीच्या उपासनेनें ही कल्पना नष्ट होऊन स्त्रियांमधील सुप्त शक्तीची मनांत जाणीव निर्माण होईल व त्याप्रमाणें स्त्रियांस बलवान् बनविण्याचे प्रयत्न करतां येतील. मानवी मनांतील महिषासुरस्वरूप दुष्ट विचारांचें निर्दालन करण्यासाठीं स्त्रियांच्या अंगच्या नैतिक बलाची फार आवश्यकता आहे.

नवरात्राचा उत्सव साजरा करण्याची वेगवेगळया प्रांतांत वेगवेगळी प्रथा आहे. या दिवसांत घटस्थापना करतात. पांच घट एकावर एक असे ठेवून

त्यांत ५ खारका, ५ खडे, ५ खोबऱ्याचे तुकडे इत्यादि पदार्थ ठेवतात व त्यांभोंवतीं धान्य पेरून घटांची पूजा करतात. कांहीं ठिकाणीं जमीन मातीनें सारवून तीवर पाण्यानें भरलेला एक घट ठेवतात. या घटांत सुपारी, दक्षिणा, पंचरत्नें (सोनें, मोतीं, प्रवाळ, हिरा व पाच किंवा माणिक ) घालतात. त्याच्या तोंडावर आंब्याचीं पानें ठेवून त्यावर नारळ बसवितात व त्यास रोज एक एक याप्रमाणें वाढत्या संख्येनें माळा घालतात. या घटाच्या भोंवतीं नऊ प्रकारचीं धान्यें पेरतात. घटस्थापनेनंतर नंदादीप सतत तेवत ठेवावयाचा असतो. याप्रमाणें नऊ दिवस घटाची पूजा केल्यानंतर घटाभोंवतीं पेरलेल्या नऊ प्रकारच्या धान्यांचीं रोपें देवीबरोबर विसर्जन करतात. त्यांतील कांहीं रोपें देवीचा प्रसाद म्हणून स्त्रिया आपल्या केसांत घालतात. कांहीं ठिकाणीं पुरुष देखील हीं रोपें आपल्या शिरोभूषणांत घालून मिरवितात.

गुजराथ व काठेवाड या प्रांतांत नवरात्राच्या दिवसांत भिंतीवर दुर्गादेवीचें प्रतीक असलेला शेंदराचा त्रिशूळ काढतात. या त्रिशूळाखालीं मातीचा ढीग तयार करून त्यावर गहूं, बाजरी इत्यादि धान्यें पेरतात. या ढिगाच्या मध्यभागीं घटस्थापना करून त्यावर नारळ ठेवतात व त्याची पूजा करतात. या घटासमोरच एक मातीचा घट असतो. त्यास एक भोंक पाडलेलें असतें. त्यांत नंदादीप सतत तेवत असतो. रात्रींच्या वेळीं गुजराथी स्त्रिया या घटाभोंवतीं फेर धरून गर्बानृत्य करतात व गाणीं गातात. गुजराथी स्त्रियांचीं हीं गर्बानृत्यें पाहण्यासारखीं असतात. महाराष्ट्रांतील स्त्रिया देखील शक्तिदेवीसमोर गाणीं गातात. अलीकडे महाराष्ट्रांतील कांहीं ठिकाणीं गुजराथेंतील गर्बानृत्याची चाल रूढ होत चालली आहे.

बंगाल प्रांतांत तर दुर्गादेवीच्या सणाला राष्ट्रीय महत्त्व प्राप्त झालें आहे. आपणाकडे दिवाळीचा सण आपण ज्या उत्साहानें साजरा करतों त्याच उत्साहानें बंगाली लोक नवरात्रांत दुर्गादेवीचा उत्सव साजरा करतात. या

दिवसांत ते नवे संकल्प करतात. देवीच्या समोर गायन, वादन, नृत्य, नाट्य इत्यादि अनेक प्रकारचे करमणुकीचे कार्यक्रम होतात. बंगाल प्रांतांत शक्तिदेवीसमोर बळी देण्याची प्रथा आहे. ही प्रथा अनिष्ट आहे. आपल्या महाराष्ट्रांत देखील ठिकठिकाणीं देवीसमोर बकरीं, कोंबडीं इत्यादींचे बळी देण्याची प्रथा आहे. ही घातुक रूढि नष्ट करण्याचा आपण कसोशीनें प्रयत्न केला पाहिजे. दुर्गादेवीचा अवतार हा क्षात्रधर्मास उचित असा असल्याकारणानें स्वाभाविकपणेंच क्षत्रिय लोक या उत्सवांत अधिक उत्साहानें भाग घेतात. इ. स. च्या ५ ते १२ व्या शतकाच्या काल-खंडांत बंगाल प्रांतांतील पाल व सेन या राजपुत राजांनीं तेथें कालीदेवीच्या उपासनेची प्रथा रूढ केली. त्याचप्रमाणें दाक्षिणेंत देखील बाराव्या शतकांत चालुक्य राजांनीं ही प्रथा रूढ केली आहे. हीच प्रथा पुढें मराठे लोकांनीं भवानी देवीच्या उपासनेच्या रूपानें चालूं ठेवली आहे.

नवरात्र संपलें कीं दसरा उजाडतो. आश्विन शु. १० चा हा दिवस. या दिवसाला विजयादशमी असें म्हणतात. विजयादशमीच्या दिवशीं दसऱ्याचा सण साजरा करतात. या दिवशीं गांवशिवेचें उल्लंघन करून तेथून आपट्याचीं व शमीचीं पानें सोनें म्हणून लुटण्याचा प्रघात आहे. यासंबंधींची पुराणांतरीं अशी कथा आहे : प्राचीन काळीं कौत्स नांवाचा एक ब्राह्मण कुमार वरतंतु नांवाच्या ऋषीकडे विद्यार्जनासाठीं गेला. त्यानें वरतंतु ऋषी कडून यथाकाल चौदा विद्या संपादन केल्या. अध्ययन संपल्यानंतर त्यानें गुरूजवळ 'गुरुदक्षिणा' स्वीकारण्याचा आग्रह धरला. तेव्हां वरतंतु ऋषीनें त्याला १४ विद्यांच्या अध्यापनाबद्दल १४ कोटी मोहरा गुरुदक्षिणा आणून देण्यास सांगितलें. कौत्सासारख्या ब्राह्मणाजवळ १४ कोटी मोहरा कोठून असणार ? तथापि त्यानें आपल्या गुरूस दक्षिणा आणून देण्याचें वचन दिलें व तो १४ कोटी मोहरा मागण्यासाठीं रघुराजाकडे गेला. या वेळीं रघुराजानें विश्वजित् यज्ञ नुकताच संपविला होता. यज्ञप्रसंगीं त्यानें

सढळ हातानें दान करून आपलें सर्व द्रव्यभांडार लुटाविलें होतें. त्याच्या जवळ कौत्साला देण्यासाठीं १४ कोटी मोहरा नव्हत्या. तथापि दारीं आलेल्या ब्राह्मणास दान केल्यावांचून परत पाठविणें लांछनास्पद आहे असें समजून त्यानें कौत्साकडून तीन दिवसांची मुदत मागून घेतली व मोहरा मिळविण्याकरितां तो इंद्रावर स्वारी करण्यासाठीं निघाला. ही गोष्ट इंद्रास समजतांच अयोध्यानगराबाहेरील शमीच्या व आपट्याच्या झाडावर मोहरांचा पाऊस पाडण्याबद्दल कुबेरास आज्ञा दिली. कुबेरानें मोहरांचा पाऊस पाडला. तें पाहून रघुराजानें इंद्रावर स्वारी करण्याचा बेत रहित केला. त्यानें कौत्साला त्या सर्व मोहरा दान केल्या. कौत्सानें त्या सर्व मोहरा आपल्या गुरूस अर्पण केल्या. तथापि वरतंतु ऋषींनीं त्यांपैकीं अवघ्या १४ कोटी मोहराच तेवढ्या घेतल्या. आतां उरलेल्या मोहरांचें काय करावें ही कौत्सापुढें प्रश्न पडला. त्यानें त्या मोहरा रघुराजास परत घेण्याचा आग्रह केला. तथापि रघुराजाहि त्यांचा स्वीकार करीना! त्यामुळें अखेरीस कौत्सानें अयोध्या नगरींतील लोकांकडून त्या मोहरा लुटविल्या. याच मोहरांचें प्रतीक म्हणून दसऱ्याच्या दिवशीं आपण सीमोल्लंघन करून आपट्याचीं व शमीचीं पानें लुटतों व तीं एकमेकास सोनें म्हणून देतों. दसऱ्याच्या दिवशीं मनांतील प्रेमभावना जागी होऊन वैरभाव नष्ट होतो. अर्थ हा सर्व अनर्थांचें मूळ आहे. त्या अर्थास आपण उदार अंतःकरणानें दुसऱ्यास अर्पण करून त्याचें हृदय जोडतों. सुवर्णसंपत्तीपेक्षां अंतःकरणाची श्रीमंती ही अधिक मोलाची आहे, असा विचार या वेळीं मनांत आल्याशिवाय राहात नाहीं.

दसऱ्याच्या दिवशीं शमीच्या झाडाची व शस्त्रास्त्रांची पूजा करण्याची प्रथा आहे. त्यासंबंधींची कथा अशी कीं, पांडवांनीं वनवासास जातेवेळीं आपलीं शस्त्रें एका शमीच्या ढोलींत ठेवलीं होतीं. अज्ञातवास संपल्यानंतर विजयादशमी दिवशीं त्यांनीं तीं ढोलीबाहेर काढलीं व त्यांची पूजाअर्चा

करून तीं धारण केलीं. तेव्हांपासून दसऱ्याच्या दिवशीं शमीची व शस्त्रास्त्रांची पूजा करण्याची प्रथा रूढ झाली असें मानतात.

याच दिवशीं प्रभु रामचंद्र रावणावर स्वारी करण्यासाठीं निघाले. या स्वारींत ते विजयी झाल्यामुळें स्वाभाविकपणेंच या दिवसाला विजयादशमी असें नांव प्राप्त झालें आहे. तेव्हांपासून विजयादशमीचा दिवस हा अत्यंत शुभ मानला गेला आहे. पूर्वीं या दिवशीं क्षत्रिय लोक आपले अश्व, हत्ती, रथ, शस्त्रास्त्रें इत्यादींची पूजा करून परमुलखावर स्वारी करण्यासाठीं निघत असत. राजपूत व मराठे लोकांनीं विजयादशमीच्या मुहूर्तावर अनेक स्वाऱ्यांना सुरुवात केली आहे. या स्वाऱ्यांचा अवशिष्ट भाग अलीकडे आपणांस कांहीं संस्थानांतून मिरवणुकीच्या रूपानें दिसून येतो. म्हैसूर व बडोदें या संस्थानांतील दसऱ्याच्या स्वाऱ्या फार प्रेक्षणीय असतात.

क्षत्रियांप्रमाणेंच इतर वर्णांतील लोक देखील या दिवशीं आपआपल्या हत्यारांची व उपजीविकेच्या साधनांची पूजा करतात. दसऱ्याच्या दिवसापर्यंत शेतांतील पिकें तयार झालेलीं असतात. त्यामुळें शेतकऱ्यांचा उत्साह अपूर्व असतो. या दिवशीं ते आपल्या दारावर नवीन कणसांच्या माळा बांधतात व मुंडाशांत धान्याचे लोंगर खोवून मिरवितात. या वेळीं शेतकरी लोक आपल्या बैलगाड्यांत बसून सीमोल्लंघन करतात.

विजयादशमीचा दिवस हा सीमोल्लंघनास सर्वथा अनुकूल असाच आहे. पावसाळयाचा काळ संपल्यामुळें या दिवसांत नद्यांचें पाणी मर्यादित होतें व स्वस्थान सोडून सीमोल्लंघन करण्यास अडचण येत नाहीं. प्राचीन काळीं विजयादशमीच्या दिवशीं स्वारीवर निघण्याची प्रथा पडली तीहि या अनुकूलतेमुळेंच. त्या काळीं लढाईवर जाणारे सारेच लोक धंदेवाईक सैनिक नसत. त्यांपैकीं बहुतांश लोक शेतीचा धंदा करीत. विजयादशमीच्या सुमारास शेतीचीं कामें आटोक्यांत आलीं कीं, ते शेती सोडून

मुलुखगिरींवर जात. अशा प्रकारें मुलुखगिरी करून मिळवून आणलेलें द्रव्य ते आपल्या साथीदारांकडून लुटवीत.

विजयादशमीचा सण अनेक परींनें महत्त्वाचा आहे. या दिवशीं जुने विचार टाकून नवे व हितकारक विचार ग्रहण केले पाहिजेत. हें झालें वैचारिक सीमोल्लंघन. त्याचप्रमाणें अनेक दुष्ट सामाजिक रूढींचें सीमोल्लंघन करून योग्य त्या गोष्टींचें आचरण करण्यासहि हा दिवस अत्यंत योग्य आहे. या दिवशीं जातिभेद, धर्मभेद, पंथभेद इत्यादींच्या सीमांचें उल्लंघन करणें तर अत्यंत आवश्यक आहे. आपल्या देशास लागलेली ही नाना-प्रकारच्या भेदांची कीड आपण सीमोल्लंघनाच्या दिवशीं मारून टाकली पाहिजे व परस्परांत सलोखा, प्रेमभाव व बंधुभाव निर्माण केला पाहिजे. याशिवाय दसऱ्याच्या सणास एक विशिष्ट प्रकारचें सामाजिक महत्त्व आहे. या दिवशीं आपण केवळ आप्तस्वकीयांच्याच नव्हे तर नव्यानें ओळख झालेल्या व अनोळखी माणसांच्याहि भेटी घेतों. त्यामुळें समाजांत प्रेमभाव निर्माण होतो व त्यास सुसंघटितता प्राप्त होते. या गोष्टीवर आपण विशेष भर दिला पाहिजे.

## समवाय

१. नवरात्राच्या उत्सवाची प्रथा कशी पडली तें सांगा.

२. नवरात्राच्या निमित्तानें आपण कोणतें कार्य केलें पाहिजे, तें सांगा.

३. शेतकऱ्यांच्या व सैनिकांच्या जीवनासंबंधीं माहिती द्या.

४. शारदीय ज्ञानसत्र सुरू करा.

५. आर्यांच्या महत्त्वाच्या स्वाऱ्यांची माहिती द्या.

६. शस्त्रांस्त्रांची माहिती द्या.

७. दसऱ्याचा सामुदायिक समारंभ घडवून आणा व त्याचें सामाजिक महत्त्व लक्षांत आणून द्या.




दीपावलीचा सण आश्विन वद्य १३ पासून तों कार्तिक शु. २ पर्यंत साजरा करतात. या सणांत धनत्रयोदशी, नरकचतुर्दशी, लक्ष्मीपूजन, बलिप्रतिपदा व यमद्वितीया अथवा भाऊबीज इत्यादि सणांचा अन्तर्भाव होतो. याशिवाय दिवाळीस आरंभ होण्यापूर्वी 'वसुबारस' साजरी करतात.

## वसुबारस

वसुबारसेच्या दिवशीं घरोघर सवत्स धेनूची पूजा होते. प्राचीन काळापासून हिंदु लोक गाईस पवित्र मानीत आले आहेत. गाईच्या ठिकाणीं ३३ कोटी देवांचा वास असतो असें ते मानतात. गाय हा अत्यंत उपयुक्त प्राणी असल्यामुळें स्वाभाविकपणेंच त्याची पूजा करण्याची प्रथा हिंदु लोकांत पडली आहे. हिंदु लोक गाईस अघ्न्या म्हणजे कधींहि ठार मारूं नये असा प्राणी मानतात. आणि तेंहि योग्यच आहे. कारण गाईस पुरविलेल्या १००

रत्तल चाऱ्याच्या मोबदल्यांत ती आपणांस १३९ रत्तल दूध व १८ रत्तल घनद्रव्यें देते. मग अशा गाईची हत्या करणें हें पाप आहे असें कां बरें मानूं नये? गाईची थोरवी ओळखूनच हिंदुस्थानांतील दिलीप व श्रीकृष्ण यांसारख्या थोर विभूतींनीं तिची अनन्यभावें सेवा केली आहे. श्रीकृष्णानें तर स्वतःस 'गोपाल' असें लाडकें नांव धारण केलें आहे. त्यामुळें हिंदु लोक गोरक्षण करणें हें पुण्यकर्म मानतात. 'गोदान' हें श्रेष्ठ प्रकारचें दान समजलें जातें. 'ज्याचे घरीं गाय। तेथें विठ्ठलाचे पाय' असा संत-शिरोमणी तुकाराम महाराजांनींहि निर्वाळा दिला आहे.अशा स्थितींत वसु-बारसेच्या दिवशीं सवत्स धेनूची पूजा करणें किती अगत्याचें आहे हें आपणांस कळून येईल.



तथापि अशा प्रकारें वर्षांतून फक्त एक दिवस गाईची पूजा करून बाकीच्या काळांत आपण तिची काळजी वाहिली नाहीं तर तें सर्वस्वीं अयोग्य होईल ही गोष्ट आपण या वेळीं ध्यानांत घेतली पाहिजे. गोपूजेचा नुसता देखावा करून भाविकता पदरीं बांधल्यानें कांहीं खरी गोसेवा घडत नाहीं. त्यासाठीं आपण सदा सर्वकाळ गाईची योग्य निगा राखली पाहिजे. या गोष्टींत आपणांपैकीं कितीसे लोक प्रामाणिकपणानें लक्ष घालतात? आपल्या-कडील गाई रानावनांतून व शहरांतील गल्ल्याबोळांतून मोकळेपणानें

हिंडत असतात. त्यांच्या निर्वाहांची सोय करण्याइतकी तत्परता देखील आपण बाळगत नाहीं. पावसाळ्यांतील चार महिन्यांत रानांतील हिरवा चारा मिळाला कीं, या गाई थोड्या धष्टपुष्ट बनतात. परंतु शेतींतील पिकें उलगलीं, रानांतील गवत वाळून नाहींसें झालें व प्रखर उन्हानें सगळीकडे वैराण झालें कीं, मग गाईंच्या दुर्दशेकडे पाहवत नाहीं. त्यांना खाण्यासाठीं पुरेसा चारा मिळत नाहीं. निवाऱ्यासाठीं योग्य अशी जागा मिळत नाहीं. एवढेंच नव्हे तर व्यायलेल्या गाईंची देखील नीटपणें काळजी घेतली जात नाहीं. शेतकऱ्यांचें आपल्या बैलांकडे अथवा म्हशींकडे जितकें लक्ष असतें तितकें गाईकडे मुळींच असत नाहीं. याचा परिणाम स्वाभाविकपणेंच असा होतो कीं, चाऱ्याच्या अभावीं गाई रोडावतात व अखेरीस मृत्युमुखीं पडतात अथवा त्यांची रवानगी खाटिकखान्यांत होते. त्यामुळें आपल्या देशाची किती हानि होते ही गोष्ट आपण अवश्य लक्षांत घेतली पाहिजे. पूर्वीं प्रत्ये-काच्या घरीं गाई योग्य प्रकारें सांभाळल्या जात. त्यामुळें सर्व कुटुंबियांस दूध मिळे. आज हें दूध दुर्मिळ झालें आहे. दुधाच्या अभावीं आपल्या शरीरप्रकृतीवरहि अनिष्ट परिणाम होत आहे. ज्या देशांत पूर्वीं दुधा-तुपाचे पाट वाहात त्याच आपल्या भारत देशांतील लक्षावधी लोकांच्या नजरेस आज दुधाचा थेंब पडत नाहीं. मग तुपाची गोष्ट तर दूरच आहे!

आपल्या देशांत गुरांची संख्या फार मोठी आहे. जगांतील ५४ कोटी गुरांपैकीं १८ कोटी गुरें आपल्या हिंदुस्थानांत आहेत. त्यामुळें चाऱ्याचा तुटवडा पडतो ही गोष्ट खरी आहे. ईजिप्त देशांत दर १०० एकर जमिनीस २५ गुरें असें प्रमाण पडतें. तर तेंच प्रमाण हॉलंडमध्यें ३८ व हिंदुस्थानांत ६७ असें पडतें. इतक्या गुरांना पोसण्यासाठीं आपल्या देशांत पुरेसा चारा नाहीं. तो आपण अधिक मिळविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. तसा प्रयत्न आपणांस यशस्वी करतां आला तर खरोखरच आपल्या देशाचें भाग्य उजाडेल असें म्हणावयास हरकत नाहीं. आज

या गाईपैकीं शें. ७० गाई भाकड असतात व बाकीच्या गाई-देखील दररोज सरासरीनें ५ रत्तल दूध देण्याऐवजीं अवघ्या १॥ रत्तल दूध देतात! अशा परिस्थितींत आपला निभाव कसा लागणार? अमेरिकेंत दररोज दरमाणशीं १ शेर दूध मिळतें. स्वित्झर्लंडांत हें प्रमाण ¾ शेर व इंग्लंडमध्यें ¼ शेर आहे. तथापि हिंदुस्थानांत तर पावशेर दूध मिळण्याची देखील पंचाईत पडते! मग वसुबारसेच्या दिवशीं भाविकपणें गोपूजा करून आपण काय साधतों हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे.

दुर्दैवानें या प्रश्नाकडे आपल्या देशांतील लोकांचें जावें तितकें लक्ष गेलेलें नाहीं. इतर देशांत गाईची निगा किती उत्तम प्रकारें ठेवली जाते! त्यांना राहण्यासाठीं सुंदर गोठे असतात. त्यांना स्वच्छ धुण्याची सोय असते. भरपूर चारा मिळतो. एवढेंच नव्हें तर दूध देतांना त्यांचें मन प्रसन्न राहावें यासाठीं अमेरिकेसारख्या देशांत धार काढतांना सुश्राव्य संगीत चालूं ठेवण्याबद्दलहि दक्षता घेतली जाते. त्यामुळें तेथील गाइ भरपूर दूध देतात. जर्मनींतील २॥ कोटी गाईपासून जितकें दूध मिळतें तितकें दूध आपल्या देशांतील १८ कोटी गाई देतात! दुग्धव्यवसायाकडे तर आपलें फारसें लक्षच नाहीं. हॉलंड व डेन्मार्क यासारखे देश दुग्ध-व्यवसायावर आपली उपजीविका करतात. पाश्चिमात्य देशांत दुग्ध-व्यवसाय शास्त्रीय पद्धतीनें केला जातो. अलीकडे आपल्या देशांत आनंद व गोरेगांव या ठिकाणीं अशीं आदर्श दुग्धालयें काढलीं जात आहेत एवढीच काय ती समाधानाची गोष्ट मानली पाहिजे.

तसें पाहिलें तर आपल्याकडील गाई कमी दूध देणाऱ्या आहेत असेंहि नाहीं. मध्यम बांध्याची, रुंद पठाडीची व तांबड्या रंगाची सिंधी गाय वर्षाकाठीं ५००० शेरांपर्यंत दूध देते. या जातींच्या कांहीं गाई प्रयोगा-दाखल अमेरिकेंत नेल्या होत्या. तेथील हवेंतहि त्या योग्य प्रकारें टिकल्या.

त्यामुळें आतां या जातींच्या गाईंची पैदास करण्याबाबत अमेरिका विचार करीत आहे. इकडे आढळून येणाऱ्या कॉंक्रेजी जातीच्या गाईहि भरदार, उंच व मजबूत हाडापेराच्या असतात. त्या वर्षाकांठीं ८०० ते १००० शेरांपर्यंत दूध देतात. भारदस्त बांध्याच्या, कपाळ किंचित् मागें कलतें असलेल्या, मजबूत शरीराच्या व झोपाळु डोळयाच्या गीर जातीच्या गाई तर वर्षाकांठीं १५०० ते २५०० शेरांपर्यंत दूध देतात. याशिवाय कृष्णाकांठच्या धिप्पाड बांध्याच्या, आखुड शिंगांच्या व लहान पायांच्या गाईहि वर्षाकांठीं १००० ते १५०० शेर दूध देतात. या गाईंची योग्य प्रकारें निगा ठेवल्यास हें दुधाचें प्रमाण किती तरी वाढविता येण्यासारखें आहे. आपल्या देशांत जाफराबादी, सुरती, मुऱ्हा, दिल्ली या जातींच्या म्हशीहि दुधाकारितां प्रसिद्ध आहेत.

या उपयुक्त जनावरांची आपण योग्य प्रकारें काळजी घेतली पाहिजे. त्यांना खाण्यासाठीं कडबा, ओला चारा व गवत इत्यादींचा व खुराकासाठीं दाणे, पेंड, भुसा, चुणी इत्यादींचा योग्य पुरवठा केला पाहिजे. त्यांना राहण्यासाठीं स्वच्छ, हवेशीर जमिनींचे व वर छप्पर असलेले गोठे तयार केले पाहिजेत. चारा इतस्ततः पसरून नुकसान होऊं नये म्हणून गव्हाणी तयार केल्या पाहिजेत. मलमूत्र वाहून जाण्यासाठीं पाठीमागें लहानशीं गटारें बांधलीं पाहिजेत. याशिवाय आजारी जनावरांची व वासरांची वेगळी सोय केली पाहिजे. सर्व गुरांना रोज नियमितपणें स्वच्छ धुतलें पाहिजे. त्यांना व्यायाम दिला पाहिजे; प्रमाणशीर चारा घातला पाहिजे. अशा प्रकारें जनावरांची निगा राखली तर 'वसुबारस' साजरी केल्याचा उपयोग आहे. वसुबारसेच्या निमित्तानें या सर्व गोष्टींची आपण योग्य ती जाणीव करून घेतली पाहिजे व त्याप्रमाणें आचरण करण्याचा संकल्प केला पाहिजे.

## धनत्रयोदशी

वसुबारसेनंतर धनत्रयोदशीचा दिवस उजाडतो. या दिवशीं धनाची-सोनें रुपें इत्यादींची–विधिपूर्वक पूजा करतात. धनत्रयोदशीची कथा अशी आहे : एकदा यमराजांनीं आपल्या दूतांस प्रश्न केला, " कायरे, मृत्युलोकांतून लोकांचे प्राण हिरावून आणतांना तुम्हाला आजपर्यंत कधीं वाईट वाटेल असा प्रसंग घडला आहे काय ?" त्यावर यमाचे दूत हात जोडून उत्तरते झाले, "महाराज, मृत्युलोकांतील हैम राजाच्या मुलाचे प्राण हिरावून आणतांना आम्हांस परम खेद झाला. या मुलाच्या विवाहप्रसंगाचा सोहळा किती उत्साहानें साजरा केला जात होता. सगळीकडे आनंदी आनंद पसरला होता. तथापि विवाहानंतर अवघ्या चौथ्या दिवशींच त्याचे प्राण हरण करण्याची आमच्यावर पाळी आली. कर्म आमचें ! महाराज, पुन्हा असा अपमृत्यूचा प्रसंग कोणावर येऊं नये असें करावें एवढीच आपल्या चरणीं विनंती आहे." आपल्या दूतांचे ते बोल ऐकून यमराज गंभीर झाले. ते म्हणाले, "ठीक आहे. आजपासून पांच दिवसपर्यंत जो दीपोत्सव करील त्यावर असा अपमृत्यूचा प्रसंग येणार नाहीं." तेव्हांपासून धनत्रयोदशीच्या दिवशीं व त्यानंतर यमद्वितीयेपर्यंत दीपोत्सव साजरा करण्याची प्रथा पडली आहे धनत्रयोदशीच्या दिवशीं यमाला दीपदान करतात. या दिवशीं दिव्यांचीं तोंडें दक्षिणेकडे ठेवण्याचाहि कांहीं ठिकाणीं प्रघात आहे. कारण यमाचें निवासस्थान दक्षिणेकडे आहे असें आपण मानतों.

तथापि केवळ दीपोत्सव साजरा करून अपमृत्यु टाळता येणें कितपत शक्य आहे हेंहि आपण जाणतों. अपमृत्यूसारखी खेदजनक गोष्ट नाहीं. प्रत्यक्ष मृत्यूच्या देवाचें अंतःकरण देखील अपमृत्यूचा वृत्तान्त ऐकून हलून गेलें, यावरून अपमृत्यु ही किती भयानक गोष्ट आहे हें आपण लक्षांत घेतलें पाहिजे व त्याचीं कारणें नाहींशीं करून तीं टाळण्याचा कसोशीनें प्रयत्न केला पाहिजे. 'शरदः शतम् जीवेत ।' या आशीर्वादाप्रमाणें

आयुष्यांतील कर्तव्य पार पाडल्यानंतर त्याचा शेवट मृत्युरूपी मधुर विश्रांतींत होण्यांत औचित्य आहे. या दृष्टीनें आपण आपल्या देशांतील आयुर्मर्यादेचा व अपमृत्यूच्या प्रमाणाचा विचार करणें सयुक्तिक होईल. दुर्दैवानें आपल्या देशांतील आयुर्मर्यादा अत्यंत कमी आहे. जगांतील इतर देशांतील लोकांच्या आयुर्मर्यादेचें प्रमाण पुढें दिलें आहे तें पाहिलें कीं, या भयानक स्थितीची आपणास तात्काळ जाणीव होईलः—न्यूझीलंड ६७, स्वीडन ६३, इंग्लंड ६२, अमेरिका ६२, फ्रान्स ५७, रशिया ४५, जपान ४३, ईजिप्त ३३ व हिंदुस्थान २७. आपल्या देशांत बालमृत्यूचें प्रमाणहि अधिक आहे. या बाबतींत सर्व जगांत आपल्या देशाचा क्रम दुसरा लागतो. ही गोष्ट किती शोचनीय आहे ! धनत्रयोदशीच्या दिवशीं या गोष्टीचा आपण अवश्य विचार केला पाहिजे.

आपल्या देशांतील या दुरवस्थेचीं अनेक कारणें आहेत. एके काळीं सोन्याचा धूर निघत असलेल्या आपल्या मातृभूमींत आतां अठराविश्वें दारिद्र्य नांदत आहे. लोकांना खायला पुरेसें धान्य मिळत नाहीं; ल्यायला पुरेसा कपडा मिळत नाहीं. देशांतील जनता अज्ञानाच्या खोल गर्तेत पिचत पडली आहे. तिला आरोग्याचे नियम माहीत नाहींत. आहारविहाराचें महत्त्व कळत नाहीं. सांसर्गिक रोगांपासून बचाव करण्याचें ज्ञान नाहीं. अपत्यसंगोपनाची योग्य ती जाणीव नाहीं. या सर्व गोष्टींमुळें येथील अपमृत्यूचें प्रमाण वाढलें आहे. या गोष्टीचा आपण नीटपणें विचार केला पाहिजे व देशांतील अडाणी मातांची योग्य प्रकारें काळजी घेऊन त्यांना बालसंगोपनाचें ज्ञान दिलें पाहिजे. त्याचप्रमाणें समाजाला सुशिक्षित करून त्यांत अपमृत्यु टाळण्याची जाणीव उत्पन्न करून दिली पाहिजे. खेडोपाडीं दवाखाने व सूतिकागृहें काढून हें प्रमाण बरेंच कमी करतां येण्यासारखें आहे. सुदैवानें आपला देश आज परदास्यशृंखला तोडून स्वतंत्र झाला आहे. आतां या सुधारणा घडवून आणण्यास सर्वस्वीं

अनुकूल अशी संधी प्राप्त झाली आहे. तिचा आपण योग्य तो उपयोग करून घेतला पाहिजे. जगांतील आरोग्यमंडळाचें या प्रश्नाकडे हल्लीं बरेंच लक्ष वेधलें आहे ही गोष्ट खरी. तथापि स्थानिक सहाय्याशिवाय सुधारणा घडवून आणणें अशक्य आहे ही गोष्ट देखील आपण सतत ध्यानांत बाळगली पाहिजे. याप्रमाणें धनत्रयोदशीच्या दिवशीं नुसत्या धनाची पूजा न करतां देशांतील मानवसंपत्तीची पूजा करणें व तिचा विकास करण्याचा संकल्प करणें अधिक उचित ठरेल.

## नरकचतुर्दशी

धनत्रयोदशीनंतरचा दिवस नरकचतुर्दशीचा असतो. या दिवसाची कथा अशी आहे: प्राचीन काळीं भूतान प्रांताच्या दक्षिणेकडे प्राग्ज्योतिष नांवाचा एक प्रांत होता. तेथें नरकासुर नांवाचा राजा राज्य करीत असे. नरकासुर अत्यंत दुष्ट व क्रूर होता. आसपासच्या अनेक राजांना त्यानें 'त्राही भगवान्' करून सोडलें होतें. स्त्रियांना तर तो प्रत्यक्ष काळच वाटे. स्त्रियांवर जुलूम करून त्यांना पीडा देण्यांत नरकासुराला असुरी आनंद होई. त्याच्या कैदेंत एकंदर सोळा हजार स्त्रिया होत्या. स्त्रियांची ही दुर्दशा पाहून श्रीकृष्णास त्वेष चढला. त्यानें नरकासुराचा नाश करण्याचा निर्धार केला. तथापि श्रीकृष्णाची पत्नी सत्यभामा हिनें नरकासुरनाशाची कामगिरी आपल्या शिरावर घेतली. त्यामुळें श्रीकृष्ण तिला फक्त साहाय्य करूं लागला. सत्यभामा रथांत बसून नरकासुराचा नाश करण्यासाठीं निघाली. आश्विन वद्य १४ च्या दिवशीं तिनें नरकासुराचा नाश केला व त्याच्या बंदिशाळेंतील स्त्रियांना मुक्त केलें. या स्त्रियांनीं आपआपल्या घरीं जाऊन पवित्र धूप-दीप जाळून व रांगोळया काढून आनंदोत्सव साजरा केला. तेव्हांपासून नरकचतुर्दशीच्या दिवशीं उत्सव साजरा करण्याची प्रथा पडली आहे.

नरकचतुर्दशीच्या कथेपासून आपणांस बराच बोध घेतां येण्यासारखा आहे. नरकासुर म्हणजे मूर्तिमंत नरक–घाण! त्यापासून कोणालाहि पीडाच होणार. ही पीडा आपण दूर केली पाहिजे. नरकचतुर्दशीच्या दिवशीं स्त्रिया आपल्या घरांना रंग लावतात व घर–अंगण झाडून स्वच्छ करतात. याप्रमाणें घरांतील नरकासुराचा त्या नाश करतात. तथापि अशा प्रकारें नरकासुराचा नाश केवळ एका दिवसापुरता करून चालणार नाहीं. नरकासुराचें–घाणीचें–साम्राज्य सुरू झालें कीं, रोगराई पसरते व साथीचे रोग फैलावत जाऊन असंख्य माणसें मृत्युमुखीं पडतात. याकरितां आपल्या घरांतील व गांवांतील नरकासुराचा दररोज नाश केला पाहिजे. त्यास गांवांत प्रवेश मिळूं देतां कामा नये. जीवनशिक्षण पद्धतींत सफाईचें यामुळेंच विशेष महत्त्व मानलें आहे. नरकचतुर्दशीच्या दिवशीं शाळेंतील मुलांनीं व गांवांतील लोकांनीं एकत्र जमून सामुदायिक सफाईचा कार्यक्रम केला पाहिजे. सफाईचें महत्त्व लोकांना पटवून दिलें पाहिजे. त्याचप्रमाणें वर्षभर आपली शाळा अथवा गांव स्वच्छ ठेवण्यासाठीं काय काय केलें पाहिजे याची योजना तयार केली पाहिजे. गांवांतील सांडपाण्याच्या मोऱ्या, गुरांचे गोठे, खताचे ढीग, प्रातर्विधींची जागा इत्यादींचीं ठिकाणें नियुक्त करून त्याव्यतिरिक्त अन्य ठिकाणीं घाण आढळून येणार नाहीं याबद्दल योग्य ती खबरदारी घेतली पाहिजे. त्याचप्रमाणें घाणीच्या ठिकाणीं देखील अधूनमधून जंतुनाशक द्रव्यें टाकलीं पाहिजेत. असें केल्यानेंच खरोखर नरकचतुर्दशी साजरी केल्याचें चीज होईल.

## लक्ष्मीपूजन

नरकचतुर्दशीनंतरचे दोन दिवस दिवाळीच्या सणांतील मुख्य दिवस मानतात. यांपैकीं आश्विन अमावास्येस घरोघर लक्ष्मीपूजन होतें. या दिवशीं बळीच्या बंदिवासांतून लक्ष्मीची सुटका झाली म्हणून व्यापारी लोक आपल्या

जमाखर्चाच्या वह्या, दुकानांतील माल व गल्ला यांची–लक्ष्मीची–पूजा करतात. या प्रसंगीं इष्टमित्रांस आमंत्रण करून ते त्यांचें स्वागत करतात व थाटमाट करतात. या दोन दिवसांत सर्व गांवांत प्रज्वलित पणत्यांच्या प्रकाशमान पंक्तींची शोभा मोठी अपूर्व दिसते. अलीकडे शहरांत विजेची सोय झाल्यामुळें या दिवसांत विजेच्या दिव्यांची रोषणाई करतात. तथापि विजेच्या दिव्यांच्या झगमगाटांत मंदपणें व संथपणें तेवत असणाऱ्या पणत्यांची शांतता, सोज्वळता व मांगल्य मात्र प्रतीत होत नाहीं.



दीप हे सूर्याचे प्रतीक आहेत. ते तिमिराचा नाश करतात. त्याप्रमाणें या दिवशीं आपण आपल्या मनांत ज्ञानाची ज्योत पेटवून अज्ञानांधकार दूर पळवून लावण्याचा संकल्प केला पाहिजे. लहान मुलें या दिवशीं फटाकडे, फुलबाज्या, चंद्रज्योती वगैरे उडवितात. त्यामुळें गांवांत सगळीकडे धुमधडाका व लखलखाट चालूं असतो. फटाके उडविण्याच्या उत्साहांत बरेच अपघातहि होतात. त्यामुळें ही प्रथा आतां बंद केली पाहिजे असें वाटूं लागलें आहे शिवाय विदेशी फटाक्यांचा वापर केल्यानें या दिवशीं आपण आपल्या देशांतील लक्ष्मी अन्य देशीं पाठवितों. मग लक्ष्मीपूजन करण्यांत फारसा अर्थ उरत नाहीं, ही गोष्ट आपण अवश्य लक्षांत घेतली पाहिजे. दिवाळीच्या या दिवसांत नाना तऱ्हेच्या

मिष्टान्नांच्या मेजवान्या झडतात. इष्टमित्रांना पाचारण करून घरोघर फराळांच्या फैरी झडतात. या सर्व धांदलींत बिचाऱ्या पोटाचे मात्र हाल होतात. तिखट, तेलकट, तुपट व तळलेल्या पदार्थांचें अतिसेवन केल्यानें पोटांत बिघाड होतो व नसती व्याधी पाठीमागें लागण्याचा संभव असतो. या गोष्टीसंबंधीं यथायोग्य ज्ञान देऊन तिला आळा घालणें आपलें कर्तव्य आहे. दिवाळीच्या दिवसांत सुवासिक उटणें लावून अभ्यंगस्नान करण्याची प्रथा उत्तम आहे. शरिराचें आरोग्य राखण्यास स्वच्छ आंघोळ करण्याची फार आवश्यकता आहे. या गोष्टीसंबंधींचें ज्ञान या निमित्तानें दिलें गेलें तर अधिक चांगलें होईल. या दिवसांत सुवासिक तेलें व अत्तरें लावून विलास करण्याचाहि प्रघात आहे. असले विलास हे आपल्या आयव्ययाची यथायोग्य कल्पना घेऊन केले पाहिजेत. निष्कारण ऋण काढून सण साजरा करण्यांत फारसा अर्थ नाहीं ही गोष्ट विचारांत घेणें जरूर आहे.

## बलिप्रतिपदा

कार्तिक शु. प्रतिपदा हा बलिप्रतिपदेचा दिवस. या दिवसाची कथा अशी आहे : प्राचीन काळीं भक्तश्रेष्ठ प्रल्हाद याचा नातु बळि हा अत्यंत पराक्रमी राजा होऊन गेला. त्यानें आपल्या पराक्रमानें प्रत्यक्ष देवादिकांना देखील जिंकून घेतलें. लक्ष्मी ही त्याची दासी झाली. तथापि बळिराजा जोंपर्यंत दानधर्मपूर्वक राज्य करीत होता तोंपर्यंत त्यापासून कोणाला उपद्रव झाला नाहीं. परंतु पुढें मात्र ही स्थिति पालटली. दिवसेंदिवस बळिराजा सत्तामदानें धुंद होऊं लागला. त्यामुळें त्याच्या प्रजेचे व प्रत्यक्ष लक्ष्मीचे अतोनात हाल होऊं लागले. ही स्थिति असह्य होऊन भगवान् विष्णूनें वामनावतार धारण केला व बटूचा वेष घेऊन तो यज्ञाच्या वेळीं बळिराजाकडे याचक म्हणून आला. बळिराजा सत्तामदानें धुंद झाला असला तरी बाह्य कर्मांचें आचरण करण्यांत तो अत्यंत दक्ष होता. तें ओळखून

वामनानें बळिराजाकडे त्रिपादभूमीचें दान मागितलें. बळिराजानेंहि त्रिपाद-भूमीचें दान करण्याबद्दल वामनास वचन दिलें. वामनाचें कपट शेजारील कांहीं लोकांच्या लक्षांत आलें. त्यांनीं बळिराजास आपल्या विचारापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला. तथापि बळि आपल्या वचनापासून



परावृत्त झाला नाहीं. त्याप्रमाणें वामनानें एक पाय स्वर्गांत, दुसरा पाय मृत्युलोकांत व तिसरा पाय बळीच्या डोक्यावर ठेवून त्याला पाताळांत गाडून टाकलें. बळीची पाताळांत हकालपट्टी होतांच लक्ष्मीची बंदि-वासांतून मुक्तता झाली. याप्रमाणें वामनानें बळीचें उच्चाटन केलें खरें. तथापि त्यानें, ' कार्तिक शु. प्रतिपदेस लोक तुझें स्मरण करतील ' असेंहि त्याला आश्वासन दिलें. त्याला अनुसरूनच बलिप्रतिपदेचा दिवस साजरा करतात. या दिवशीं बळीची मूर्ति करून तिची पूजा करतात व यष्टिका-कर्षणाचा खेळ खेळतात. काठीच्या एका टोकाला पुढारलेले व दुसऱ्या टोकाला मागासलेले लोक धरून रस्सीखेच सुरू करतात. ही प्रथा मात्र अनिष्ट आहे. कारण तीमुळें जातीय सलोखा बिघडण्याचा संभव असतो.

या दिवशीं दुर्बलांना सबलांनीं आधार दिला पाहिजे. त्यांना आपल्याप्रमाणें बलवान बनविण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

बळिराजाच्या या कथेच्या पाठीमागें कांहीं ऐतिहासिक पार्श्वभूमि आहे. ती देखील आपण नीट लक्षांत घेतली पाहिजे. बळि हा आर्यावर्तांतील मूळचा रहिवासी होता. त्याचा धंदा शेतीचा असे. येथील अतिशूद्र मानल्या गेलेल्या लोकांचा तो राजा होता. त्यामुळेंच आपणाकडे शेत-कऱ्यांना 'बळिराजा' म्हणण्याचा प्रघात पडला आहे. बळिराजाच्या वेळीं आर्यावर्तांत बळीपेक्षां शरीरानें लहान असलेल्या लोकांच्या कांहीं टोळया आल्या व त्यांनीं बळीला दक्षिणेकडे रेटीत रेटीत हल्लींचें बाली बेट आहे त्या ठिकाणीं पिटाळून लावलें. प्राचीन काळीं हें बाली बेट हिंदुस्थान देशाशीं संलग्न होतें असें भूगोलशास्त्रज्ञ सांगतात. त्याला पाताळ असें म्हणत. थर्स्टन नांवाच्या शास्त्रज्ञानें तर ऑस्ट्रेलियांतील लोकांचें व वन-स्पतींचें दक्षिण हिंदुस्थानांतील लोकांशीं व वनस्पतींशीं साम्य असल्याचें निदर्शनास आणून दिलें आहे. तेथील लोक प्राचीन काळच्या बळीचे वंशज असावेत, असें मानावयास भरपूर जागा आहे. बलिप्रतिपदेच्या निमित्तानें या प्राचीन ऐतिहासिक व भौगोलिक ज्ञानाची आपण ओळख करून घेतली पाहिजे. या दिवसापासून विक्रम संवताच्या नव्या वर्षास सुरुवात होते. व्यापारी लोक हाच वर्षारंभाचा दिवस मानतात. या दिवशीं प्रभु रामचंद्रांचा राज्याभिषेक समारंभ झाला, असेंहि मानलें जातें.

बलिप्रतिपदेच्या दिवशीं गोवर्धनपूजा करतात. या दिवशीं इंद्रानें केलेल्या अतिवृष्टीपासून संरक्षण करण्यासाठीं श्रीकृष्णानें गोवर्धन पर्वत उचलला व त्याखालीं गोकुळवासियांचें संरक्षण केलें या गोष्टीची स्मृति म्हणून बलिप्रतिपदेस गोठ्यांतील शेणाचा गोवर्धन पर्वत तयार करतात व त्याच्या भोंवतीं कारटांचीं गुरें तयार करून त्यांची पूजा करतात. गुरांना शृंगारून पळविण्याचा व गवळयांना पैसे देण्याचाहि या दिवशीं प्रघात आहे.

## भाऊबीज

कार्तिक शुद्ध द्वितीयेस भाऊबीज साजरी करतात. या दिवशीं यमानें आपली बहिण यमी हिच्या घरीं जाऊन तिचा पाहुणचार घेतला व तिला ओवाळणी घातली. त्यामुळें या दिवशीं बहिणीनें भावास ओवाळण्याची



प्रथा पडली आहे. बहिण–भावाच्या प्रेमाची वृद्धि करण्यास भाऊबिजेची फार मदत होते. या दिवशीं दूरदूरच्या गांवाहून भाऊ आपल्या बहिणीकडे येतात. त्यामुळें बहिणीला अतिशय आनंद होतो. भाऊबिजेच्या या हृदयंगम प्रसंगावर आजपर्यंत किती तरी स्त्रीगीतें लिहिलीं गेलीं आहेत! विवाहित बहिणीस आपल्या प्रेमळ भावाची आठवण होण्यास भाऊबिजेची मदत होते. या दिवसाचें महत्त्व बरेंचसें रक्षाबंधनासारखें आहे. कारण या दिवशीं मानलेली बहिणहि आपल्या मानलेल्या भावास ओवाळते. हे मानलेले भाऊ अगर बहिणी वेगवेगळ्या जातींतीलहि असतात. त्यामुळें जातीय सलोखा राहण्यास देखील मोलाची मदत होते.

## समवाय

१. **वसुबारसः**—गाईचें महत्त्व पटवून देऊन दुग्धव्यवसायाची आवश्यकता लक्षांत आणून द्या.

२. **धनत्रयोदशीः**—अपमृत्यूच्या कारणांची मीमांसा करून तीं कशीं नष्ट करतां येतील यासंबंधींचें मार्गदर्शन करा.

३. **नरकचतुर्दशीः**—सामुदायिक सफाईचा कार्यक्रम ठेवून आरोग्याच्या दृष्टीनें स्वच्छतेचें महत्त्व पटवून द्या.

४. **लक्ष्मीपूजनः**—हिंदुस्थानचा प्राचीन भूगोल व बळीच्या निर्गमनाची ऐतिहासिक माहिती द्या.

५. **बलिप्रतिपदाः**—बळीची कथा सांगून दुर्बलांचें रक्षण करण्याच्या जबाबदारीची जाणीव करून द्या.

६. **भाऊबीजः**—भाऊबिजेचें महत्त्व पटवून द्या.

* **टीप**—या सणांच्या वेळीं सुटी असल्यामुळें त्यासंबंधींची माहिती सुटीपूर्वी दिली जाणें आवश्यक आहे.



# त्रिपुरी पौर्णिमा

कार्तिक पौर्णिमेस त्रिपुरी पौर्णिमा असें म्हणतात. त्रिपुरी पौर्णिमेस दिव्याची रोषणाई करतात. त्यामुळें या दिवसाला ' मोठी दिवाळी ' असें म्हणण्याचाहि प्रघात आहे. पुराणांतरीं त्रिपुरी पौर्णिमेची कथा अशी आहे : पूर्वीं सृष्टीवर त्रिपुरासुर या नांवाचा एक दैत्य राहात असे. तो मोठा महत्त्वाकांक्षी होता. त्यानें ब्रह्मदेवाची आराधना करून त्याजकडून अमरत्वाचा वर प्राप्त करून घेण्याचा घाट घातला. तेव्हां त्रिपुरासुराच्या मनांतील पाप ओळखून अनेक देवांनीं त्याच्या आराधनेंत विघ्नें आणण्याचा प्रयत्न केला. तथापि त्रिपुरासुरावर संतुष्ट होऊन ब्रह्मदेवानें त्यास अभयदान दिलें. त्यामुळें त्रिपुरासुर फार माजला. तो देवादिकांना त्रास देऊं लागला. त्यानें आपल्या तीन नगरींच्या भोंवतीं अभेद्य तट बांधून आत्मसंरक्षणाची उत्तम व्यवस्था करून ठेवली. त्रिपुरासुराच्या या तटांपुढें देवांचा कांहींच इलाज चालेना. त्रिपुरासुराचा नाश करण्याचा भगवान् विष्णूंनीं खूप प्रयत्न केला. तथापि तोहि निष्फळ ठरला. तेव्हां

देवांनीं त्याचा नाश करण्याबद्दल शंकरास विनंती केली. शंकरानें तीन दिवस त्रिपुराशीं सामना केला व कार्तिक पौर्णिमेस त्याचा वध केला. त्रिपुरी पौर्णिमेसंबंधीं दुसरीहि कथा प्रचलित आहे ती अशी : प्राचीन काळीं मयासुर नांवाच्या दैत्यानें ब्रह्मदेवास प्रसन्न करून तीन पुरें वसविलीं. मयासुरानें पुढें या त्रिपुरांचें आधिपत्य तेथील असुरांकडे दिलें. या असुरांनीं जोंपर्यंत देवादिकांस त्रास दिला नाहीं तोंपर्यंत त्रिपुरांची भरभराट झाली. तथापि पुढें त्रिपुरांची सत्ता तारकासुरपुत्र ताराक्ष, कमलाक्ष व विद्युन्माली यांच्याकडे आली. सत्तामदानें धुंद होऊन त्यांनीं देवांना त्रास देण्यास सुरवात केली. तेव्हां शंकरानें त्यांच्याशीं युद्ध करून त्यांना जाळून टाकलें. त्रिपुरासुरांच्या जाचांतून देवांची व सृष्टीची सुटका झाली, म्हणून त्यांनीं आनंदोत्सव साजरा केला. तेव्हांपासून त्रिपुरी पौर्णिमेस दीपोत्सव साजरा करण्याची प्रथा पडली आहे. या दिवशीं दगडाच्या दीपमाळेस त्रिपुर मानून तिजवर दीप ठेवतात. शंकरांनीं त्रिपुरासुराचा नाश केल्यामुळें स्वाभाविकपणेंच त्रिपुरी पौर्णिमेच्या दिवशीं शंकराच्या आराधनेस विशेष महत्त्व आहे. या दिवशीं शंकराच्या देवळांत दीपमाळा लावतात. देवालयासमोरील दक्षिणेकडच्या टेकड्यांवरहि अग्नि पेटवितात. त्रिपुरी पौर्णिमेस स्त्रिया कोहळा व दीपदान करतात. सायंकाळच्या वेळीं नदीच्या पात्रांत सोडलेले व प्रवाहांत वाहत जाणारे दीप पाहून मोठी मौज वाटते. त्या वेळीं आकाशांतील तारकाच जणुं नदीच्या पात्रांत उतरल्या आहेत, असा भास होतो.

पुराणांतरीं सांगितलेली ही त्रिपुरासुराची कथा प्रतीकात्मक दिसते. त्रिपुरासुर म्हणजे मानवी मनांतील काम, क्रोध व मोह या तीन दुष्ट भावना होत. त्यांचा शिवानें म्हणजे मनोमांगल्यानें नाश केला, असा याचा अर्थ लावता येतो. त्रिपुरी पौर्णिमेचा सण साजरा करतांना ही गोष्ट आपण अवश्य लक्षांत घेतली पाहिजे. या दिवशीं मनांतील दुष्ट भावनांचें व

वासनांचें बुद्धिपुरःसर दमन करण्याचा आपण संकल्प केला पाहिजे व मनांत सद्भावनांचे ज्योतिर्मय दीप लावले पाहिजेत.

त्रिपुरी पौर्णिमेचा दिवस शेतकरी लोकहि मोठ्या उत्साहानें साजरा करतात. या दिवसांत शेतांतील नवीन धान्य घरीं आलेलें असतें. त्यामुळें शेतकरी लोक मोठ्या आनंदांत असतात. त्रिपुरी पौर्णिमेस ते नवीन धान्याचे रुचकर पदार्थ तयार करून भोजन करतात. त्यामुळें या दिवसाला शेतकरी लोक 'नव्याची पुनव' असें म्हणतात. नव्याच्या पुनवेच्या दिवशीं आपण मुलांस शेतकरी जीवनाचीं व त्यांच्या सुगीच्या कामाची ओळख करून दिली पाहिजे. आपल्या देशांतील अन्नधान्यपरिस्थिति अलीकडे दिवसेंदिवस खालावत चालली आहे. नवीन धान्य नजरेस पडणें देखील मुष्किलीचें होऊन बसलें आहे. अशा स्थितींत आपण नव्याची पुनव कशी साजरी करणार? तथापि आज जरी आपणास 'नव्याची पुनव' साजरी करतां आली नाहीं तरी अधिक अन्नधान्य पिकविण्याच्या मोहिमेस आपण हातभार लावण्याचा या दिवशीं संकल्प केला व त्याप्रमाणें पुढें आपल्या हातून कृति घडली तर नव्याची पुनव यथार्थतेनें साजरी करण्याचा सुदिन लवकरच उजाडेल, असें मानावयास हरकत नाहीं.

या दिवशीं शेतकरी लोकांना एकत्र जमवून त्यांना अधिक धान्य पिकविण्यचें महत्त्व पटवून दिलें पाहिजे. त्याचप्रमाणें पिकें भरपूर येण्यासाठीं जमिनीची कोणत्या प्रकारें मशागत केली पाहिजे, खताचा वापर कसा केला पाहिजे इत्यादि अनेक गोष्टींचेंहि ज्ञान दिलें पाहिजे. जमीन पडित टाकणें, शेतीसाठीं उपयोगांत आणलेल्या जमिनींचीं योग्य प्रकारें मशागत न करणें व शेती अधिक फलदायी करण्यासाठीं शास्त्र शुद्ध शेतीविषयक ज्ञानाचा अभाव असणें या तीन असुरांमुळें देशाचें कसें नुकसान होत आहे हें शेतकऱ्यांस पटाविलें पाहिजे. त्रिपुरी पौर्णिमेच्या निमित्तानें या त्रिपुरासुरांचा नाश करण्याचा संकल्प करणें किती योग्य होईल!

## समवाय

१. त्रिपुरी पौर्णिमेची कथा सांगा.

२. सुगीच्या वेळच्या शेतकऱ्यांच्या कामाची माहिती द्या.

३. अधिक धान्य पिकविण्याच्या मोहिमेसंबंधानें माहिती देऊन त्याप्रमाणें कृति करण्याची योजना हातीं घ्या.

४. शास्त्रशुद्ध रीतीनें शेती करण्यासंबंधींचें आवश्यक तें ज्ञान द्या.

५. इंदिरा संत यांची ' नव्याची पुनव ' ही कविता शिकवा.

# दत्त जयंती





मार्गशीर्ष पौर्णिमेस जगद्गुरु दत्तात्रेय यांचा जन्म झाला. दत्तात्रेयाचे पिता अत्रि ऋषि हे महान् तपस्वी होते. त्यांना ब्रह्मदेवाचे मानसपुत्र मानतात. कारण ब्रह्मदेवाच्या नेत्रांतील तेजापासून त्यांचा जन्म झाला अशी कथा आहे. त्यामुळें स्वाभाविकपणेंच अत्रि ऋषि हे तेजाचें अधिपति बनले. सर्व प्रकारच्या तेजांची उत्पत्ति त्यांच्यापासून झाली असें समजतात. अशा तेजस्वी अत्रि ऋषींची पत्नी अनसूया ही महान् पतिव्रता स्त्री होती. तिच्या पातिव्रत्याच्या अनेक रसभरित कथा नारद मुनि स्वर्गातील देवदेवतांना सांगत. त्या ऐकून एकदां सरस्वती, लक्ष्मी व पार्वती या देवतांच्या मनांत असूया निर्माण झाली. त्यांनीं महासती अनसूयेचें सत्त्व हरण करण्यासाठीं ब्रह्मा, विष्णु व महेश यांची पृथ्वीतलावर रवानगी केली. ब्रह्मा, विष्णु व महेश अतिथींचीं रूपें धारण करून अनसूयेकडे आले. अनसूयेनें त्यांचें यथास्थित स्वागत करून त्यांच्यासाठीं भोजन तयार

केलें. तथापि अनसूया विवस्त्र होऊन वाढावयास तयार असेल तरच आपण अन्नग्रहण करूं असा त्यांनीं हट्ट धरला. तेव्हां अनसूयेपुढें मोठाच पेंच पडला. आपल्या पातिव्रत्याची हीच खरी कसोटी आहे असें जाणून तिनें आपल्या तपोबलानें अतिथीरूप ब्रह्मा, विष्णु व महेश यांना बाल-स्वरूप बनवून पाळण्यांत घातलें. या तीन बालकांचीं तिनें अनुक्रमें सोम, दत्त व दुर्वास अशीं नांवें ठेविलीं. अत्रि ऋषींच्या घरीं हीं तीन बाळें वाढूं लागलीं. कालांतरानें तीं मोठीं झाल्यावर त्यांपैकीं सोम हा चंद्रलोकीं निघून गेला व दुर्वास तपाचरणासाठीं अरण्यांत चालता झाला. तथापि तेथून जातांना त्यांनीं आपले अंश दत्ताच्या ठिकाणीं ठेवले. त्यामुळें दत्ताच्या ठिकाणीं ब्रह्मा, विष्णु व महेश यांचा संयोग घडून आला.

बाल दत्तात्रेयांनीं जन्मानंतर अनसूयेस आपलें प्रखर तेजस्वी रूप दाखविलें. तथापि अनसूयेनें त्यास आपलें बालस्वरूपच कायम ठेवण्याची विनंती केली. त्याप्रमाणें दत्तात्रेयांनीं मानवी जीवनक्रम पत्करला. बाळ-पणींच त्यांनीं वेदपठणास सुरवात करून त्यांत पारंगतता प्राप्त करून घेतली. त्यानंतर त्यांनीं वेदविद्येच्या अध्यापनकार्यास आरंभ केला. त्यामुळें त्यांच्याभोंवतीं बराच शिष्यपरिवार जमला. त्यास त्यांनीं ब्रह्मज्ञानाची ओळख करून दिली व भक्तिमार्ग, कर्ममार्ग व ज्ञानमार्ग इत्यादींसंबंधींचा सारासार विचार सांगितला. दत्तात्रेयांची विरक्त वृत्ति दिवसेंदिवस वाढत चालली. तेव्हां अनसूयेनें त्यास गृहस्थाश्रम स्वीकारण्याचा आग्रह केला. परंतु दत्तात्रेयांनीं ती गोष्ट मान्य केली नाहीं. उलट त्यांनीं अनसूयेस ब्रह्मविद्येचा उपदेश करून तिजकडून गृहत्याग करण्याची परवानगी मिळविली.

दत्तात्रेयांनीं अनसूयेस केलेला हा उपदेश लक्षांत घेण्याजोगा आहे. त्यांत ब्रह्मज्ञानाच्या तात्त्विक चर्चेबरोबरच निसर्गाच्या शिकवणुकीचें महत्त्व वर्णिलें आहे. निसर्गांत आढळून येणाऱ्या नानाविध गोष्टींपासून आपणांस किती तरी गोष्टी शिकतां येण्यासारख्या आहेत. पृथ्वीपासून-

आपणांस सहिष्णुतेचा धडा मिळतो. जामिनीस कोणीं पायाखालीं तुडविलें अथवा तिच्या उदरांत खोल भुयारें खोदलीं तरी तिची सहनशीलता विचलित होत नाहीं. योग्य प्रकारें श्रम केल्यास पृथ्वी त्याचा मोबदला दिल्याशिवायहि राहात नाहीं. तिच्या ठिकाणीं कोणत्याहि प्रकारची असूया नसते. ती अनसूयास्वरूप आहे. वृक्षादिकांचें देखील तसेंच आहे. त्यांना तुम्ही तोडा, फोडा, जाळा अथवा शृंगारा, ते सर्वांची सारख्याच भक्तीनें सेवा करतात. त्याचप्रमाणें आकाश हें आत्म्याप्रमाणें सर्वव्यापी असूनहि सर्वांपासून अलिप्त असतें. सर्व सृष्टीवर आच्छादन घालूनहि तें स्वतः निःसंग व निर्विकार राहतें. आकाशापासून आपणाला या गोष्टी शिकतां येण्यासारख्या आहेत. सृष्टीला जीवन देऊन पाणी तिचें मालिन्य नष्ट करतें, हा त्याचा केवढा मोठा गुण आहे? अग्नीचेंहि तसेंच आहे. दुसऱ्याचे दोष जाळूनहि तो स्वतः पवित्र राहतो. सूर्य स्वतः सततोद्योग करून सर्व सृष्टीस उद्योगमग्न बनवितो. निसर्गातील या निरनिराळ्या गोष्टींपासून आपण इष्ट तो बोध घेतला पाहिजे असें दत्तात्रेयांनीं सांगितलें आहे.

तथापि निसर्गातील हे गुण आपल्या दृष्टीस पडण्यासाठीं आपण आपल्या घराचा उंबरा ओलांडून निसर्गाच्या सान्निध्यांत राहिलें पाहिजे. अंगीं लीनता धारण करून प्रसन्न मनानें व स्थिर बुद्धीनें निसर्गाची उपासना केल्यास आपणांस हे गुण प्राप्त करून घेतां येतील. दत्तात्रेयांनीं अशी वृत्ति धारण करून तीर्थाटन केलें. आपल्या देशांत दत्तात्रेयांचीं अनेक तीर्थें प्रसिद्ध आहेत. त्या सर्व ठिकाणीं दत्तात्रेयांचा वास होता असें मानतात. त्यावरून त्यांनीं केलेल्या प्रवासाची व ज्ञानसाधनेची आपण कल्पना करावी.

दत्तात्रेयांनीं कर्ममार्गाचा पुरस्कार करून अधर्मास आळा घातला व संन्यासमार्गाचा प्रचार केला. त्यामुळें त्यांचा शिष्यपरिवार बराच वाढला. त्यांच्या शिष्यपरिवारांत प्रल्हाद, कृतवीर्य सहस्रार्जुन, भार्गवराम, यदु व अलर्क यासारखे थोर नरमणी समाविष्ट होते. त्यांनीं दत्तसांप्रदायाची

अनन्यभावें सेवा करून त्यास महत्त्व प्राप्त करून दिलें. अलीकडच्या काळांत देखील नृसिंहसरस्वती, अक्कलकोटचे जनार्दन स्वामी, श्री. वासुदेवानंद सरस्वती यांसारख्या साधुपुरुषांनीं दत्तसांप्रदायाचा पुरस्कार केला आहे. दत्ताचा अवतार मोठा वैशिष्ट्यपूर्ण आहे. प्राचीन काळापासून आर्य लोक ब्रह्मा, विष्णु व महेश यांना अनुक्रमें उत्पत्ति, स्थिति आणि लय यांच्या अधिष्ठात्री देवता मानीत आले आहेत. या तिन्ही स्थितींचें दत्तात्रेयांच्या ठिकाणीं एकीकरण झालें आहे. त्यामुळें या देवतांतील भेद नष्ट होऊन त्याप्रमाणें उपासकांच्या एकीकरणासहि मदत झाली आहे.

दत्तात्रेयास कांहीं लोक चंद्र मानतात व चंद्राच्या १६ कलांप्रमाणें त्यांचे १६ अवतार कल्पितात. त्यावरून अत्रि हे सूर्य व अनसूया ही पृथ्वी आहे असें प्रतिपादन करून सूर्य व पृथ्वी या मातापित्याच्या पोटीं चंद्राचा जन्म झाला असें सिद्ध केलें जातें. मार्गशीर्ष पौर्णिमेच्या सुमारास प्रजापति, रुद्र व ब्रह्महृदय (विष्णु) हे तीन तारे आकाशांत उगवलेले दिसतात. तेच त्रिमूर्ति दत्त होत असेंहि मानलें जातें. दत्तजयंतीच्या निमित्तानें आकाशांतील या तारकांची आपण माहिती करून घेतली पाहिजे. त्याचप्रमाणें दत्तात्रेय हे साक्षात् जगद्गुरु असल्यामुळें या दिवशीं गुरूचें माहात्म्य देखील पटवून दिलें पाहिजे. दत्तभक्तांची माहिती देऊन दत्तांच्या तीर्थक्षेत्राची ओळख करून दिली पाहिजे. दत्तसांप्रदायांत कबीर, बाबा बुढन यांसारखे कांहीं अन्यधर्मीय लोक देखील समाविष्ट आहेत. त्यांचीहि या निमित्तानें माहिती देणें उचित होईल. त्याचप्रमाणें दत्तभक्त महानुभाव पंथाची माहिती देऊन त्यांनीं केलेल्या वाङ्मयसेवेची ओळख करून दिल्यास दत्तजयंतीचा उत्सव अधिक उद्‌बोधक होईल.

### समवाय

१. दत्तजन्माची कथा सांगा.

२. आकाशांतिल त्रिमूर्तींचें निरीक्षण करा.

३. गुरूचें माहात्म्य पटवून द्या.
४. गुरुचरित्रांतील एखादा अध्याय वाचून घ्या.
५. दत्तसांप्रदायासंबंधीं माहिती देऊन त्याचें कार्य सांगा.
६. दत्ताच्या तीर्थक्षेत्रांची माहिती द्या.
७. महानुभाव पंथाची द त्याच्या वाङ्मयीन कार्याची ओळख करून द्या.
८. निसर्गापासून ज्ञानोपासना करण्याचें महत्त्व पटवून द्या.

---




दीपावलीनंतर येणारा हिंदु लोकांचा महत्त्वाचा सण म्हणजे मकरसंक्रांत हा होय. हा सण पौष महिन्यांत येतो. मकरसंक्रांतीच्या दिवशीं संक्रांतदेवीनें संकरासुराचा नाश केला अशी पुराणांत कथा आहे. त्यामुळें या सणास धार्मिक महत्त्व प्राप्त झालें आहे. धार्मिक वृत्तीचे लोक या दिवशीं पवित्र अशा तीर्थक्षेत्रास जाऊन तेथील नदींत स्नान करतात. असें केल्यानें सद्गति मिळते असा त्यांचा समज असतो.

तथापि मकरसंक्रांत हा खरा निसर्गाचा सण आहे. या दिवसापासून सूर्य उत्तरेकडे जाऊं लागतो. सूर्याच्या या गमनास 'उत्तरायण' असें म्हणतात. ही घटना प्रतिवर्षीं मकरसंक्रांतीच्या सुमारास घडून येते. तिचें कारण आपण समजावून घेतलें पाहिजे. पृथ्वी ही सूर्याभोंवतीं एका वर्षांत प्रदक्षिणा पुरी करते ही गोष्ट आपणांस माहीत आहे. ती सूर्याभोंवतीं ज्या कक्षेंतून प्रदक्षिणा करते त्या कक्षेशीं तिच्या आंसाचा ६६॥ अंशांचा कोन झालेला

आहे. त्यामुळें २१ मार्च व २३ सप्टेंबर या दोन दिवशींच फक्त पृथ्वीचीं उत्तर ध्रुव व दक्षिण ध्रुव हीं दोन टोकें सूर्यासमोर येतात. या वेळीं पृथ्वीवर सर्वत्र १२ तासांचा दिवस व १२ तासांची रात्र असते. परंतु दुसऱ्या दिवसापासून या स्थितींत हळूहळू पालट घडत जातो. ता. २३ सप्टेंबरपासून उत्तर ध्रुव सूर्यापासून दिवसेंदिवस दूर जाऊं लागतो. ता. २१ डिसेंबर या दिवशीं तो सूर्यापासून पूर्णपणें दूर गेलेला असतो. त्यानंतर तो हळूहळू पुन्हां सूर्यासमोर येऊं लागतो. त्यामुळें सूर्य उत्तरेकडे सरकत आहे असें आपणांस वाटतें व उत्तरायणास सुरवात झाली असें आपण म्हणतों. याप्रमाणें ता. २१ डिसेंबर हाच खरा मकरसंक्रमणाचा दिवस होय. तथापि पंचांगशास्त्राप्रमाणें मकरसंक्रमणाचा दिवस ता. १४ जानेवारी या रोजीं येतो. याचें कारण असें कीं, पंचांगशास्त्र सूर्य हा एका वर्षांत १२ राशींतून फिरतो असें मानतें. सूर्याच्या एका राशींतून दुसऱ्या राशींत जाण्याच्या या क्रियेस संक्रमण अथवा संक्रांत असें म्हणतात. याप्रमाणें पंचांगशास्त्रानुसार वर्षांतून १२ संक्रांती होतात. तथापि त्यांपैकीं मकरसंक्रांत व कर्कसक्रांत याच दोन विशेष महत्त्वाच्या मानल्या आहेत. सूर्यानें मकर राशींत प्रवेश केला कीं, मकरसंक्रमणाचा दिवस उजाडतो.

मकरसंक्रांतीच्या दिवसापासून आपणांस सूर्यप्रकाश अधिकाधिक मिळूं लागतो. त्यामुळें मनोमालिन्य नष्ट होऊन शरीरप्रकृति चांगली राहण्यास मदत होते. आपल्या देशांत बाराहि महिने सूर्यदर्शन घडत असल्यामुळें आपणांस त्याचें फारसें महत्त्व वाटत नाहीं. तथापि पावसाळ्याच्या व हिंवाळ्याच्या दिवसांत सूर्यप्रकाश कमी मिळाल्यामुळें शरीर-मनावर अनिष्ट परिणाम घडतो, ही गोष्ट देखील आपणास जाणवल्याशिवाय राहात नाहीं. सूर्य हा चराचर सृष्टीचा जीवनदाता आहे. सूर्यकिरणांत जीवनास आवश्यक असें 'ड' जीवनसत्त्व आहे. शरीर निरोगी राखण्यास व तें काटक व कणखर बनविण्यास त्याची अत्यंत आवश्यकता आहे. सूर्यप्रकाशांत सतत

काम करणाऱ्या माणसांना हें जीवनसत्त्व भरपूर प्रमाणांत मिळतें. तथापि घरांत राहून बैठीं कामें करणाऱ्या पडदानशीन स्त्रियांवर मात्र सूर्यप्रकाश न मिळाल्यामुळें बराच अनिष्ट परिणाम घडतो. त्यांची कांति पिंगट बनते व कोणत्याहि रोगास त्या तात्काळ बळी पडतात. सूर्यप्रकाशाच्या अभावीं वनस्पतींची देखील हीच अवस्था होते. जीवनास आवश्यक असलेला, असा हा सूर्यप्रकाश आपणास मकरसक्रांतीपासून अधिकाधिक मिळूं लागतो. त्यामुळें या दिवशीं आनंदोत्सव साजरा करणें युक्त ठरतें.

मकरसंक्रांतीच्या या आनंदोत्सवास अलीकडे बरेंच सामाजिक महत्त्व प्राप्त झालें आहे. या दिवशीं मनांतील द्वेषभाव नष्ट करून स्नेहाची जोड करावयाची असते. स्नेहाचें व प्रेमाचें प्रतीक म्हणून सर्वजण तिळगुळ वाटतात व 'तिळगुळ घ्या आणि गोड बोला' अशी प्रेमपूर्वक विनंती करतात. तिळांत स्निग्धता म्हणजे स्नेह असतो व गुळांत गोडी असते. त्यामुळें स्नेहसंवर्धनासाठीं त्याची किती मार्मिकपणें योजना झाली आहे हें आपणांस दिसून येतें. शिवाय या दिवसापासून दिवस तीळ तीळ मोठा होऊं लागतो, त्याचेंहि तीळ हें प्रतीक आहे असें मानावयास हरकत नाहीं. मकरसंक्रांतीच्या दिवशीं इष्टमित्र परस्परांस शुभसंदेश पाठवितात. या दिवशीं स्त्रिया हळदीकुंकवाचा समारंभ साजरा करून सुवासिनींस वाण वाटतात. या समारंभाच्या वेळीं स्त्रियांची ओटी भरतांना ऊस, बोरें, गहूं, खारका, गाजरें इत्यादि मधुर व पौष्टिक पदार्थांचा वापर करतात. या दिवशीं अनाथांना अन्न, वस्त्रें व पुस्तकें इत्यादींचें दान करणें अधिक उचित होईल. अशा प्रकारच्या योजना ठिकठिकाणीं आंखल्या जाणें इष्ट आहे.

पौराणिक कथेप्रमाणें संक्रांत प्रतिवर्षीं निरनिराळ्या वाहनावर स्वार होऊन येते असें मानलें जातें. त्यावरून ज्योतिषी लोक वर्षभविष्य वर्तवितात. संक्रांतदेवीस ज्या गोष्टी आवडतात त्या गोष्टींची महागाई होते असें मानतात. त्यामुळें आपल्या भाषेंत 'संक्रांत वळणें' हा विपत्तिदर्शक

शब्दप्रयोग रूढ झाला आहे. त्याचा अर्थ आपण नीट समजावून घेतला पाहिजे.

मकरसंक्रांतीच्या दिवशीं आपल्या बाहेरगांवच्या इष्टमित्रांस तिळगुळ पाठविण्याचा प्रघात रूढ होत चाललेला आहे. त्याचप्रमाणें या दिवशीं शुभसंदेश पाठविण्याचाहि प्रघात आहे. त्यामुळें कलात्मकतेस बहर येतो. संक्रांतीच्या दिवशीं अनेक नवोदित कवि कवितारचना करतात. मुलें कापडांच्या सुंदर पिशव्या शिवतात; तर स्त्रिया साखरेचा मधुर हलवा तयार करण्यांत गर्क असतात या सर्व गोष्टीकडे आपण कलात्मकतेच्या दृष्टीनें पाहिलें तर कलेचा विकास होण्यास मोलाची मदत होईल.

## समवाय

१. सूर्याच्या दैनंदिन व वार्षिक गतीची माहिती देऊन अयनें व ऋतु कसे निर्माण होतात तें सांगा.

२. राशींबद्दल माहिती द्या.

३. संक्रांतीच्या सणाचें सामाजिक महत्त्व पटवून द्या.

४. तिळगुळ पाठविण्यासाठीं पिशव्या तयार करून घ्या.

५. संक्रांतीच्या शुभसंदेशाचें पत्रलेखन करा.

६. संक्रांतीच्या सणासंबंधींची कविता शिकवा.

# रथसप्तमी



माघ शु. ७ स रथसप्तमी अथवा महासप्तमी असें म्हणतात. रथसप्तमीस सूर्यदेव आपल्या सात घोड्यांचा रथ जुंपून भ्रमण करण्यास निघतो असा समज आहे. त्यामुळें या दिवशीं सूर्याची प्रार्थना करण्याचा प्रघात आहे. रथसप्तमीची कथा अशी आहे : सातव्या शतकांत कंबुज देशांत यशोवर्मा या नांवाचा राजा राज्य करीत होता. यशोवर्मा हिंदु होता. कंबुज देशांतील त्याची कारकीर्द अत्यंत भरभराटीची झाली. तेथें त्यानें यशोधरपूर या नांवाची मोठी वैभवशाली नगरी वसाविली होती. यशोवर्म्याच्या कारकीर्दीतील अवशिष्ट भाग अद्यापिहि कंबोडिया देशांतील अंगकोर थोम येथें आढळून येतात. यशोवर्मा राजास एक पुत्र होता. तो नेहमीं आजारी असे. त्याची प्रकृति सुधारण्यासाठीं यशोवर्म्यानें सर्व प्रकारचे प्रयत्न करून पाहिले. तथापि राजपुत्रास कांहीं गुण येईना. तेव्हां एका भगवद्भक्तानें त्यास रथसप्तमीच्या दिवशीं व्रतस्थ राहून सूर्यपूजा करण्याचा सल्ला दिला. त्याप्रमाणें यशोवर्म्यानें रथसप्तमीच्या दिवशीं उपवास करून सूर्याची पूजा केली.

तेव्हांपासून राजपुत्राच्या प्रकृतींत हळूहळू सुधारणा होत गेली व कांहीं काळानंतर तो संपूर्ण बरा झाला.

रथसप्तमीच्या या कथेंत बरेंच मर्म सांठविलें आहे सूर्य हा सर्व सृष्टीचा धारक व प्रेरक असून त्यापासून प्राणिमात्रास उष्णता, अन्न व प्रकाश इत्यादि गोष्टी मिळतात. सूर्याच्या उन्हामुळें जंतुनाश होतो. सूर्य-किरण रक्तवृद्धीस उपयुक्त असून त्यापासून आपणास जीवनसत्त्वें मिळतात. त्यामुळें सूर्याची उपासना केल्यानें शरीरप्रकृतीवर इष्ट परिणाम घडणें स्वाभाविकच आहे. अर्थात् ही सूर्यपूजा घरांत बसून करणें उचित होणार नाहीं. सूर्योपासना करण्यासाठीं त्याचें प्रत्यक्ष दर्शन घेतलें पाहिजे. त्याच्या किरणांच्या सान्निध्यांत राहिलें पाहिजे. सूर्यप्रकाशांत सतत काम करणाऱ्या माणसांची शरीरप्रकृति धडधाकट व निकोप बनते. यशोवर्मा राजानें सूर्याची उपासना केली याचा अर्थ त्यानें आपल्या मुलास कित्येक दिवस सूर्यस्नान घडविलें असा घेतला पाहिजे त्यामुळें स्वाभाविकपणेंच त्याची प्रकृति सुधारली. सूर्यप्रकाशाचें माहात्म्य असें आहे. आपल्या देशांत सूर्यप्रकाश भरपूर प्रमाणांत मिळत असल्या-मुळें त्याचें विशेष महत्त्व वाटत नाहीं. तथापि पांश्चात्य देशांत कित्येक दिवस सूर्यदर्शन घडत नाहीं ! त्यामुळें सूर्यदर्शन घडलें कीं, ते घराबाहेर पडून मौज करतात. अशा प्रसंगीं ते दूर रानांत अथवा समुद्रकिनाऱ्यावर जाऊन अंगावरील कपडे काढतात व यथेच्छ सूर्यस्नान घेतात. अशा प्रकारच्या पद्धतीचा अवलंब आपल्या देशांतहि करण्याची अलीकडे गरज भासूं लागली आहे. यंत्रयुगाच्या व शहरी संस्कृतीच्या प्रसारामुळें हल्लीं बऱ्याच लोकांना कोंदट जागांत काम करावें लागतें. त्यांना सूर्य-प्रकाशांत हिंडण्याफिरण्याची संधि मिळत नाहीं. त्यामुळें त्यांच्या शरीर-प्रकृतीवर अनिष्ट परिणाम होऊन ती खालावत जाते. मुंबईच्या गिरण्यांतील मजुरांच्या चेहऱ्याकडे पाहिलें कीं, ही गोष्ट तावडतोब आपल्या लक्षांत

आल्यावाचून राहात नाहीं. निरनिराळ्या कचेऱ्यांत काम करणाऱ्या लोकांची स्थिति देखील थोड्याबहुत प्रमाणांत अशीच असते. या सर्व लोकांनीं सुट्टीच्या दिवशीं स्थलांतर करून निसर्गाच्या सान्निध्यांत राहणें व मनसोक्त सूर्यस्नान करणें अत्यंत अगत्याचें आहे.

सूर्यप्रकाशाचें हें माहात्म्य पाहिलें कीं, त्यास देव मानून त्याच्या उपासनेची प्रथा पाडणाऱ्या आपल्या पूर्वजांच्या योजकतेबद्दल आदर वाटतो. अतिप्राचीन काळापासून आर्य लोक सूर्याला देवता मानीत आले आहेत. त्या काळीं सृष्टींत दिसून येणाऱ्या अनेक चमत्कारांचा त्यांना नीटसा उलगडा होईना. तथापि सृष्टींतील या गोष्टी त्यांच्या जीवनास उपयोगी पडत. त्यामुळें ते अशा उपकारक गोष्टींनां देव मानून त्यांची पूजा करीत. या तत्त्वास अनुसरूनच आर्य लोकांनीं इंद्र, वरुण, मरुत्, उषा, सूर्य इत्यादि देवतांच्या आराधनेस सुरवात केली. वैदिक धर्मात सूर्यपूजेसाठीं संध्या करण्याचें व्रत सांगितलें आहे. अशा प्रकारें नित्य संध्या केल्यास दीर्घायुष्य लाभतें असें म्हटलें आहे. या संध्येंत आसन, आचमन, प्राणायाम, मा न व अर्घ्यदान इत्यादि गोष्टींचा समावेश होतो. शरीर ताठ ठेवून व दृष्टि नासिकाग्रावर केंद्रित करून बसण्याच्या पद्धतीस आसन असें म्हणतात. अशीं निरनिराळ्या प्रकारचीं बरींच आसनें आहेत. तीं आपण नित्य करीत गेलों तर शरीरावर फार चांगला परिणाम घडतो. विशेषतः शरीरांतील विकृति नाहींशी करण्यास आसनें फारच उपयुक्त ठरतात. सूर्योपासनेंतील या पाहल्या भागाचें महत्त्व आपण लक्षांत घेतलें पाहिजे. त्यानंतर आचमन करावयाचें असतें. आचमन करणें म्हणजे तळहातावर पाणी घेऊन तें आराध्य दैवतांचें नामस्मरण करीत पिणें. यांत भाविकतेचा भाग बराच दिसतो. त्यानंतरची पायरी प्राणायाम ही होय. प्राणायाम केल्यानें शरीर–मनावर विशिष्ट प्रकारचा ताबा मिळविता येतो. नियमितपणें प्राणायाम केल्यास फुफ्फुसें निरोगी होऊन छाती रुंद होते.

शरीरांतील रक्तप्रवाह जोरानें वाहू लागून सर्व शरीरांत एक प्रकारचें चैतन्य निर्माण होतें. सूर्योपासनेंतील या भागाचा अवलंब केल्यास शरीर-मनाचें स्वास्थ्य लाभेल यांत शंका नाहीं. प्राणायामानंतर मार्जन करावयाचें म्हणजे तोंड धुवावयाचें. या गोष्टींचें महत्त्व आपल्या लक्षांत सहजासहजीं येण्यासारखें आहे. मार्जनाच्या क्रियेनंतर अर्घ्यदानाची पायरी सांगितली आहे. या वेळीं गायत्री मंत्राचा उच्चार करून व आराध्यदैवतांस भक्तिपूर्वक अभिवादन करून दूर्वा, फुलें इत्यादि प्रिय वस्तूंचें दान करावयाचें असतें. सूर्योपासनेच्या या निरानिराळ्या पायऱ्यांची मांडणी अत्यंत मार्मिकपणानें केलेली दिसते.

वैदिक वाङ्मयांत सूर्योपासनेसाठीं स्वतंत्र मंडलें लिहिलीं आहेत. तेव्हांपासून तों आजपर्यंत आपल्या देशांत सूर्योपासना प्रचलित आहे. रामायण व महाभारतकाळीं सूर्योपासना रूढ होती. दाशरथी राम हे सूर्यवंशी होते. त्याचप्रमाणें मध्ययुगांतील राजेहि स्वतःस सूर्यवंशीच म्हणवीत. सूर्योपासनेसाठीं प्राचीन काळापासून ठिकठिकाणीं मंदिरेंहि बांधलीं गेलीं आहेत. जगन्नाथपुरीजवळील कोणार्क, काठेवाडांतील सोमनाथ व ठाण, राजपुतान्यांतील भीमनाल व काश्मिर प्रांतांतील मार्तंड व पायेच इत्यादि ठिकाणीं सूर्यदेवतेचीं देवळें आपणांस अद्यापिहि आढळून येतात. सूर्योपासनेची ही प्रथा इराणी लोकांतहि प्रामुख्यानें दिसून येते. इराणी लोक हे आर्यवंशीय असल्यामुळें उत्तरध्रुवप्रदेशापासून इकडे येतांना त्यांनीं सूर्यपूजाहि आपल्याबरोबरच आणली. पारशी लोकांतील अग्निपूजा ही देखील सूर्यपूजेचींच द्योतक आहे.

प्राचीन आर्यांनीं सूर्याला देवत्व दिल्यामुळें स्वाभाविकपणेंच त्यांच्या ग्रंथांत सूर्यासंबंधीं अनेक कथा आढळून येतात. या कथांस अनुसरून सूर्याचा जन्म कश्यप व अदिति या दांपत्यापासून झाला असें मानलें जातें. आदिति म्हणजे आकाश. सूर्याचा जन्म आकाशांत होत असल्यामुळें आदिति ही त्याची माता ठरली असावी. आश्विनी हिला सूर्याची पत्नी मानतात.

पासून सूर्याला यम, यमुना, अश्विनीकुमार व शनि अशीं अपत्यें झालीं अशी कथा आहे. सूर्य हें कालगणनेचें मुख्य गमक असल्यामुळें त्याच्या ठिकाणीं काळाचा संहारक यम याचा जन्म होणें स्वाभाविक दिसतें. त्याच-प्रमाणें सूर्य हा जीवनदाता असल्यामुळें त्याच्या पोटीं स्वर्गातील धन्वंतरी अश्विनीकुमार यानें जन्म घेतला या गोष्टीचीहि आपणांस संगति लावतां येते.

तथापि अशी संगति लावत बसण्यापेक्षां सूर्य हा अंतरीक्षांतील एक प्रखर तेजस्वी तारा आहे ही गोष्ट आपण लक्षांत घेतली पाहिजे. सूर्या-पासून अनेक तुकडे फुटून निघाले. त्यांपैकींच आपली पृथ्वी ही एक होय. याशिवाय सूर्यापासून निघालेले शनि, मंगळ, शुक्र, गुरु यांसारखे अनेक ग्रह देखील त्याचींच लेकरें होत. या सर्वांचें सूर्याभोंवतीं परिभ्रमण चाल-लेलें असतें. सूर्यापेक्षां किती तरी पटीनें मोठे असे अनेक तारे अंतरीक्षांत आहेत असें खगोलशास्त्रज्ञांनीं सिद्ध केलें आहे. तथापि सूर्य हा आपणांस अधिक जवळचा असल्यामुळें तोच आपला जीवनदाता ठरला आहे. त्यामुळें त्यास देव मानून तो सात घोड्यांच्या रथांत ( म्हणजे प्रकाशांतील सात रंगांच्या रथावर ) स्वार होऊन येतो अशी कल्पना केली आहे. सूर्या-संबंधींच्या या सर्व कल्पना आपण नीट समजावून घेतल्या पाहिजेत.

त्याचप्रमाणें रथसप्तमीच्या दिवशीं सूर्योपासना करण्याचा एक विशिष्ट प्रकारचा विधि आहे. तो देखील आपण समजावून घेतला पाहिजे. रथ-सप्तमीच्या आधल्या दिवशीं भाविक लोक उपवास करतात. त्यानंतर रथ-सप्तमीच्या दिवशीं भल्या पहाटेस उठून ते डोक्यावर दीप धारण करून नदीवर जातात. तेथें सूर्योदयापर्यंत स्नान केल्यानंतर ते दीप विसर्जन करून घरीं परत येतात. घरीं आल्यानंतर तुळशीवृंदावनासमोर रांगोळी काढून त्यावर पाट ठेवतात. या पाटावर ते तांबड्या रंगानें सात घोड्यांचा रथ काढतात. या रथावर अरुण व सूर्य यांचीं चित्रें काढून ते त्यांस

तांबडे गंध व फुलें अर्पण करून पूजा करतात. सूर्याला नैवेद्य दाखविण्या-साठीं या दिवशीं खीर करतात. सायंकाळीं स्त्रिया हळदीकुंकवाचा समारंभ करतात.

याशिवाय सूर्योपासना करण्याचा अलीकडे सर्वमान्य असा एक वेगळा प्रकार आहे. तो म्हणजे सूर्यनमस्काराचा. भल्या पहाटेस उठून सूर्यास निदान १२ तरी साष्टांग नमस्कार घालण्याचा अनेक लोकांचा शिरस्ता असतो. त्यामुळें शरीरास व्यायाम घडून प्रकृति निकोप राह-ण्यास व आयुष्य वाढण्यास मदत होते. सूर्यनमस्कार घालतांना प्रत्येक नमस्काराच्या वेळीं सूर्याच्या वेगवेगळया नांवांचा उच्चार करावयाचा असतो. सूर्याचीं हीं १२ नांवें येणेंप्रमाणें आहेत:-( १ ) मित्र ( २ ) रवि ( ३ ) सूर्य ( ४ ) भानु ( ५ ) खग ( ६ ) पूषन् ( ७ ) हिरण्यगर्भ ( ८ ) मरीचि ( ९ ) आदित्य ( १० ) सवितृ ( ११ ) अर्क व ( १२ ) भास्कर. सूर्याच्या या निरनिराळया नांवांचा अर्थ आपण नीटपणें समजावून घेतला पाहिजे. सूर्य हा आकाशांत सरकत असल्यामुळें त्याला हें नांव प्राप्त झालें आहे. तो सर्व जगाचा उपकारकर्ता असल्यामुळें त्याला मित्र म्हणतात. त्याच्या प्रकाशमानतेमुळें त्यास भानु व भास्कर अशीं नांवें प्राप्त झालीं आहेत. आकाशांत गमन करणारा म्हणून सूर्य खग आहे. तो जगाचें पोषण करतो म्हणून त्यास पूषन् असें नांव शोभून दिसतें. तो सहस्त्ररश्मी असल्यामुळें त्यास मरीचि असें म्हणतात. अदितीपासून त्याचा जन्म झाला म्हणून त्यास आदित्य असें नांव पडलें आहे. सर्व जगाचा जन्मदाता असल्यामुळें तो सवितृ ठरतो. सर्वांना वंदनीय अस-ल्यामुळें त्याला अर्क हें नामाभिधान शोभून दिसतें.

## समवाय

१. सूर्योपासनेचा इतिहास सांगून प्राचीन आर्यांच्या परमेश्वरासंबंधींच्या कल्पनांचीं माहिती द्या.

२. रथसप्तमीची कथा सांगा व भारतीय लोकांच्या कंबोडिया देशांतील वसाहतीची व यशोवर्मा राजाच्या कारकीर्दीची माहिती द्या.

३. सूर्याला जीवनदाता असें कां म्हणतात तें सांगा व सूर्यप्रकाशाऐवजीं जीवन कसें शक्य नाहीं तें पटवून द्या.

४. संध्याविधीचें महत्त्व पटवून द्या.

५. सूर्याच्या निरनिराळ्या नांवांचा अर्थ समजावून देऊन सूर्यनमस्काराचें महत्त्व पटवा.

६. सूर्यमालेविषयीं माहिती द्या.

# महाशिवरात्र



प्रत्येक महिन्यांतील वद्य चतुर्दशीस शिवोपासनेचा दिवस मानतात. या दिवसाला शिवरात्र असें म्हणतात. त्यांपैकीं माघ वद्य १४चा दिवस अधिक महत्त्वाचा मानला जातो. त्यामुळें त्याला 'महाशिवरात्र' असें म्हणतात. महाशिवरात्रीच्या दिवशीं शिवभक्त उपोषित राहून शिवलिंगावर अभिषेक करतात व लघुरुद्राचा जप करून त्यास बिल्वपत्रें अर्पण करतात. शिवोपासनेसाठीं सोमवाराचेंहि महत्त्व वर्णिलें आहे. त्यांपैकीं श्रावण महिन्यांतील सोमवार विशेष महत्त्वाचे मानले जातात. शिवाची उपासना सर्व वर्णांतील लोक सारख्याच भक्तिभावानें करतात.

महाशिवरात्रीच्या माहात्म्याची कथा मजेदार आहे. प्राचीन काळची गोष्ट. एकदां माघ वद्य १४ च्या दिवशीं एक व्याध शिकारीसाठीं रानांत जाण्यास निघाला. त्याला वाटेंत एक शिवाचें मंदिर आढळलें. त्या मंदिरांत कांहीं शिवभक्त शिवशंकराचा नामोच्चार करून त्याची भक्तिपूर्वक

आराधना करीत होते. तें दृश्य पाहून व्याधास मोठी गंमत वाटली. त्या शिवभक्तांची चेष्टा करण्यासाठीं पुढें तो ‘ शिव, शिव ’ असें म्हणतच आपला मार्ग आक्रमूं लागला. त्यामुळें त्यांजकडून नकळतच शिवोपासना घडूं लागली. असें करतां करतां अखेरीस तो एका तळ्याच्या कांठीं आला. तेथें एका बेलाच्या झाडावर तो शिकार करण्यासाठीं दबा धरून बसला. तथापि समोर पानांचें झुबके आल्यामुळें त्यास आपली शिकार नीट हेरता येईना. म्हणून तो आपल्या दृष्टीसमोर येणारीं बिल्वपत्रें तोडून खालीं टाकूं लागला. योगायोग असा कीं, त्या झाडाच्या खालीं शिवाची पिंडी होती. तिच्यावर हीं बिल्वपत्रें पडूं लागलीं. त्यामुळें त्या व्याधाकडून शिवाच्या पिंडीवर नकळतच बिल्वपत्रांचा अभिषेक घडूं लागला. इतक्यांत त्याला समोरून कांहीं हरीण पाणी पिण्यासाठीं तळ्याकडे येत असतांना दिसले. त्यासरशीं तो आपला तिरकामठा सज्ज करून शिकार टिपण्यासाठीं तयार झाला. त्यानें त्या कळपांतील एका हरिणीवर नेम धरला. तथापि त्या हरिणीस व्याधाच्या या हालचालीची चाहूल लागली. तेव्हां ती त्याला ओरडून म्हणाली, “ हे व्याधा, जरा थांब, इतक्यांतच तुझा तो प्राणघातक तीर माझ्यावर चालवूं नकोस. घरीं माझीं मुलेंबाळें वाट पाहात बसलीं आहेत. त्यांना मला एकदां भेटून येऊं दे. त्यानंतर तूं खुशाल माझे प्राण घे. ”

हरिणीची ती विनवणी ऐकून व्याध निर्दयपणें हसला व तिला म्हणाला, “ मोठी शहाणीच आहेस कीं तूं ! अशा रीतीनें माझ्या तावडींतून निसटून जाण्याचा प्रयत्न करतेस काय ? पण छे ! मी आतां तुझा घात केल्याशिवाय येथून हलणार नाहीं. घरीं माझीं मुलेंबाळें भुकेनें व्याकुळ झालीं आहेत. तुला सोडून मी त्यांना काय खायला घालूं ? ” व्याधाचे ते शब्द ऐकून ती हरिणी कळवळून म्हणाली, “ हे व्याधा, माझ्या शब्दावर विश्वास ठेव. मी मुलाबाळांस भेटून तुझ्याकडे निश्चित येतें. बाबारे,

तुला जशी तुझ्या मुलाबाळांची काळजी आहे, तशीच मरण्यापूर्वी मलाहि माझ्या मुलाबाळांची काळजी केली पाहिजे ना!" हरिणीची ती विनवणी ऐकून व्याधाचें मन द्रवलें. त्यानें तिला घरीं जाण्याची परवानगी दिली व रात्रीच्या वेळीं तो त्याच झाडावर तिच्या पुनरागमनाची वाट पाहात बसला. रात्रभर कांहींहि खावयास न मिळाल्यामुळें त्यास अनायासेंच उपवास घडला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं ती हरिणी आपल्या परिवारासह मृत्यूस कवटाळण्यासाठीं त्या तळयाच्या कांठीं आली. तें दृश्य पाहून तर व्याध चकितच झाला. रात्रभर घडलेल्या उपवासामुळें आतां त्याचा वृत्ति अंतर्मुख बनली होती. त्याला हरिणीच्या सचोटीचें कौतुक वाटलें. त्याच्या मनांत सद्भावना जागृत झाल्या. त्यानें हरिणीचा घात करण्याचा विचार सोडून दिला. त्यामुळें त्याजवर भगवान् शंकर प्रसन्न झाले व त्यांनीं त्या सर्वांना विमानांत बसवून स्वर्गांत नेलें. रात्रीच्या वेळीं आकाशांत दिसणारें मृग नक्षत्र तें हेंच. या मृग नक्षत्राशेजारींच व्याधाची चांदणी लुकलुकत असते. माहाशिवरात्रीच्या मांहात्म्यासंबंधीं दक्ष–प्रजापतीची कथाहि सांगण्यांत येते, तथापि या कथेचा उल्लेख पृष्ठ क्रमांक ९९ वर आलेला असल्यामुळें तिची पुनरुक्ति करण्याचें प्रयोजन नाहीं.

महाशिवरात्रीच्या निमित्तानें या कथा आपण नीट समजावून घेतल्या पाहिजेत. त्याचप्रमाणें शिवोपासनेची ऐतिहासिक पार्श्वभूमि देखील लक्षांत घेतली पाहिजे. शिवाचीं रुद्र, महादेव, शिव, शंकर इत्यादि विविध रूपें मानलीं जातात. प्राचीन काळापासून भारतवर्षांत शिवोपासना प्रचलित आहे. आर्यांच्या आगमनापूर्वीं येथील स्थानिक लोकांत तीं रूढ होतीं असें दिसतें. तथापि त्या वेळीं शिवोपासनेस लिंगपूजेचें स्वरूप प्राप्त झालें होतें. नवनिर्मितीचें व शक्तीचें प्रतीक म्हणून येथील आदिवासी जनांत ही लिंगपूजा रूढ झाली असली पाहिजे. सुसंस्कृत आर्यांना ती हीन वाटूं लागली व त्यांनीं या लिंगपूजेच्या पाठीमागील प्रबळ शक्तीचें महादेवांत

रूपांतर केलें. तेव्हांपासून आर्य लोकांतहि शिवोपासना रूढ झाली. शिव हा अग्निस्वरूप असल्यामुळें वैदिक काळीं त्याचा यज्ञांत अग्निरूपानें समावेश झाला व शंकराची पिंडी ही यज्ञवेदी ठरली. याप्रमाणें अनार्यांच्या देवतेनें आर्यांच्या देवतांत मानाचें स्थान मिळविलें. श्रीरामचंद्रानें केलेला शिवधनुर्भंग, शिवानें परशुरामास दिलेला परशु, अर्जुन व कर्ण यांना शिवानें दिलेलीं अस्त्रें या सर्वांत महादेवाच्या महाशक्तीचा वास दिसून येतो. महादेवाच्या ठिकाणीं प्रलयकारी प्रचंड शक्ति आहे. महादेवाच्या या शक्तिस्वरूपाला ‘ रुद्र ’ असें म्हणतात. शंकराची आराधना करतांना अर्जुन व कृष्ण यांनीं रुद्राच्या मंत्रांचाच उच्चार केलेला दिसतो. रुद्राच्या मंत्रोच्चारानें योगयाभ्यास करणें सुलभ जातें असें जाबाल उपनिषदांत म्हटलें आहे. रुद्राचा जप अकरा वेळां केल्यास त्यास एकादशणी अथवा लघुरुद्र असें म्हणतात. याप्रमाणें शतरुद्र, सहस्ररुद्र इत्यादींहि केले जातात. रुद्राच्या स्वरूपांत शक्तीची पराकाष्ठा समाविष्ट आहे. हेंच स्वरूप धारण करून शिवानें त्रिपुरासुराचा वध केला. या स्वरूपामुळेंच शिवास तेज, अग्नि व सूर्यहि मानतात.

परंतु याच रुद्राचें शिव–शंकर हें स्वरूप सौम्य व कल्याणकारी असतें. सूर्य हा दुपारच्या वेळीं रौद्र स्वरूप धारण करतो खरा. तथापि त्याचें सायंकाळचें स्वरूप सौम्यच असतें. शिवाची पूजा सायंकाळच्याच वेळीं केली जाते. युद्धाच्या रुद्र स्वरूपानंतर देखील स्वास्थ्याचें शिवस्वरूप येतें. शिवास उत्पत्तीचा त्याचप्रमाणें कल्याणकारी मृत्यूचाहि देव मानतात. अपमृत्यु येऊं नये यासाठीं रुद्राची उपासना करतात. रुद्र हा व्यवहारांत तारतम्यबुद्धि जागृत ठेवून न्याय्य लढ्यास प्रोत्साहन देतो; तर शंकर हा सर्वसंगपरित्याग करून भिक्षेकऱ्यांचा व विरक्तांचा राजा बनतो. अशा प्रकारें आपल्या धर्मांत निरनिराळया शिवस्वरूपांचें स्पष्टीकरण केलेलें आढळून येतें.

शिवोपासकांचा स्वतंत्र पंथ आहे, त्याला शैव असें म्हणतात. हिंदुस्थानांतील ८५ टक्के हिंदु शैवपंथी असावेत असा अंदाज आहे. त्यावरून शिवोपासनेच्या लोकप्रियतेची आपण कल्पना करावी. आपल्या महाराष्ट्रांत व कर्नाटकांत दिसून येणारे लिंगायत लोक हे वीरशैव पंथाचेच आहेत. ते आपल्या गळयांत जानव्याप्रमाणें शिवलिंग धारण करतात. त्यांच्या कपाळावर आपणांस शिवास प्रिय असलेल्या भस्माचे पट्टे दिसून येतात. या पंथाची स्थापना इ. स. च्या बाराव्या शतकांत बसवेश्वर यांनीं केली. महाशिवरात्रीच्या निमित्तानें आपण त्यांची व त्यांनीं स्थापना केलेल्या लिंगायत पंथाची माहिती मिळविली पाहिजे.

त्याचप्रमाणें काशीविश्वनाथ, त्र्यंबकराज, रामेश्वर, मल्लिकार्जुन, केदारेश्वर, महांकाळेश्वर, ओंकारेश्वर, घृणेश्वर, नागेश्वर, सोमनाथ, भीमाशंकर व वैजनाथ अशीं १२ ज्योतिर्लिंगें भारतांत प्रसिद्ध आहेत. त्यांचीहि आपण माहिती मिळविली पाहिजे.

## समवाय

१. महाशिवरात्रीच्या माहात्म्याच्या कथा सांगा व त्यांचें नाटयीकरण करून घ्या.
२. शिवोपासनेचा इतिहास सांगा.
३. बसवेश्वर व लिंगायत पंथ यांची माहिती द्या.
४. मृगनक्षत्राचें निरीक्षण करा.




हुताशनि अथवा होळीचा उत्सव फाल्गुन शु. १५ स साजरा करतात. त्यानंतर कृष्ण पंचमीपर्यंत निरनिराळे उत्सव साजरे केले जातात. या सर्व उत्सवांच्या पाठीमागें एकच मुख्य सुत्र आहे. या दिवसापासून आपल्या देशांत उन्हाळयास सुरुवात होते. त्याबरोबरच वसंताच्या आगमनानें सृष्टींत एक प्रकारचा मधुर उन्माद निर्माण झालेला दिसतो. त्यामुळें या दिवसांना वसंतोत्सवाचेंच स्वरूप प्राप्त झालें आहे. वास्तविक पाहतां वसंतोत्सव हा माघ शु. पंचमीस साजरा केला जातो. तथापि त्याचें खरें मनोहारी स्वरूप याच दिवसांत दिसून येतें.

उत्तरेकडील प्रांतांत या उत्सवाला कृष्णोत्सव असें म्हणतात. कारण या दिवशीं कृष्णास ठार मारण्यासाठीं कंसानें धाडलेल्या पूतना राक्षसीचा वध झाला असें मानतात. त्याचप्रमाणें ढुंढा नांवाची राक्षसी मुलाबाळांना सतत पीडा देत असते असाहि तिकडे समज आहे. त्यामुळें फाल्गुनी

पौर्णिमेस मोठा जाळ करून तिला हाकून लावण्याचा प्रघात आहे. रानांतील श्वापदांना पळवून लावण्यासाठीं अथवा त्यांना आपल्या वस्ती-पासून अलिप्त ठेवण्यासाठीं याच पद्धतीचा अवलंब केला जातो. आपल्या समाजांतील बालमृत्यूस कारणीभूत होणाऱ्या गोष्टी या ढुंढा राक्षसीच होत. त्यांना या दिवशीं आपण ज्ञानाच्या होळया पेटवून त्यांत जाळून टाकलें पाहिजे. या दृष्टीनें होळीच्या निमित्तानें समाजशिक्षणाच्या अथवा लोकशिक्षणाच्या कार्यास आरंभ करणें उचित होईल. या दिवशीं बाल-मृत्यूची कारणमीमांसा करून ते टाळण्यासाठीं शिशुसंगोपन, बालरोग-चिकित्सा व प्रसूतिचिकित्सा इत्यादि गोष्टींचें ज्ञान देण्याचा प्रयत्न झाला पाहिजे.

होलिकोत्सवासंबंधानें आणखी एक कथा प्रचलित आहे. प्राचीन काळीं तारकासुर फार माजला होता. त्याला ठार मारण्याचें कार्य फक्त शंकराच्या पुत्राकडूनच होईल असा देवादिकांचा समज होता. तथापि शंकरास तर पुत्र नव्हता. तो पडला विरक्त ! त्याला पुत्र होण्याचीं चिन्हेंहि दिसेनात. तेव्हां देवांनीं शंकरावर शरसंधान करण्यासाठीं मदनास पाठविलें. मदन आपल्या कामशरानें शंकरास विद्ध करण्यासाठीं त्याजकडे गेला. तथापि त्याला पाहतांच शंकराचा राग अनावर झाला व त्यानें त्याला तात्काळ भस्म करून टाकलें. त्यामुळें दक्षिणेंत या उत्सवाला कामदहनाचा दिवस मानतात. या कथेनुसार आपण होलिकोत्सवांत होळया पेटवून जणु कामातिरेकाचा संहारच करतो. कामातिरेकामुळें शारीरिक व मानासिक दौर्बल्य प्राप्त होतें. त्यामुळें या उत्सवांतील मर्म लक्षांत घेण्यासारखें आहे.

होलिकोत्सवाच्या उत्पत्तीची ऐतिहासिक कथा अशी आहे. अतिप्राचीन काळीं आर्य लोक उत्तर ध्रुवप्रदेशांत राहात असत. या प्रदेशांत सहा महिन्यांचा दिवस व सहा महिन्यांची रात्र असते. त्यामुळें दिवस संपून रात्र झाली कीं, तेथें काळोखाचें गाढ साम्राज्य पसरतें. तें या आर्य

लोकांना अगदीं असह्य होऊन जाई. पुढें सहा महिनेपर्यंत त्यांना सूर्याची वाट पाहात बसावें लागे. अंधाराचें राज्य संपून सूर्योदय झाला कीं, हे लोक बेहोष होऊन नाचूं, बागडूं लागत. यापुढें सूर्याची आठवण कदापिहि बुजूं न देण्यासाठीं ते सतत अग्नि पेटवून ठेवीत. याच अग्नीचें प्रतीक म्हणून हिंदु लोकांत होलिकोत्सवाची प्रथा रूढ झाली असावी असेंहि मानलें जातें.

तथापि या उत्सवास अलीकडे बरेंच बीभत्स स्वरूप प्राप्त झालें आहे. होलिकोत्सवाच्या निमित्तानें सभ्यतेचे सर्व बंध सैल करून अश्लीलतेची परमावधि गाठणें हेंच जणु या सणाचें मर्म आहे असें मानलें जातें. सुदैवानें या समाजविघातक गोष्टीस आतां सरकारनेंहि बराच आळा घातला आहे व समाजसेवकांनींहि जनतेस ज्ञानवंत बनवून सभ्यतेच्या मर्यादांचें उल्लंघन न करण्याबद्दलचें शिक्षण दिलें आहे. तथापि या दृष्टीनें अद्यापि किती तरी कार्य व्हावयाचें आहे. म्हणूनच या दिवसांत गांवोगांवीं सभा घेऊन तेथील लोकांना या उत्सवांचें खरें रहस्य समजावून दिलें पाहिजे. या दिवशीं मुलें होळीच्या प्रकाशांत आट्यापाट्या व हुतुतु यां-सारखे खेळ खेळतात; ही गोष्ट योग्य आहे. त्यामुळें या दिवसांत शाळांतून शारीरिक खेळांच्या चढाओढी घेण्याचीहि प्रथा पडलेली दिसते. ती उत्तम आहे. अशा रीतीनें मुलांच्या ठिकाणीं असलेल्या शक्तीस योग्य वळण लावण्याचें कार्य या दिवसांत झालें पाहिजे. होलिकोत्सवानंतर रंगपंचमीपर्यंतच्या दिवसांत या गोष्टींकडे विशेष लक्ष देणें जरूरीचें आहे. पूर्वीं रंगपंचमीच्या दिवशीं राजे लोक दरबार भरवून महत्त्वाच्या कार्यास प्रारंभ करीत, ही गोष्ट आपण लक्षांत घेतली पाहिजे. या दिवसांत धुळवड खेळून अथवा रंग उडवून कपड्यांचा नाश करणें उचित होणार नाहीं. आपल्या देशांत कपड्यासारख्या जीवनास आवश्यक अशा गोष्टींच्या उत्पादनाचें प्रमाण बरेंच कमी असल्यामुळें समाजास त्याची जाणीव करून देणें सर्वथा योग्य होईल.

या दिवसांत नाच, गाणीं, तमाशे वगैरे करण्याचीहि ठिकठिकाणीं प्रथा आहे. या विलासांच्या पायीं पैशाची उधळपट्टी होते व त्यापासून कोणत्याहि प्रकारचा बोध मिळत नाहीं. उलटपक्षीं त्यापासून कुमार्गास लागण्याची भीतीच फार असते. त्यामुळें अशा तऱ्हेचे विलासी प्रकार आतां बंद झाले पाहिजेत. त्याऐवजीं राष्ट्रयि सेवादलाच्या कलापथकांनीं तयार केलेल्या उद्बोधक तमाशांचे कार्यक्रम ठेवणें मनोरंजनाच्या दृष्टीनेंहि अधिक योग्य होईल. या दिवसांत कर्नाटक, कोंकण व गोवा इत्यादि प्रांतांत लोकांचे मेळे टिपऱ्या व वाद्यें वगैरे घेऊन घरोघर नाच-गाणीं करीत हिंडत असतात. उत्तरेकडील प्रदेशांत या दिवसांत लोकनृत्यें करण्याची प्रथा आहे. हीं नृत्यें कृष्णाच्या रासलीलेची आठवण करून देतात. एकंदरीनें पाहतां या उत्सवांतील अश्लीलतेचा भाग काढून टाकल्यास कलोपासनेस, मनोरंजनास व ज्ञानार्जनास हा उत्सव सर्वस्वीं उपयुक्त असाच ठरेल. त्याचप्रमाणें या दिवशीं प्रत्येक शाळेंत बालवीर पथकाची स्थापना करून शेकोटीचा कार्यक्रम केल्यानें अधिक भरीव कामगिरी केल्यासारखें होईल.

## समवाय

१. आर्यांच्या प्राचीन वसाहतींची माहिती द्या.
२. होलिकोत्सवाच्या कथा सांगा.
३. बालमृत्यूची कारणमीमांसा करून त्याबाबत समाजास ज्ञान देण्याच्या योजना आखा.
४. वसंत ऋतूसंबंधींच्या वर्णनपर कविता शिकवा.
५. श्री. कृ. कोल्हटकर यांचा 'पांचजन्याचा हंगाम' हा धडा शिकवा.
६. खेळांच्या शर्यती घ्या.
७. बालवीर पथकाची स्थापना करून शेकोटीचा कार्यक्रम करा.
८. शाळेंतील मुलांचें कलापथक स्थापन करून त्यामार्फत शेजारच्या खेडेगांवांतलि जनतेचें उद्बोधक मनोरंजन होईल असे कार्यक्रम तयार करा.

# पारशांचे सण



आपल्या देशांत पारशी धर्माचे अनेक लोक आहेत. त्यांची लोकसंख्या भारताच्या लोकसंख्येच्या मानानें बरीच कमी असली, तरी पारशी लोकांचा हा मूठभर समाज आपल्या शिक्षणाच्या व संस्कृतीच्या बळावर आज या देशांत मानाचें स्थान पटकावून बसला आहे. या समाजांतील लोकांनीं आपल्या मायदेशाची अनन्यभावें सेवा केली आहे. त्यामुळें त्यांच्या संस्कृतीचीं व धर्माचीं वैशिष्ट्यें समजावून घेणें हें आपलें कर्तव्य ठरतें. कोणत्याहि धर्माची संस्कृति ही त्या धर्मानें पुरस्कारिलेल्या सणांत व उत्सवांत साठविल्याचें आढळून येतें. त्या दृष्टीनें पारशी लोकांच्या सणांची व उसत्वांची माहिती मिळविणें बरेंच बोधप्रद होईल. परंतु ही माहिती मिळविण्यापूर्वीं आपणांस या धर्माच्या स्थापनेचा, त्याच्या विकासाचा व त्यानें प्रतिपादन केलेल्या तत्त्वज्ञानाचा परामर्श घेणें आवश्यक आहे.

पारशी धर्माची स्थापना इ. स. पूर्वीं सातव्या शतकांत झाली. इराण देश हा या धर्माचें मूळ उगमस्थान असून झरतुष्ट्र हा त्याचा संस्थापक

होय. झरतुराष्ट्राचा जन्म इ. स. पूर्वी ६६० साली झाला. झरतुष्ट्र मोठा बुद्धिवान् होता. बाळपणापासूनच तो धार्मिक वृत्तीचा होता. त्यामुळे त्यानें धर्मशास्त्राचा बराच अभ्यास केला. अध्ययनसमाप्तीनंतर झरतुष्ट्रानें अहुर बुझीन मेहेर या नांवाचा अग्नि आणला. कालांतरानें त्याला अहुर मझ्दाचा साक्षात्कार झाला. तेव्हांपासून त्यानें अहूर मझ्दाच्या उपासनेचा प्रचार केला. पृथ्वीचा निर्माता व पालनकर्ता हा अहुर मझ्दच असून आर्हिमन् हा त्याचा शत्रु आहे, असें झरतुष्ट्रानें प्रतिपादन केलें. आपल्या धर्मांतील सुर व असुर यांचेच हे दोघेहि प्रतिनिधि दिसतात. त्यांत थोडी उलटापालट मात्र झालेली दिसते. आपण असुर हे दुष्ट व दुराचारी मानतों, तर पारशी लोक असुरांच्या ठिकाणीं देवपण पाहतात. पारशांची देवता अहुर मझ्द यांतील अहुर हा शब्द देखील असुर या शब्दापासूनच बनलेला आहे. अर्थात् पारशी लोकांची अहुर मझ्द ही देवता मात्र सात्त्विक आहे. आपण देवादिकांच्या ठिकाणीं जे गुण मानतों ते सर्व या देवतेच्या ठिकाणीं दिसून येतात. हिंदु धर्मांतील कांहीं कल्पनांशीं पारशी धर्म-कल्पनांचें साम्य दिसून येतें. याचें कारण असें कीं, पारशी लोक हे देखील मूळचे आर्यच होत. उत्तर ध्रुवप्रदेशाकडून भटकत भटकत आर्य लोक इराण देशांत आले. तेव्हां त्यांच्यापैकीं कांहीं लोक तेथें स्थाइक झाले व कांहीं हिंदुस्थानांत आले. त्यामुळें इराण देशांतील या लोकांत इंद्र, वरुण, मित्र, अग्नि, इत्यादि देवतांच्या पूजेची प्रथा स्वाभाविकपणेंच रूढ होती. या धर्मकल्पनांस विशिष्ट वळण देऊन झरतुष्ट्रानें नवीन धर्माची स्थापना केली. त्यामुळें त्यास पारशी धर्माचा संस्थापक मानतात. झरतुष्ट्र अहुर मझ्दाच्या ठिकाणीं ( १ ) बोहुमन ( चांगलें मन ) ( २ ) श्रद्धा ( ३ ) उत्तम पदार्थांचें वैपुल्य ( ४ ) आरोग्य ( ५ ) अमृतत्व व ( ६ ) सत्य या षड्गुणांचा वास आहे असें मानतो. त्यामुळें त्यानें आपल्या धर्मांतील लोकांस संसारांत राहून उद्योग करणें, दुसऱ्याच्या उपयोगी पडणें, दुःखाशीं

झगडणें, लोकसेवा व शेती करणें इत्यादि गोष्टींचा उपदेश केला आहे. मनुष्य आपल्या सत्कृत्यानें स्वर्ग व नरक यास जोडणारा चिन्वद् पूल उतरून जातो असें पारशी लोक समजतात.

झरतुष्ट्राचा हा उपदेश 'अवेस्ता' या धर्मग्रंथांत लिहून ठेवला आहे. हा ग्रंथ पहेलवी भाषेंत लिहिला असून या भाषेचें संस्कृत भाषेशीं बरेंच साम्य आढळून येतें. अवेस्ता ग्रंथाचे मूळ २१ भाग होते. त्या निरनिराळया भागांत धर्म, वैद्यक, वनस्पति व शास्त्र इत्यादि अनेक गोष्टींची उपयुक्त अशी माहिती दिलेली होती. तथापि त्यांपैकीं आतां फक्त 'वंदिदाद' या नांवाचा १९ वा ग्रंथच तेवढा उपलब्ध आहे. या ग्रंथांत पारशी लोकांच्या व्रतवैकल्यांची माहिती दिलेली आहे. त्याचप्रमाणें शत्रूच्या व भूतपिशाच्चांच्या विरुद्ध उपयोगांत आणावयाच्या मंत्रांचा व निरनिराळया आचारधर्मांचा त्यांत समावेश आहे. याशिवाय पारशांचे यस्न, वीस्परद् व खोर्दे अवेस्ता इत्यादि धर्मग्रंथ आहेत. त्यांपैकीं यस्न (यज्ञ) या ग्रंथांत यज्ञाच्या वेळीं उच्चारावयाच्या मंत्रांचा उल्लेख आहे. वीस्परदे या ग्रंथांत ऋतूंच्या उपासनेचे मंत्र दिले आहेत व खोर्दे अवेस्ता या ग्रंथांत मूळ अवेस्ता ग्रंथांतील महत्त्वाचे उतारे दिले आहेत. पारशांचें मुख्य व्रत 'नवजोत' हें आहे. हें व्रत वयाच्या सातव्या वर्षापासून तों १५ व्या वर्षापर्यंतच्या काळांत करावयाचें असतें. आपणाकडील मौंजीबंधनासारखेंच हें व्रत आहे. या व्रतानुसार पारशी बटु सद्रा व कस्ती परिधान करतो. कस्ती हा ७२ पदरांचा धागा असतो. यस्न ग्रंथाच्या ७२ विभागावरून हा आकडा घेतलेला आहे. या कस्तीला पुढें दोन व मागें ४ गांठीं असतात व तिला कमरेभोवतीं तीन वेळसे घेऊन बांधतात. सद्वर्तन, सद्विचार व मधुर भाषण इत्यादि गोष्टींची आठवण ठेवण्यासाठीं कस्तीचा फार उपयोग होतो. कस्ती धारण करण्याच्या या विधीपासून बटूला सर्व प्रकारचे धार्मिक विधि करण्याचा अधिकार प्राप्त होतो. हा विधि मुलगे व मुली या दोहोंसाठीं सांगितलेला आहे.

पारशी लोक नवरोज, पपेटी, खोर्दाद साल, मुक्ताद इत्यादि सण साजरे करतात. नवरोज हा त्यांचा नूतन वर्षारंभदिन होय. हे लोक ३० सावन दिवसांचा एक महिना व अशा १२ महिन्यांचें एक वर्ष मानतात. त्यामुळें पारशी कालगणनेनुसार ३६० दिवसांचें वर्ष होतें. सौर कालगणनेनुसार हें वर्ष पुरें करण्याकरितां ते वर्षाच्या शेवटीं ५ दिवस राखून ठेवतात. त्यांना गाथा असें म्हणतात. पारशी महिन्यांचीं नांवें अनुक्रमें (१) फर्वर्दीन (२) अर्दीबेहस्त (३) खोर्दाद (४) तीर (५) अमर्दाद (३) शेहरेवार (७) मेहेर (८) अबान (९) आदर (१०) दय (११) बहमन व (१२) इस्पिंदार अशीं आहेत. महिन्यांतील प्रत्येक दिवसाला स्वतंत्र नांव असून त्याचें वैशिष्ट्य सांगितलेलें असतें. याशिवाय पारशी लोक पपेटीचा सण साजरा करतात. पारशी वर्षाच्या अखेरीस असलेल्या गाथा' च्या समाप्ती-नंतर सहाव्या दिवशीं अहुर मझ्दानें विश्वाची उत्पत्ति केली असें पारशी लोक मानतात. त्याची आठवण म्हणून ते हा सण साजरा करतात. याच दिवशीं पूर्व इराणच्या राजा गुस्तास्प यानेंहि पारशी धर्माचा स्वीकार केला असें मानलें. जातें. पारशी लोकांच्या नूतन वर्षारंभास हल्लीं सप्टेंबर महिन्यापासून सुरुवात होते. याशिवाय जमशेट बादशहानें ता. २१ मार्चपासून जमशेदी नवरोजहि सुरू केला आहे. खोर्दाद साल हा सण फर्वर्दीन महिन्याच्या ( ६ व्या ) खोर्दाद दिवसाला साजरा करतात. या दिवशीं आदिमानव गयोमर्द याचा जन्म झाला असें मानतात. झरतुराष्ट्राचा जन्म देखील याच दिवशीं झाला असें मानलें जातें. त्याशिवाय शेवटच्या महिन्यांतील अखेरच्या दिवसांना हे लोक श्राद्धदिन मानतात. श्राद्ध-विधीला ते मुक्ताद असें म्हणतात. या सर्व सणांच्या दिवशीं पारशी लोक एकत्र जमून प्रार्थना, भोजन व दानधर्म इत्यादि गोष्टी करतात.

पारशी लोक अग्निपूजक आहेत. त्यांच्या मंदिरांतील पवित्र अग्नीस ते आतश बेहेराम, आतश अद्रान अथवा अग्यारी असें मानतात. मंदिरांतलि

अग्नीची व्यवस्था ठेवण्यासाठीं व धार्मिक विधि सांगण्यासाठीं धर्मगुरूंची योजना केलेली असते. त्यांना दस्तुर असें म्हणतात. त्यांना धार्मिक गोष्टींचें शिक्षण दिलें जातें. हे लोक निरानिराळया कुटुंबांतील कुलाचार सांभाळतात. त्याशिवाय समाजाचे व्यवहार सुरळीत चालण्यासाठीं जात-पंचायत असते. या पंचायतींत धर्मगुरु व इतर लोकांचा समावेश केला जातो. पारशी लोक मृतास जाळीत नाहींत अगर पुरीत नाहींत. ते प्रेतास दोख्मा नांवाच्या ठिकाणीं ठेवून त्यास गिधाडांकडून खाववितात.

पारशी लोकांच्या या सणांच्या निमित्तानें आपण त्यांच्या हिंदुस्थानांतील आगमनाचा व येथील प्रगतीचा इतिहासहि पाहणें बरेंच मनोरंजक होईल. पारशी लोक मूळचे इराण देशांतील राहिवासी होत. त्यांच्या इतिहासाला इ. स. पूर्वी ५५८ सालापासून सुरुवात होते. येथें अनेक पराक्रमीराजे होऊन गेले. त्यांपैकीं इ. स. पूर्वीं ५२२ सालीं दरायस हा गादीवर बसला. दरायसनें इ. स. पूर्वीं ५१६ सालीं सिंधु नदीच्या तीरावरील प्रदेशावर स्वारी केल्याचें इतिहासांत नमूद आहे. इ. स. पूर्वीं ३३१ सालीं ग्रीक लोकांनीं इराण देश जिंकला. तथापि इ. स. २५५ सालीं इराणी लोकांनीं तेथें आपली सत्ता पुन्हां प्रस्थापित केली. ही सत्ता इ. स. ६५० पर्यंत अबाधित राहिली. त्यानंतर या देशावर अरब लोकांनीं स्वारी करून आपली सत्ता प्रस्थापित केली.

अरबी मुसलमानांच्या कारकीर्दींत पारशी लोकांवर बराच जुलूम झाला. त्या जुलमास कंटाळून अखेरीस त्यांपैकीं कांहीं लोक इराणच्या आखातांतून हिंदुस्थानांत आले. येथें आल्यानंतर २० वर्षेपर्यंत त्यांचें वास्तव्य दीव बेटांतच होतें. त्यानंतर ते संजाण बंदरीं आले. तेथें त्या वेळीं जदुराणा या नांवाचा राजा राज्य करीत होता त्याजकडे ते आसरा मागण्यासाठीं गेले. आपण हिंदु लोकांप्रमाणेंच गोमूत्रपान करणारे व कस्ती धारण करून अग्निपूजा करणारे लोक आहोंत असें त्यांनीं जदुराणास पटवून दिलें. जदुराण्यालाहि या पीडित लोकांची दया आली. त्यानें या लोकांना

संजाण बंदरीं राहण्याची परवानगी दिली. तथापि असें करतांना त्यांनीं (१) गुजराथी भाषा स्वीकारावी, (२) स्त्रियांनीं हिंदु पद्धतीचा पोशाख करावा व (३) विवाहविधि रात्रीं करावेत अशा त्यानें तीन अटी घातल्या. पारशी लोकांनीं त्या अटी मान्य केल्या व ते संजाण बंदरीं राहूं लागले.

याप्रमाणें संजाण येथें राहूं लागल्यानंतर त्यांनीं इ. स. ७२१ सालीं संकटमुक्त झाल्याबद्दलचा नवस फेडण्यासाठीं अग्निपूजा सुरू केली. हे लोक संजाण येथें एकंदर ३०० वर्षे राहिले. तेथें ते शेतीचा व्यवसाय करीत. तथापि हळूहळू संजाण येथें त्यांची लोकसंख्या जसजशी वाढूं लागली तसतसें त्यांना केवळ शेतीवर उदरनिर्वाह करणें अशक्य झालें. त्यामुळें त्यांपैकीं बरेच लोक स्थलांतर करून खंबायत, सुरत, ठाणें, अंक्लेश्वर इत्यादि ठिकाणीं वस्ती करून राहूं लागले.

इ. स. १४९० सालीं मुसलमानांनीं संजाण बंदर जिंकल्यानंतर पारशी लोकांनीं तेथून आपला पवित्र अग्नि अनुक्रमें नवसारी, बलसाड व उदवाडा येथें आणून ठेवला. या सर्व मुदतींत त्यांनीं शेतीशिवाय करवसुली करणें, मलबारी सागवानी लाकडाचा पुरवठा करणें, सैन्याची ने-आण करणें, गाड्या व नोकर यांचा पुरवठा करणें, विणकाम व सुतारकाम करणें इत्यादि प्रकारचीं अनेक कामें केलीं. इ. स. १७३५ सालीं मुंबई येथें गोदी बांधण्यासहि त्यांनीं मदत केली. इ. स. १६७१ च्या सुमारास हे लोक मुंबईस आले व त्यांनीं व्यापारास सुरुवात केली. येथून पारशी व्यापारी चीन, ब्रह्मदेश व अबरस्तान इत्यादि देशांत जाऊन व्यापार करीत. पारशी लोकांचा हा व्यापार अल्पावधींतच भरभराटीस आला. आजहि पारशी लोकांची व्यापारांतील धडाडी विस्मयकारक आहे. व्यापारी पेशामुळें हे लोक बरेच सधन झाले आहेत. त्यामुळें त्यांच्यांत शिक्षणाचा व सुधारणेचा प्रसारहि फार झपाट्यानें झाला आहे. या लोकांपैकीं सर जमशेटजी टाटा यांसारखे कारखानदार व दादाभाई नौरोजी यांसारखे अनेक देशभक्त सुप्रसिद्ध

आहेत. हे लोक बरेच दानशूर असून समाजोपयोगी कार्यासाठीं सढळ हातानें मदत करतात. पारशी लोकांच्या उदार देणगीखालीं अनेक शैक्षणिक संस्था, दवाखाने व धर्मशाळा आपलें कार्य करीत आहेत. पारशी सणांची माहिती मिळवितांना आपण या सर्व गोष्टींकडे योग्य तें लक्ष दिलें पाहिजे.

## समवाय

१. झरतुष्ट्राच्या चरित्राचें कथन करून पारशी धर्मतत्त्वांची ओळख करून द्या.

२. हिंदु व पारशी लोकांतील कोणत्या धर्मकल्पनांत साम्य दिसून येतें तें दाखवा व तें तसें कां दिसतें याचीं कारणें सांगा.

३. पारशी लोक हिंदुस्थानांत केव्हां व कां आले तें सांगून त्यांचा या देशांतील इतिहास सांगा.

४. पारशी लोकांच्या राष्ट्रीय, औद्योगिक व सामाजिक कार्यांची ओळख करून द्या.

५. 'मानवतेचे पुजारी' भाग १ व 'आशियाचे धर्मदीप' या पुस्तकांतील झरतुष्ट्राचीं चरित्रें वाचा.

# मुसलमानांचे सण



आपल्या देशांत हिंदुधार्मियांच्या खालोखाल इस्लामधर्मियांची संख्या मोठी आहे. इस्लाम धर्माचा उदय अरबस्तानांत झाला. हजरत महंमद पैगंबर हे या धर्माचे प्रवर्तक होत. हजरत महंमद पैगंबरांच्या वेळीं अरबस्तानांतील लोकस्थिति अत्यंत बिकट होती. अरबस्तान हा वालुकामय प्रदेश असल्यामुळें तेथील जीवन बरेंच कष्टाचें आहे. या देशांतील बहुसंख्य लोकांचें जीवन भटकेगिरीचें असतें. त्यामुळें त्यांना शिक्षणाचा व संस्कृतीचा फारसा संपर्क पोहोंचत नाहीं. महंमदाच्या काळीं अरबस्तानांतील लोक आपसांत झगडून रक्तपात करीत. जुगार खेळणें, मद्यपान करणें, स्त्रियांवर जुलूम करणें, हत्या करणें इत्यादि गोष्टी त्यांच्यांत सर्रास रूढ होत्या. देवधर्माच्या बाबतींत त्यांचें कोणत्याहि प्रकारचें निश्चित असें तत्त्वज्ञान नव्हतें. ही स्थिति पाहून महंमदानें त्यांना उपदेश करण्यास सुरुवात केली. महंमद मक्केचा रहिवाशी असल्यामुळें तेथें त्यानें स्वमतवादी लोकांचा पंथ काढला. त्यास 'इस्लाम' ही संज्ञा प्राप्त झाली. तत्कालीन

अरबांनीं इस्लामधर्मियांचा अतोनात छळ केला. स्वतःस परमेश्वराचे दूत म्हणविणाऱ्या महंमदाची त्यांनीं टिंगल उडविली. तथापि महंमदानें आपलें कार्य चालू ठेवलें. अखेरीस इ. स. ६२२ सालीं महंमदास मक्कावासियांच्या जाचास कंटाळून तेथून पळून जावें लागलें. मुसलमान लोक या पलायनाच्या सनास फार महत्त्व देतात. तेथपासून मुसलमानांच्या कालगणनेस सुरुवात होते. मुसलमानांच्या या कालगणनेस 'हिजरी सन' असें म्हणतात. महंमदाच्या पलायनाची वेळ सायंकाळची असल्यामुळें त्यांच्या नव्या दिवसाला सूर्यास्तापासून प्रारंभ होतो. मुसलमान लोक चांद्रवर्ष मानतात. त्यामुळें त्यांचे महिने दरवर्षी वेगवेगळ्या ऋतूंत येतात. त्यांच्या महिन्यांचीं नांवें अनुक्रमें (१) मोहरम (२) सफ्फर (३) रबिउल अव्वल (४) रबिउल् आखर (५) जमा दिलअव्वल (६) जमा दिलआखर (७) रज्जब (८) साबान (९) रमजान (१०) सव्वाल (११) जिल्काद् व (१२) जिल्हज अशीं आहेत. त्यांपैकीं ७, ११ व १२ हे महिने विशेष पवित्र मानले जातात.

मक्केहून पळून गेल्यानंतर महंमद मदिना येथें राहूं लागला. तेथील लोकांना महंमदाचा उपदेश आवडूं लागला. महंमदावर त्यांची भक्ति जडली. त्यामुळें पुढें महंमद मदिनेचा सत्ताधारी झाला. असें झालें तरी महंमदाच्या मागील मक्कावासियांचा छळ अद्याप फारसा कमी झाला नव्हता. त्याकरितां महंमदानें शस्त्र धारण केलें. महंमदाच्या धर्माचा विस्तार पुढें झपाट्यानें होत गेला. इ. स. ६३२ साली महंमद पैगंबरवासी झाला.

महंमद पैगंबारानें प्रस्थापित केलेल्या धर्माचा प्रसार इराण, तुर्कस्तान अफगाणिस्तान, मध्य आशिया, ईजिप्त, स्पेन, इटली, रशिया, बाल्कन द्वीपकल्पें इत्यादि देशांत फार झपाट्यानें झाला. इ. स. च्या सातव्या शतकानंतर इस्लामधर्मीय तुर्क, अरब व मोंगल लोक हिंदुस्थानावर स्वाऱ्या करूं लागले. इ. स. ७१२ सालीं महंमद बीन कासीम यानें सिंध प्रांतावर

स्वारी करून तो भाग काबीज केला. त्यानंतर गझनीच्या महंमदानें हिंदुस्थानवर स्वाऱ्या करून येथील अगणित संपत्ति लुटली. तथापि येथें मुसलमानांची स्थिर अशी राजसत्ता निर्माण झाली नाहीं. शहाबुद्दीन घोरीनें पृथ्वीराज चव्हाणाकडून दिल्ली जिंकली. तेव्हांपासून हिंदुस्थानांत मुसलमानी सत्ता वाढत गेली. तथापि एतद्देशीय रजपूत लोकांनीं मुसलमानांस कसून विरोध केल्यामुळें तिला विशेष स्थिरत्व प्राप्त झालें नाहीं. इ. स. १५२६ सालीं बाबरानें पानिपतची पहिली लढाई जिंकली. तेव्हांपासून मुसलमानांची सत्ता येथें स्थिर व दृढमूल झाली. हिंदु व मुसलमान या दोन्ही संस्कृतींचा जवळचा संबंध आला. परस्परांत आचार-विचारांची देवाण–घेवाण झाली. मुसलमानी सत्तेमुळें येथें इस्लामधर्माचा भरपूर प्रसार झाला. इतका कीं, या देशांत आज हिंदूंच्या खालोखाल मुसलमानांची लोकसंख्या आहे. या दोन जमातींत कित्येक वर्षें सलोखा नांदला तथापि ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या ‘ फोडा व झोडा ’ या धोरणामुळें पुढें त्यांच्यांत मतभेद वाढत गेले. पाकिस्तानची निर्मिति ही त्या मतभेदांचें अंतिम फळ होय.

पाकिस्तान स्वतंत्र झालें तरी बरीचशी मुसलमान जनता अद्यापि आपल्या भारतांत राहात आहे. भरतभूमीबद्दल त्यांच्या मनांत आदर आहे. अशा स्थितींत आपण त्यांचीं मनें समजावून घेतलीं पाहिजेत. त्यांच्या संस्कृतीचीं वैशिष्ट्यें लक्षांत घेतलीं पाहिजेत. त्यांचीं धर्मतत्त्वें जाणून घेतलीं पाहिजेत. त्यामुळें या दोन जमातींत स्नेहभाव व सलोखा नांदून आपल्या देशांत शांति व शक्ति निर्माण होण्यास मदत होईल.

इस्लाम धर्माची (१) कलेमा (२) नमाज (३) रोजा (४) जकात व (५) हज्ज अशीं पांच मुख्य तत्त्वें आहेत. मुसलमान लोक विश्वाचा नियंता असा एकच परमेश्वर मानतात. तो परम कनवाळु असून अपराध्यास कडक शासन करतो अशी त्यांची श्रद्धा आहे. आपल्या सद्वर्तनानें त्यास संतुष्ट केल्यास स्वर्गप्राप्ति होते, असा त्यांचा समज आहे.

मुसलमान लोक पुनर्जन्म मानीत नाहींत. जगाच्या अंताच्या वेळीं परमेश्वर सर्व लोकांच्या पापपुण्याचा न्यायनिवाडा करून त्यांस आपापल्या कर्मानुसार स्वर्ग अगर नरकाचा धनी ठरवितो असें ते मानतात. इस्लाम धर्मांतलि या एकेश्वरतत्त्वास ‘ कलेमा ’ असें म्हणतात. दिवसांतून पांच वेळां—पहाटे, माध्यान्हीं, दोन प्रहरीं, सायंकाळीं व रात्रीं—परमेश्वराची प्रार्थना करणें हें इस्लाम धर्माचें दुसरें तत्त्व होय. यास ‘ नमाज ’ असें म्हणतात. नमाजाच्या वेळीं हातपाय धुऊन मक्केकडे तोंड करून बसावयाचें असतें. ही प्रार्थना सर्वांनीं एकत्र जमून मशिदींत करावी. इस्लाम धर्माचें तिसरें तत्त्व ‘ रोजा ’ हें आहे. या तत्त्वानुसार मुसलमान लोक आत्मशुद्धीसाठीं वर्षांतून एकदां तरी उपवास करतात. रमजान महिन्यांतलि दिवसांत हें रोजाचें तत्त्व इस्लामधर्मीय लोक अत्यंत कसोशीनें पाळतात. इस्लाम धर्मांत गोरगरिबांच्या मदतीसाठीं उत्पन्नाच्या ४% हिस्सा कर म्हणून द्यावा असें सांगितलें आहे. या तत्त्वास ‘ जकात ’ असें म्हणतात. या जकातींतून गोरगरिबांच्या अन्नवस्त्राची व शिक्षणाची सोय करणें ते आपलें पवित्र कर्तव्य मानतात. इस्लाम धर्माचें पांचवें तत्त्व ‘हज्ज’ हें होय. या तत्त्वानुसार प्रत्येक इस्लामधर्मियानें प्रतिवर्षीं मक्केची यात्रा करणें आवश्यक मानलें जातें. याशिवाय इस्लाम धर्माचें महत्त्वाचें तत्त्व ‘जिहाद’ हें होय. जिहाद म्हणजे इस्लामधर्माच्या विरोधकांचा नायनाट करणें. अर्थात् हें तत्त्व महंमदानें मक्कावासियांचा प्रतिकार करण्यासाठीं सांगितलें आहे. तथापि त्याचा विपरीत अर्थ घेऊन प्रसंगविशेषीं अनर्थकारक गोष्टी घडून येतात. त्या टाळण्यासंबंधीं आपण उपदेश केला पाहिजे.

इस्लाम धर्माची स्थापना इतर धर्माप्रमाणेंच स्वातंत्र्य, समता, बंधुभाव, दया, क्षमा, सहानुभूति, शांति इत्यादि तत्त्वांवरच झालेली आहे. इस्लाम याचा अर्थ शांति असा आहे. त्यामुळेंच इस्लामधर्मीय लोक अभिवादन करतांना ‘ अस्सलामु अलैकुम् ’ ‘ अलैकुमुस्सलाम ’ असें म्हणतात. ‘ तुला

शांति प्राप्त होवो' असाच याचा अर्थ आहे. इस्लाम धर्माचें तत्त्वज्ञान कुराण या ग्रंथांत लिहून ठेवलें आहे. याशिवाय महंमदाच्या जीवनावर रचलेल्या निरनिराळया कथांचा 'हादिथ' या नांवाचा ग्रंथहि मुसलमान लोक पूज्य मानतात. पूर्वीं कुराण व हादिथ या ग्रंथांतहि ज्या वेळीं एखाद्या गोष्टीस शास्त्राधार मिळत नसे त्या वेळीं 'सुन्न' म्हणजे सामाजिक रूढि प्रमाण मानली जाऊं लागली. पुढें कुराणांतील वचनापेक्षां ही रूढी अधिक बलवत्तर होऊं लागली. त्या वेळीं रुढिप्रिय लोकांचा वेगळा असा 'सुन्नी' पंथ निर्माण झाला.

मुसलमान लोक मोहरम, इद–ए–मिलाद, बकरी ईद इत्यादि अनेक सण साजरे करतात. त्यांपैकीं इद–ए–मिलाद हा सण विशेष महत्त्वाचा आहे. हा सण रबिउल् अव्वल महिन्यांतील १२ व्या दिवशीं येतो. या दिवशीं महंमद पैगंबरांचा जन्म झाला व याच दिवशीं त्यांचा मृत्यु झाला. त्यामुळें या सणास दुहेरी महत्त्व प्राप्त झालें आहे. पूर्वीं या दिवशीं महंमदाची पुण्यतिथि साजरी करण्याची प्रथा असे. त्यामुळें रबिउल् अव्वल महिन्याच्या आरंभापासून या दिवसापर्यंतच्या काळास ते 'बारा वफात' असें म्हणत. अर्थात् या वेळीं हा सण बराच शोकपर्यावसायी असे. तथापि आतां या दिवशीं महंमदाची जयंती साजरी करण्याची प्रथा पडली आहे. या दिवशीं मुसलमाम लोक सुंदर पोषाक करून मशिदींत एकत्र जमून नमाज पढतात. एकमेकास प्रेमभरानें आलिंगन देऊन ते 'ईद मुबारक' (ही ईद तुला सुखाची जावो) असें म्हणतात. या दिवशीं मशिदींत कुराणाचें पठण व श्रवण केलें जातें.

आपणाकडे आढळून येणारा मुसलमानांचा दुसरा सण मोहरम हा होय. हा मोहरम महिन्याच्या १० व्या दिवशीं येतो. महंमदाच्या मृत्यूनंतर खिलाफतीचीं भांडणें सुरू झालीं. सीरिया देशांतील यजीद हा वंशपरंपरेनें खलिफाच्या गादीवर आपला हक्क सांगूं लागला व

इकडे लोकांनीं महंमदाच्या मुलीचा मुलगा हुसन यास खलिफा म्हणून निवडून दिलें. त्यामुळें भांडणाचा प्रसंग उद्भवला. हुसेननें अनत्याचारी मार्गानें यजीदला सर्व गोष्टी समजावून सांगण्याचा प्रयत्न केला. तथापि यजीदनें हुसेनची कत्तल केली. या दुर्दैवी घटनेमुळें मुसलमानांत दोन पंथ पडले. हुसेनला खलिफा मानणाऱ्या पंथास शिया असें नांव प्राप्त झालें व दुसऱ्या पंथास सुन्नी असें नांव पडलें. 'शिया' लोक हुसेनच्या हत्येमुळें शोकविव्हल झाले. त्याची स्मृति म्हणून ते या दिवशीं हुसेनची कागदाची कबर ( ताबूत ) बांधून तिचें दर्शन घेतात व तिला मिरवतात.

याशिवाय इस्लाम धर्मांत सूफी व बहाई असेहि पंथ पडले आहेत. सूफीपंथीय लोक भक्तिमार्गाचे पुरस्कर्ते आहेत. ते 'सुफेद' म्हणजे पांढरे वस्त्र वापरतात, म्हणून त्यांच्या पंथास सूफी असें नांव प्राप्त झालें आहे. सूफी लोक परमेश्वराच्या कृपाप्रसादासाठीं गुरु अथवा साधु इत्यादिकांची मध्यस्थी मान्य करीत नाहींत. मनुष्याची सर्व शक्ति मर्यादित असल्यामुळें परमेश्वराच्या साधनेसाठीं आपणापेक्षां एखाद्या श्रेष्ठ व्यक्तीची मदत असणें मात्र ते आवश्यक मानतात. सूफी पंथाचे प्रवर्तक कामकरी वर्गांतीलच होते. त्यामुळें सामान्य जनांत या पक्षाचा बराच प्रसार झाला. या सूफी पंथांत 'कुतुब' या नांवाचा श्रेष्ठ साधु होऊन गेला. कृतकृत्याबद्दल पश्चात्ताप, त्याग, निरिच्छ वृत्ति, धनलोभापासून अलिप्तता इत्यादि बाबतींत सूफीपंथीय साधु श्रेष्ठत्वास पोहोंचले आहेत. याशिवाय इसम धर्मांत आढळून येणारा दुसरा महत्त्वाचा पंथ 'बहाई' हा होय. इ. स. १८८४ सालीं इराण देशांतील मिर्झा अली महंमद नांवाचा इसम स्वतःस परमेश्वराचा प्रेषित मानूं लागला. त्यामुळें तेथील लोकांनीं त्याचा खून केला. तथापि त्याचा शिष्य बहाउल्ला यानें मात्र बरीच लोकप्रियता प्राप्त केली. बहाउल्लाच्या अनुयायांचा स्वतंत्र पंथ निर्माण झाला. त्याला 'बहाई' पंथ असेंहि म्हणतात. या पंथांतील लोक अत्यंत सधन असून व्यापारानिमित्त देशोदेशीं विखुरलेले आहेत.

मुसलमानी सण साजरे करतांना या सर्व गोष्टींची आपण यथायोग्य प्रकारें माहिती मिळविली पाहिजे.

## समवाय

१. महंमद पैगंबराचें चरित्र कथन करा.

२. इस्लाम धर्माचीं तत्त्वें सांगा.

३. इस्लाम धर्मांत निरनिराळे पंथ कां निर्माण झाले तें सांगा.

४. खिलाफतीच्या चळवळीचा इतिहास सांगा.

५. हिंदुस्थानांतील मुसलमानी सत्तेचा धावता इतिहास सांगा.

६. हिंदु व इस्लाम संस्कृतींचीं वैशिष्ट्यें कथन करून त्यांची देवाण-घेवाण कशी झाली तें सांगा.

७. 'मानवतेचे पुजारी' भाग १ व 'आशियाचे धर्मदीप' या पुस्तकांतील महंमदाचीं चरित्रें वाचा.



# नाताळ

आपल्या भारतांत ख्रिस्ती धर्माचेहि अनेक लोक राहतात. इ. स. च्या पंधराव्या शतकापासून पाश्चिमात्य ख्रिस्ती राष्ट्रांतील लोकांचा या देशाशीं संबंध येऊं लागला. हा संबंध उत्तरोत्तर वाढतच गेला. ख्रिस्ती धर्मीय पोर्तुगीज, फ्रेंच व इंग्रज लोकांनीं येथें सत्ता संपादन केली. त्या-बरोबरच त्यांनीं येथें ख्रिस्ती धर्माचा बराच प्रसारहि केला. धर्मप्रचारासाठीं या देशांत त्यांचे अनेक धर्मोपदेशक आले. त्यांच्या सौज्यनानें, चिकाटीनें व सेवावृत्तीनें ख्रिस्ती धर्माचा प्रसार होण्यास फार मदत झाली. एतद्देशीय दलित लोकांत त्यांनीं विशेष प्रचार करून त्यांना उर्जितावस्थेस आण-ण्याचा प्रयत्न केला. या धर्मोपदेशकांपैकीं फ्रान्सिस–डी–नोबिली व फ्रान्सिस–डी–झेविअर या धर्मोपदेशकांचें कार्य लक्षांत घेण्याजोगें आहे. ख्रिस्ती धर्माचा प्रसार करण्यासाठीं या देशांत पोर्तुगीज लोकांनीं बरेच अत्याचारहि केले. तथापि त्यामुळेंच त्यांना अखेरीस या देशाच्या

सत्तासंपादनाच्या झगड्यांत हार खावी लागली. आज आपल्या देशांतील ख्रिस्ती लोकांची संख्या दुर्लक्ष करण्यासारखी खासच राहिली नाहीं. या आपल्या देशबांधवांच्या धर्माची, त्यांच्या तत्त्वांची व आचारविचारांची आपण माहिती मिळविली पाहिजे. ही माहिती मिळविण्यासाठीं आपणांस ख्रिस्ती लोकांच्या नाताळ या सणाची फार मदत होईल.

आज जगांत ख्रिस्ती कालगणना सर्वत्र मान्य झाली आहे. या कालगणनेस येशू ख्रिस्ताच्या नामकरणदिवसापासून आरंभ झाला. येशू ख्रिस्तानें ख्रिस्ती धर्माची स्थापना केली. त्याचा जन्म पॅलेस्टाइन प्रांतांतील बेथलहेम या गांवीं झाला. लहानपणापासूनच त्याच्या ठिकाणीं कांहीं अलौकिक दिव्य शक्ति वास करीत होती. त्यामुळें त्याच्याभोंवतीं शिष्यपरिवार जमूं लागला. येशूनें आपल्या अनुयायांना शांति, सेवा, बंधुभाव, मानवता, प्रेम इत्यादि कल्याणकारक गोष्टींचा उपदेश केला. त्या काळीं पॅलेस्टाइन प्रांतांत रोमन सत्ता चालूं होती. या सत्तेखालीं सामान्य जनता भरडून निघत होती. मानवतेचा प्रत्यहीं खून होत होता. धर्माच्या नांवाखालीं सर्वत्र दंभ बोकाळला होता. या सर्व गोष्टींविरुद्ध येशूनें बंडाचा प्रेममय झेंडा उभारला. त्यामुळें तत्कालीन धर्मपंडितांकडून व सत्ताधाऱ्यांकडून त्याचा अपरिमित छळ झाला. अखेरीस या मानवतेच्या महान् उपासकास त्यांनीं क्रूसावर चढवून व हातापायांत खिळे ठोकून हालहाल करून ठार मारलें. तथापि येशूच्या मनाची शांति अखेरपर्यंत ढळली नाहीं, त्याच्या अंःकरणांतील भूतदयेचा सागर आटला नाहीं, निर्मळ प्रेमाचा झरा शुष्क झाला नाहीं. मरणाच्या प्रवेश-द्वारांत अपरंपार यातना भोगीत असतांना देखील त्यानें परमेश्वराची करुणा भाकून त्यास भक्तिपूर्वक विनविलें, "परमेश्वरा, यांना (मला मारणारांना) क्षमा कर. कारण आपण काय करीत आहोंत हें यांना कळत नाहीं." पृथ्वीच्या पाठीवर शांतीचे जे थोर उद्गाते होऊन गेले त्यांत महात्मा बुद्ध, महात्मा गांधी व महात्मा येशू ख्रिस्त यांचें तेज अपूर्व आहे.

अशा या थोर धर्मसंस्थापकाची जयंती ख्रिस्ती लोक दि. २४ डिसेंबर रोजीं साजरी करतात. ता. २४ डिसेंबर रोजीं मध्यरात्रीस येशूचा जन्म झाला, असें बायबल या धर्मग्रंथांत सांगितलें आहे. या दिवसापासून तों नूतन वर्षारंभदिनाच्या अखेरपर्यंत ( १ जानेवारीपर्यंत ) नाताळचा सण साजरा केला जातो. या दिवसांत ख्रिस्ती लोक दररोज आपल्या देवळांत जाऊन परमेश्वराची प्रार्थना करतात. इष्टमित्रांच्या गांठी घेऊन त्यांस शुभसंदेश देतात. घरोघरीं मिष्टान्नाच्या मेजवान्या होतात. 'नाताळ केक' हा त्यांतील महत्त्वाचा पदार्थ मानला जातो. या दिवसांत लहान मुलें रस्त्यारस्त्यांतून ख्रिस्ताबद्दलचीं गोड गाणीं गात हिंडत असतात. ता. २४ डिसेंबर हा या सणांतील मुख्य दिवस. या दिवशीं ख्रिस्ती लोक आपल्या घरांत 'नाताळचें झाड' (एका विशिष्ट प्रकारच्या झाडाची फांदी) लावतात. त्यास पताकांनीं सुशोभित करतात व ठिकठिकाणीं मेणबत्त्या पेटवून त्यास अपूर्व शोभा आणतात. लहान मुलें या झाडाभोंवतीं फेर धरून नाचतात, गातात. रात्रीच्या वेळीं कुटुंबांतील सर्वजण एकत्र जमतात. त्यांपैकीं एखादा थोर पुरुष पिता सांता क्लॉजचें सोंग आणतो. इतर लोक त्यास नाना तऱ्हेचे प्रश्न विचारतात. त्या सर्व प्रश्नांचीं तो मोठीं गमतीचीं उत्तरें देतो. त्यामुळें सर्वत्र हास्याचे फवारे उडतात. त्यानंतर पिता सांता क्लॉज आपल्या पोतडींतून गोड गोडसा खाऊ काढून तो जमलेल्या बाळगोपाळांस वाटतो व सर्वत्र आनंदी आनंद होतो. नाताळच्या या सर्व दिवसांत ख्रिस्ती लोक बायबलचें वाचन करतात व ख्रिस्ताबद्दलचीं गाणीं गातात.

ख्रिस्ती लोकांच्या या सणाच्या निमित्तानें आपण मुलांना येशू ख्रिस्ताचें चरित्र सांगितलें पाहिजे. येशू ख्रिस्तापूर्वीं तत्कालीन यहुदीधर्मीय लोकांत कसा अनाचार माजला होता तें समजावून दिलें पाहिजे. तत्कालीन राज्यकर्त्यांकडून मानवतेचा प्रत्यही कसा खून होत होता, हें पटवून दिलें पाहिजे व त्या पार्श्वभूमीवर दलितांचा उद्धारक, शांतीचा प्रेरक, मानवतेचा उपासक,

प्रेमाचा प्रसारक, दयेचा सागर व सेवेचें आगर अशा येशू ख्रिस्ताच्या थोर शिकवणुकीचा संदेश दिला पाहिजे. त्याचप्रमाणें ख्रिस्ताच्या तोडी-च्याच या देशांत होऊन गेलेल्या महात्मा गौतम बुद्ध व महात्मा गांधी यांसारख्या विभूतींचीहि ओळख करून दिली पाहिजे. असें केल्यानेंच नाताळचा सण हा अधिक उद्‌बोधक करता येईल.

## समवाय

१. ख्रिस्तपूर्व पॅलेस्टाइन प्रांतांतील यहुदी धर्माच्या स्थितीची ओळख करून द्या.

२. तत्कालीन राजकीय व सामाजिक स्थितीची कल्पना द्या.

३. येशू ख्रिस्ताचें जीवनचरित्र कथन करा.

४. बायबलमधील कांहीं उतारे वाचून दाखवा.

५. ख्रिस्ताच्या जीवनांतील कांहीं प्रसंगांचें नाट्यीकरण करून घ्या.

६. ‘ नाताळचें झाड ’ तयार करा.

७. महात्मा गांधीं व गौतम बुद्ध यांच्या शांतिकार्याशीं ख्रिस्ताच्या शांतिकार्याची तुलना करा.

८. ख्रिस्तधर्मीय राष्ट्रांची ओळख करून द्या.

९. हिंदुस्थानांत ख्रिस्त धर्माचा प्रसार कसा झाला तें सांगा व या देशांतील मिशनरी लोकांच्या कार्याची ओळख करून द्या.

१० ‘ मानवतेचे पुजारी ’ भाग १, ‘ आशियाचे धर्मदीप ’ व ‘ पाश्चात्य पुरुषश्रेष्ठ या पुस्तकांतील येशू ख्रिस्ताचीं चरित्रें शिकवा.

# वनमहोत्सव



अलीकडे आपल्या देशांत वनमहोत्सवास राष्ट्रीय स्वरूप प्राप्त होत चाललें आहे. देशांतील अन्नधान्यपरिस्थिति दिवसेंदिवस खालावत चालल्यामुळें तर हा उत्सव साजरा करण्याची अत्यंत आवश्यकता आहे. वनांचा व पावसांचा संबंध अत्यंत निकटचा आहे. वनांतील वृक्ष ढग आकर्षून घेतात, जमिनींत ओलावा राखतात व जमिनीची झीज थांबवून भूमिगत पाण्याचा पुरवठा करतात. त्यामुळें पाऊस पडण्यासाठीं वनांची फार आवश्यकता आहे. आपल्या देशास मोसमी वाऱ्यापासून पाऊस मिळतो. तो बराच आनिश्चित स्वरूपाचा असतो. त्यामुळें बऱ्याच वेळां देशांत दुष्काळ पडतो. ही स्थिति नाहींशी करून पर्जन्यमान वाढविण्यासाठीं वृक्षारोपणाची फार आवश्यकता आहे. उटकमंड येथें गेल्या २०–२५ वर्षांत वृक्षारोपण केल्यामुळें पावसाचें मान ३ इंचानें वाढलें आहे वृक्षारोपणाच्या या बाबीकडे इतर देशांत त्यामुळेंच कसोशीनें लक्ष दिलें जातें. ही गोष्ट लक्षांत घेऊन आपण या कार्याकडे अधिक आस्थेवाइकपणानें पाहिलें पाहिजे.

वृक्षाचे माणसास अनेक उपयोग होतात. त्यांच्यापासून आपणांस फ़ळें, फुलें, जळण, इमारती लाकूड, औषधें, रंग व तेलें इत्यादि अनेक प्रकारच्या वस्तू मिळतात. त्याखेरीज शेतीसाठीं त्यांचा फार उपयोग होतो. अलीकडे आपल्या देशांतील वनें विरळ झाल्यामुळें पर्जन्यमान अनिश्चित व कमी झालें आहे त्यामुळें, लागवडीखालीं आणलेल्या जामिनीवर बराच आनिष्ट परिणाम झाला आहे. राजस्थानचें वाळवंट वाढूं लागलें आहे. संयुक्त प्रांतांतील २॥ लक्ष एकर जमीन पडीक झाली आहे. दामोदर नदीच्या आसपासच्या डोंगराळ भागांतील शेंकडा ८० टक्के जमीन नापीक झाली आहे. ती पिकाऊ बनविण्यासाठीं किती तरी खर्च करावा लागेल. एकंदरीनें पाहतां गेल्या दोन शतकांत आपल्या देशांतील ४-५ लक्ष एकर जमीन पडीक झाली आहे. शेतीवर चरितार्थ चालविणारांचें प्रमाण मात्र दिवसेंदिवस वाढत चाललें. आहे. आज आपल्या देशांतील शेंकडा ७५ लोक शेतीवर अवलंबून आहेत. इतक्या लोकांचा चरितार्थ चालविण्यासाठीं शेती अधिक पिकाऊ करणें अगत्याचें आहे. वनमहोत्सवाच्या निमित्तानें या सर्व गोष्टींचें मुलांना ज्ञान देऊन शेती अधिक पिकाऊ करण्यासाठीं या उत्सवाची कशी आवश्यकता आहे, हें पटवून दिलें पाहिजे. त्याचप्रमाणें आपल्या गांवांतील रस्त्याच्या बाजूस, नदीकांठीं, डोंगरपठारावर, निर्वृक्ष माळावर, शाळा, कचेऱ्या, क्रीडांगणें, गाढीतळ, यात्रेच्या व देवळांच्या जागा, अथवा घरांसमोरील अथवा परसूंतील बखळ जागा इत्यादि ठिकाणीं वृक्षारोपण केलें पाहिजे. अर्थात् वृक्षारोपण केल्यानंतर त्यांची सतत काळजी घेतली पाहिजे नाहींतर या उत्सवाला फारसा अर्थ उरणार नाहीं. आपल्या शाळेंतील निवडक मुलांचे गट करून त्यांजकडे या नवीन रोपट्यांची काळजी घेण्याची कामगिरी सोंपवावी व त्यांना उत्तेजन द्यावें. ज्या गटांतील अधिक झाडें वर्षाकाठीं जगतील त्या गटाचा समारंभपूर्वक गौरव करावा. असें केल्याशिवाय वृक्षारोपणाचें कार्य यशस्वी रीतीनें पार पडणार नाहीं. त्याचप्रमाणें या दिवशीं वृक्षारोपणाच्या निरनिराळया प्रकारांचीहि मुलांस माहिती द्यावी.

कांहीं झाडें बियांपासून रुजतात तर कांहींचें कलम करावें लागतें. कलमां-चेहि प्रकार आहेत. विशिष्ट प्रकारच्या झाडांची विशिष्ट काळांत व विशिष्ट प्रकारचीं कलमें करणेंच हितावह असतें. या गोष्टीचें ज्ञान दिलें जाणें आवश्यक आहे. त्याचप्रमाणें खतांचें महत्त्व सांगून त्यांचे निरनिराळे प्रकार व त्यांचीं वैशिष्ट्येंहि सांगितलीं पाहिजेत. वनमहोत्सवाच्या निमित्तानें या सर्व गोष्टींचें ज्ञान मुलांस होणें आवश्यक आहे.

वनमहोत्सवास चालना देण्यासाठीं हल्लीं सरकार जंगल व शेतकी खात्यां-मार्फत महत्त्वाचे प्रयत्न करीत आहे. बीं–बियाणें देणें, तयार रोपें पुरविणें, खतें पुरविणें, तज्ज्ञांचा सल्ला देणें व उत्तेजनार्थ बक्षिसें अर्पण करणें इत्यादि गोष्टींच्या द्वारां सरकार या गोष्टीस उत्तेजन देत आहे. या प्रयत्नांत आपण सरकारशीं सहकार्य केलें पाहिजे. त्याचप्रमाणें आपल्या गांवांतील अथवा जविनांतील महत्त्वाच्या प्रसंगांची स्मृति ठेवण्यासाठीं वृक्षारोपण केल्यासहि वृक्षसंवर्धनाच्या कार्यास हातभार लावल्यासारखें होईल. प्राचीन काळीं आपली भारतभूमि सुजलां–सुफलां होती. तिच्यांत भरपूर वनें होतीं. त्या वनांतून शिष्य आपलें शिक्षण घेत. भारतीय संस्कृतीचा पाया ऋषिमुनींनीं या वनांतच घातला. धर्म व राजकारण यांचीं हीं वनें त्या काळीं केंद्रेंच बनलीं होतीं. अलीकडे मात्र वनांच्या माहात्म्याचा आपणांस विसर पडला आहे. नागरी जीवनाचा विकास झाल्यामुळें वनें हीं असंस्कृतीचीं बिळें ठरलीं आहेत. वनांत राहणाऱ्या लोकांना 'रानटी' या निर्भर्त्सनेच्या संज्ञेनें संबोधिलें जात आहे. ही गोष्ट अयोग्य आहे. या दिवशीं वनाचें महत्त्व नीट ध्यानीं घेतलें पाहिजे. आपल्या पूर्वजांनीं वट, पारिजात, तुळस, बेल इत्यादि वृक्षांना देवपण दिलें, तें कांहीं उगीच नाहीं. वृक्षांच्या महान् उप-कारांबद्दल उतराई होण्यासाठींच त्यांनीं त्यांस देवपण दिलें आहे, ही गोष्ट आपण अवश्य ध्यानांत घेतली पाहिजे.

त्याचप्रमाणें वनमहोत्सवाच्या निमित्तानें जगांतील जंगलांचा परामर्श घेणेंहि बरेंच उद्बोधक होईल. विषुववृत्तीय प्रदेशांतील घनदाट जंगलें, उष्ण कटिबंधांतील गवती मैदानें (साव्हाना), मोसमी वाऱ्याच्या प्रदेशांतील उपयुक्त झाडांचीं जंगलें, भूमध्य सामुद्रिक प्रदेशांतील फळझाडांच्या बागा, समशीतोष्ण कटिबंधांतील डेसिडच्युअस जंगलें व गवती मैदानें आणि उत्तर समशीतोष्ण कटिबंधांतील सूचीपर्णी वृक्षांचीं जंगलें इत्यादींची माहिती देऊन तेथील जंगलांमुळें मानवी जीवनावर कोणता परिणाम घडला आहे हें सांगितल्यास वनमहोत्सवाचें महत्त्व मुलांच्या ध्यानांत येण्यास विशेष मदत होईल.

## समवाय

१. वनमहोत्सवाच्या चळवळीचें स्वरूप स्पष्ट करा.
२. वनस्पतींच्या लागवडीची माहिती द्या.
३. वनस्पतींचे उपयोग सांगा.
४. जंगलें व पर्जन्यमान यांचा संबंध लक्षांत आणून द्या.
५. हिंदुस्थानांतील जंगलांची माहिती द्या.
६. जगांतील जंगलांची माहिती द्या.
७. वृक्षारोपण करून घ्या व त्यानंतर करावयाच्या गोष्टींचें मार्गदर्शन करा.



# स्वातंत्र्य दिन

दि. १५ ऑगस्ट १९४७ रोजीं हिंदुस्थानास स्वातंत्र्य प्राप्त झालें. सुमारें दीडशें वर्षांच्या ब्रिटिशांच्या गुलामगिरींतून या दिवशीं हिंदुस्थानची मुक्तता झाली. ही महत्त्वपूर्ण घटना ता. १४ ऑगस्ट रोजीं रात्रीं बरोबर १२ वाजतां घडली. त्या वेळीं ब्रिटिशांचे हिंदुस्थानांतील अखेरचे व्हाइसरॉस लॉर्ड लुई माउंटबॅटन यांनीं येथील प्रमुख राजकीय पक्षाच्या हातीं सत्ता सोपवून हिंदुस्थानचा अशोकचक्रांकित तिरंगा ध्वज दिल्लीस मोठ्या डौलानें फडकविला. अखिल भारतांत या दिवशीं अपूर्व उत्साहाचें वातावरण पसरलें. सर्व देश भारतीय स्वातंत्र्याच्या जयघोषानें व मंगल वाद्यांच्या निनादानें दुमदुमून गेला. दिव्यांच्या लखलखाटानें सर्व देश उजळून निघाला. या मंगल दिवसाची स्मृति सतत ताजी ठेवणें हें आपलें परम पवित्र कर्तव्य आहे. या दिवशीं भल्या पहाटेस उठून व शुचिर्भूत होऊन गांवांत प्रभातफेरी काढावी. नंतर गांवांतील केंद्रस्थानीं ध्वजवंदन करून या दिवसाचें महत्त्व पटवून द्यावें. निरनिराळ्या प्रकारचे राष्ट्रीय करमणुकीचे कार्यक्रम करून देशसेवेची स्फूर्ति घ्यावी.

त्याचप्रमाणें या दिवशीं हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यलढ्याचें स्मरण करावें. इ. स. च्या सोळाव्या शतकांत युरोपीय लोक व्यापारासाठीं हिंदुस्थानांत आले. त्यांत इंग्रज, डच, फ्रेंच व पोर्तुगीज हे लोक प्रामुख्यानें होते. त्यांच्या व्यापारी कंपन्यांनीं येथें आपल्या वखारी स्थापन केल्या. त्यांच्या संरक्षणासाठीं त्यांनीं येथें सैन्य ठेवण्याची परवानगी मिळविली. तथापि हिंदुस्थानांतील राजकीय अनास्था पाहतांच त्यांच्या तोंडास पाणी सुटलें. त्यांनीं येथें आपली सत्ता प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला. या प्रयत्नांत अखेरीस इंग्रज लोक यशस्वी झाले. त्यांनीं बंगाल प्रांतांतील राजकारणांत मोठ्या मुत्सद्देगिरीनें हात घातला व तेथील सत्ता बळकावली. मद्रास प्रांतांतहि त्यांनीं आपली सत्ता प्रस्थापित केली. क्लाइव्हसारख्या युद्ध-कुशल सेनानीनें कंपनी सरकारची सत्ता प्रस्थापित करून तिला स्थिरत्व प्राप्त करून देण्याचा यशस्वी प्रयत्न केला. इंग्रजांची सत्ता हळूहळू वाढत चालली. वेल्स्लीनें आपल्या तैनाती फौजेच्या तत्त्वानुसार येथील अनेक सत्ताधाऱ्यांना अंकित करून घेतलें. त्यानंतर डलहौसीनें संस्थानें भराभर खालसा करून ब्रिटिशांची सत्ता विस्तृत केली. तारायंत्रें व आगगाड्यांच्या प्रस्थापनेमुळें ही सत्ता बळकट झाली.

ब्रिटिशांच्या व्यापारामुळें येथील उद्योगधंदे आधींच बसले होते. लोकांच्या नशिबीं दारिद्र्य आलें होतें. ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या धर्मप्रचारा-मुळें धर्मांतर करणारांची संख्याहि वाढत चालली होती. ही सर्व परि-स्थिति पाहून अखेरीस हिंदी लोकांचे डोळे उघडले. त्यांनीं इ. स. १८५७ सालीं स्वातंत्र्ययुद्ध करून ब्रिटिशांना येथून हाकून लावण्याचा प्रयत्न केला. तथापि तो निष्फळ ठरला. इ. स. १८५८ सालीं कंपनीसरकार-कडून इंग्लंडची राणी व्हिक्टोरिया हिजकडे हिंदुस्थानची राजसत्ता आली. तेव्हांपासून ब्रिटिशांची सत्ता दिवसेंदिवस दृढमूलच होत गेली. लॉर्ड वुइल्यम बेंटिक व डलहौसी यांच्या कारकीर्दींत इंग्रजी हें शिक्ष-णाचें माध्यम ठरलें. त्यामुळें येथील जनतेच्या जीवनांत व दृष्टिकोनांत बराच बदल घडला. या काळांत हिंदुस्थानांत अनेक पुढारी निर्माण झाले. त्यांनीं जनतेंत शैक्षणिक, राजकीय, धार्मिक व सामाजिक जागृति घडवून आणण्याचा प्रयत्न केला. त्यामुळें ब्रिटिश

सत्ताधाऱ्यांनीं हिंदी लोकांना आपलें मत व्यक्त करण्यासाठीं कौन्सिलांत हळूहळू प्रवेश देण्यास सुरुवात केली. तथापि या सुधारणेनें हिंदी लोकांच्या आकांक्षा पुऱ्या होणें शक्य नव्हतें. इ. स. १८८५ सालीं कॉंग्रेसची स्थापना झाली. तथापि इ. स. १९०५ सालीं झालेल्या वंगभंगाच्या चळवळीपर्यंत तिचें स्वरूप सरकारला अर्ज–विनंत्या करण्याचेंच होतें. वंगभंगाच्या चळवळीपासून मात्र जनतेंत राष्ट्रीयतेची प्रबळ भावना निर्माण झाली. सुदैवानें या वेळीं सुरेंद्रनाथ बानर्जी, लोकमान्य टिळक, लाला लजपतराय, रवींद्रनाथ टागोर, दादाभाई नौरोजींनीं स्वराज्यप्राप्ति हें आपलें ध्येय असल्याचें कॉंग्रेसच्या अध्यक्षपदावरून जाहीर केलें. लोकमान्य टिळकांनीं 'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे' अशी खंबीर घोषणा केली. दिवसेंदिवस हिंदी राजकारण विराट रूप धारण करूं लागलें. क्रांतिकारकांच्या चळवळींतून त्याचा अधूनमधून स्फोट होऊ लागला.

इ. स. १९१४ सालीं युरोपांत पहिलें महायुद्ध पेटलें. त्याच सुमारास महात्मा गांधी आपला दक्षिण आफ्रिकेंतील लढा संपवून मायदेशीं परत आले होते. त्यांनीं सरकारास साहाय्य करून त्याची सहानुभूति मिळविण्याचा प्रयत्न केला. तथापि तो निष्फळ ठरला. इ. स. १९१७-१८ च्या काळांत त्यांनीं चंपारण्य व खेडा इत्यादि भागांत आपले सत्याग्रहाचे अभिनव प्रयोग केले. इ. स. १९२० सालीं त्यांनीं असहकारितेची चळवळ सुरू केली. देशांतील लाखों लोकांनीं या चळवळींत अपूर्व उत्साहानें भाग घेतला. देशांतील तुरुंग सत्याग्रहींनीं भरून गेले. सरकारचें धाबें दणाणलें. त्यांनीं अत्याचार केले. त्यांतूनच 'जालियनवाला बाग' प्रकरण उद्भवलें. त्यामुळें हिंदी जनता देखील अत्याचारास प्रवृत्त झाली. महात्माजींना हें संमत नव्हतें. त्यांनीं चळवळ मागें घेतली. इ. स. १९३० सालीं त्यांनीं पुन्हां सत्याग्रहाची मोहीम काढली. पुन्हां त्याच उत्साहानें जनता या चळवळींत सामील झाली. या चळवळीमुळें गोलमेज परिषदेची निष्पत्ति झाली. तथापि गोलमेज परिषदेंतून महत्त्वाचें असें कांहीं निष्पन्न झालें नाहीं. इ. स. १९३७ पर्यंत हिंदी स्वातंत्र्याची प्रगति प्रांतिक स्वायत्ततेपर्यंत येऊन ठेपली.

इ. स. १९३९ सालीं दुसरें महायुद्ध पेटलें. हिंदुस्थानांतील नेत्यांच्या मर्जीविरुद्ध ब्रिटिशांनीं हिंदुस्थानला युध्यमान राष्ट्र बनविलें. त्यामुळें महात्मा गांधींनीं वैयक्तिक सत्याग्रहाची चळवळ सुरू केली. ता. ८ ऑगस्ट १९४२ रोजीं काँग्रेसनें 'चलेजाव'चा ठराव पास केला. त्यानंतर देशभर धरपकडी सुरू झाल्या. त्यांतून १९४२ ची सुप्रसिद्ध क्रांतिकारी चळवळ निर्माण झाली.

इकडे दुसऱ्या महायुद्धामुळें ब्रिटिशांचीं हाडें आधींच खिळखिळीं झालीं होतीं. तिकडे नेताजींच्या आझाद हिंद सेनेनें हिंदुस्थानच्या पूर्व दरवाजावर धडक मारली होती. या स्थितींत हिंदुस्थानांत आपली सत्ता टिकणें अशक्य आहे, असें जाणून ब्रिटिशांनीं सत्तासंक्रमणाची भाषा सुरू केली. काँग्रेस व मुस्लीम लीग यांचें मतैक्य घडण्यास विलंब लागला. अखेरीस हिंदुस्थान व पाकिस्तान अशी फाळणी करण्याचें ठरलें. त्याप्रमाणें ता. १५ ऑगस्ट रोजीं ब्रिटिश लोक येथील नेत्यांच्या हातीं सत्ता सोपवून चालते झाले. फाळणीनंतर देशांत अनेक नवे प्रश्न निर्माण झाले. ठिकठिकाणीं रक्तपात झाला. तथापि स्वातंत्र्यप्राप्तीनंतर देशांतील सत्तेस स्थैर्य प्राप्त करून देण्यासाठीं पंडित जवाहरलाल नेहरू, वल्लभभाई पटेल व डॉ. राजेंद्रप्रसाद इत्यादि नेत्यांनीं अनेक परीचे परिश्रम घेतले.

स्वातंत्र्यदिनाच्या निमित्तानें या सर्व घडामोडींचा ओझरता इतिहास सांगणें आपलें कर्तव्य आहे.

## समवाय

१. ब्रिटिशांच्या अमदानींतील हिंदी लोकांच्या स्थितीचें वर्णन करा.
२. या काळांतील राजकीय, सामाजिक, धार्मिक व शैक्षणिक चळवळींचा इतिहास सांगा.
३. राष्ट्रीय सभेचा इतिहास सांगून सत्याग्रहाच्या चळवळींचा परिणाम कथन करा.
४. ब्रिटिशांनीं सत्तादानासाठीं पुढें केलेल्या निरानिराळ्या योजनांचा परामर्श घ्या.
५. राष्ट्रीय ध्वजाची माहिती द्या व तो तयार करून घ्या.

# हरिजन दिन



दि. २५ सप्टेंबर अथवा १ आक्टोबर रोजीं सरकारी आदेशानुसार हरिजन दिन साजरा करण्याची प्रथा आहे. या दिवशीं गांवांतील हरिजनांच्या वस्तीची सफाई करून त्यांच्याबरोबर सहभोजन करण्याचा व त्यांना निरनिराळ्या प्रकारें मदत करण्याचा प्रघात आहे. अस्पृश्यता ही आतां कायद्यानें नष्ट झालेली असली तरी जनतेचीं मनें साफ करण्यासाठीं हा दिन साजरा करण्याची अत्यंत आवश्यकता आहे. या दिवशीं सभा भरवून अस्पृश्यतेचा इतिहास सांगणें बोधप्रद होईल. त्यामुळें आज पूर्वास्पृश्य मानल्या जाणाऱ्या समाजास आतांपर्यंत किती हालअपेष्टा सोसाव्या लागल्या याची जनतेस कल्पना येऊन तिच्या अंतःकरणांत सहानुभूति निर्माण होईल.

इ. स. पूर्वीं सुमारें दोन हजार वर्षांच्या काळांत आर्य लोक हिंदुस्थानांत आले. तेव्हां त्यांना येथील अनार्य लोकांशीं तोंड द्यावें लागलें. अनार्य

लोकांना यशस्वीरित्या तोंड देतां यावें म्हणून त्यांनीं समाजाची ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य अशा तीन वर्णांत विभागणी केली व प्रत्येक वर्णांतील लोकांनीं कोणकोणतीं कामें करावीं हें ठरवून दिलें. अशा रीतीनें आर्यांनीं सामाजिक कामांची विभागणी करून आपली शक्ति वाढविली व अनार्यांस जिंकलें. अनार्यांपैकीं कांहींना त्यांनीं आपल्या त्रिवर्णांत सामील करून घेतलें व बाकीच्या लोकांकडे हलकींसलकीं सेवेचीं कामें लावून दिलीं. या लोकांस ते शूद्र असें म्हणूं लागले. सेवा करणें हा शूद्रांचा धर्म ठरला. प्रथम प्रथम हे वर्ण माणसाच्या धंद्यावरून ठरत. ज्या माणसाचे जसे गुण असतील अथवा तो ज्या प्रकारचें कार्य करीत असेल त्यावरून त्याचा वर्ण ठरावयाचा. परंतु कालांतरानें ही स्थिति पालटली आणि वर्ण हे जन्मावरून ठरूं लागले. पुढें भिन्नवर्णीय स्त्री-पुरुषांत विवाह घडून आले व त्यांच्या संततीच्या निरनिराळ्या जाती बनत गेल्या. अशा रीतीनें हिंदु धर्मांत अठरापगड जाती निर्माण झाल्या. त्यांतच शूद्रांमध्येंहि अतिशूद्र असा एक वर्ग निर्माण झाला. याला लोक अस्पृश्य मानूं लागले. त्यांचा विटाळ झाल्यास ते शुचिर्भूत होण्यासाठीं आंघोळ करूं लागले. एवढेंच काय, पण त्यांच्या सावलीचाहि या लोकांना विटाळ होऊं लागला. त्यांनीं या लोकांना गांवाबाहेर वस्ती करण्यास भाग पाडलें. त्यांना सेवाधर्माशिवाय कोणतींहि कृत्यें करूं देण्याचें बंद केलें. त्यांना विद्यार्जनाची बंदी केली. त्यांचे नानापरीनें हाल केले. गांवांत जावयाचें झाल्यास त्यांना गळ्यांत घंटा बांधावी लागे. त्यामुळें इतर लोकांस अस्पृश्यांच्या आगमनाबद्दलची धोक्याची सूचना मिळत असे व ते त्यांचा विटाळ न होण्याबद्दल खबरदारी घेत. रस्त्यानें चालतांना त्यांना डाव्या बाजूनें चालावें लागे. त्यांना चांगला पोषाक करण्याचीहि बंदी करण्यांत आली. त्यांनीं सोन्यारुप्याचे दागिने घालता कामा नयेत, असेहि निर्बंध घालण्यांत आले. सारांश, या अस्पृश्य माणसांना स्पृश्य समाज पशूंपेक्षांहि हीन समजूं लागला.

शतकानुशतकें अस्पृश्यांवर हेच संस्कार घडत गेल्यामुळें पुढें पुढें त्यांनाहि आपण अत्यंत हीन, दीन आहोंत व स्पृश्यांची सेवा करणें एवढाच आपला धर्म आहे असें वाटूं लागलें. नव्हे, याच प्रकारचें तत्त्वज्ञान स्पृश्य वर्गानें आपल्या धर्मशास्त्रांतहि गोवून टाकलें. त्यामुळें आचार–विचारांच्या बाबतींत अस्पृश्यांना त्यांनीं धार्मिक दडपणाच्या ओझ्याखालीं कायमचें चिरडून टाकलें. अस्पृश्य समाजाची स्थिति अत्यंत केविलवाणी झाली. दिवसभर अंगण झाडावें, गांवांतील घाण काढावी, वेठबिगार करावी, गांवांत पाटी घेऊन घास तुकडा मागावा, उष्टें–खरकटें खावें, स्पृश्यांचीं फाटकीं लक्तरें अंगावर परिधान करावीं, खावयास धड मिळेना म्हणून मृत पशूंचें मांस भक्षण करावें, अशा गोष्टींतच त्यांचें जीवन जाऊं लागलें. शिक्षणाचा अभाव, संपत्तीचा अभाव, सत्तेचा अभाव, यामुळें त्यांची स्थिति अत्यंत केविलवाणी झाली.

अस्पृश्यांची ही हालाखीची स्थिति पाहून गौतम बुद्धांचें मन विटलें. त्यांनीं आपल्या नवीन धर्मांत तिचें पार उच्चाटन केलें. महावीरानेंहि तेंच केलें. अस्पृश्यांची केविलवाणी स्थिति पाहून आमच्या भागवतधर्मीय संतांचेंहि मन द्रवलें. एकनाथ, तुकाराम इत्यादि संतांनीं आपल्या उपदेशामृतानें स्पृश्यास्पृश्य भेद नष्ट करण्याचा प्रयत्न केला. त्याचप्रमाणें त्यांनीं स्वतः आचरणहि केलें. तथापि हिंदुधर्मीय लोकांच्या हाडींमांसीं खिळलेला हा अस्पृश्यतेचा रोग कांहीं त्यांना काढून टाकता आला नाहीं. इंग्रज लोकांनीं हिंदुस्थानांत राज्य स्थापन केल्यापासून मात्र ही स्थिति पालटत गेली. इंग्रजी शिक्षणामुळें येथील हिंदु समाजाच्या डोळयांत झणझणीत अंजन पडलें. त्यांना आपण अस्पृश्यतेच्या नांवाखालीं या समाजाला किती अमानुषपणें वागवीत आहोंत हें पटूं लागलें. ते समतेचा पुरस्कार करूं लागले. तरी सुद्धां हजारों वर्षें चालत आलेली अस्पृश्यता नष्ट होऊं शकली नाहीं. परंतु इंग्रजी राजवटीपासून अस्पृश्य समाजाचेहि डोळे उघडूं लागले. ब्रिटिशांनीं त्यांना शिक्षण घेण्यास मुभा दिली. एवढेंच नव्हें तर,

त्यांच्यांत शिक्षणाचा प्रसार व्हावा म्हणन त्यांनीं निरनिराळ्या सवलती दिल्या. शाळेंत स्पृश्यास्पृश्य भेद ठेवला नाहीं. त्यामुळें आपणहि माणसें आहोंत अशी अस्पृश्यांस जाणीव झाली. तथापि अशी नुसती जाणीव होऊन काय उपयोग? बोलून चालून अस्पृश्यांचा समाज म्हणजे दलित समाज. त्यांनीं आपल्यावर होणारा अन्याय कितीहि मोठ्यानें टाहो फोडून सांगण्याचा प्रयत्न केला तरी त्यास जुमानतो कोण? त्या आवाजांत जोंपर्यंत कोणत्याहि प्रकारचें सामर्थ्य निर्माण झालें नाहीं तोंपर्यंत तिकडे कोण लक्ष देणार? मारत्याला भूत भितें; भिऱ्याला तें अधिकच भेडावतें?

अस्पृश्योद्धार करण्यासाठीं महात्मा गांधींनीं हाडांचीं काडें केलीं. त्यांनीं अस्पृश्यतानिवारणास आपल्या विधायक कार्यक्रमांत महत्त्वाचें स्थान दिलें. त्यांच्याबद्दल जनतेंत सन्मानाची भावना निर्माण व्हावी म्हणून त्यांना 'हरिजन' असें नवीन नांव दिलें. हरिजनोद्धारासाठीं त्यांनीं स्वत: भिक्षेची झोळी उचलली व हजारों रुपयांचा फंड उभारला. त्यामुळें अस्पृश्यांबद्दलची जनतेच्या मनांतील अढी नष्ट होण्यास बरीच मदत झाली. ठिकठिकाणच्या अनेक समाजसुधारकांनीं या कार्यासाठीं स्वतःस वाहून घेतलें. तथापि हरिजनोद्धाराचें कार्य बरेंच मंद गतीनें चाललें होतें. त्यास डॉ.आंबेडकर यांनीं अधिक चालना दिली. डॉ.आंबेडकर हे अस्पृश्य समाजापैकींच असल्यामुळें त्यांनीं पोटतिडिकीनें सरकारकडे अस्पृश्योद्धाराच्या मागण्या केल्या. गोलमेज परिषदेंत त्यांनीं अस्पृश्यांच्या हितसंरक्षणासाठीं स्वतंत्र मतदारसंघ मागून घेतला. तथापि ही गोष्ट महात्मा गांधींना पटली नाहीं. त्यांनीं याविरुद्ध येरवडा येथें प्राणान्तिक उपोषण मांडलें. त्यांतूच पुढें सुप्रसिद्ध 'पुणें करार' निष्पन्न झाला. मध्यवर्ती सरकारच्या मंत्रिपदावर असतांना डॉ. आंबेकडरांनीं अस्पृश्यांसाठीं अनेक न्याय्य सवलती मिळवून घेतल्या. अखेरीस प्रजासत्ताक भारताच्या नव्या घटनेनुसार त्यांनीं अस्पृश्यता ही कायद्यानें नष्ट केली. आतां अस्पृश्यता पाळणें हा गुन्हा

ठरून त्याबद्दल शिक्षा होते. या सर्व गोष्टींची हरिजन दिनाच्या निमित्तानें आपण जनतेस ओळख करून दिली पाहिजे.

## समवाय

१. अस्पृश्यतेचा इतिहास सांगा.

२. अस्पृश्यतेविरुद्ध कोणीं कोणीं प्रचार केला तें सांगून त्यांच्या प्रचाराचें स्वरूप लक्षांत आणून द्या.

३. अस्पृश्यता ही कायद्यानें नष्ट झाली असली तरी हरिजनदिन साजरा करण्याची कां आवश्यकता आहे तें सांगा.

४. महात्मा गांधी व डॉ. आंबेडकर यांच्या चरित्रांची व कार्यांची ओळख करून द्या.

५. सफाई, सहभोजन, व पूर्वास्पृश्यांना जीवनोपयोगी गोष्टींचें दान इत्यादि कार्यक्रम घडवून आणा.

---




मकरसंक्रांतीनंतर पाडव्याच्या दिवशीं म्हणजे ता. १५ जानेवारी या रोजीं प्राथमिक शाळांत 'बालदिन' साजरा केला जातो. मकरसंक्रांतीनंतर सर्वत्र प्रेमाचें वातावरण निर्माण झालेलें असतें. त्या वातावरणाचा योग्य तो फायदा घेऊन संक्रांतीच्या पाडव्यास बालदिन साजरा करणें समयोचित ठरतें. या प्रसंगीं शाळेंतील मुलांच्या पालकांना व इतर ग्रामस्थांना शाळेंत बोलाविलें पाहिजे. त्यांच्यासमोर शाळेंतील मुलांचे निरनिराळे करमणुकीचे कार्यक्रम घडवून आणले पाहिजेत. शाळेतील मुलांच्या प्रगतीची यथायोग्य कल्पना येण्यासाठीं या दिवशीं मुलांनीं केलेल्यां व्यवसायांचें प्रदर्शन भरविणें व वक्तृत्व, खेळ, गायन, वाचन, इत्यादि अनेक गोष्टींच्या चढाओढी ठेवणें योग्य ठरतें. त्यामुळें पालकांना शाळेबद्दल विशेष आस्था वाटूं लागते व मुलांची सर्वांगीण प्रगति घडवून आणण्याच्या जबाबदारीची जाणीव होते. मुलांच्या शिक्षणाची जबाबदारी ही केवळ शिक्षकांचीच आहे, हा भ्रम या दिवशीं आपण

पालकांच्या मनांतून काढून टाकला पाहिजे. शिक्षक व पालक यांनीं मुलांच्या सर्वांगीण उन्नतीसाठीं सहकार्य करण्याची किती आवश्यकता आहे ही गोष्ट आपण पालकांना पटवून दिली पाहिजे. त्याचप्रमाणें पालकांनाहि आपल्या अडचणी मांडण्याची संधी दिली पाहिजे. शिक्षक व पालक यांनीं मुलांच्या उन्नतीची खेळीमेळीनें चर्चा केल्यास त्यापासून बराच फायदा होणार आहे. या प्रसंगाचा योग्य तो परिणाम झाल्यास आपल्या शालेय जीवनांतील अनेक प्रश्न सहजासहजीं सोडवितां येतील. मुलांचें खाणेंपिणें, त्यांचे कपडे, आरोग्य, संवयी इत्यादि गोष्टींसंबंधानें शिक्षक व पालक यांनीं एकत्र बसून उपाययोजना करणें सुलभ जाईल.

बालदिनाच्या दिवशीं शाळेंतील मुलें व शिक्षक यांनीं गांवांत प्रभात-फेरी काढून तिचा उद्देश पालकांना समजावून द्यावा व त्यांना आपल्या कार्यक्रमांत सामील होण्याचें आमंत्रण द्यावें. या दिवशीं ग्रामसफाईचा कार्यक्रम हातीं घेण्यास हरकत नाहीं. त्यामुळें ग्रामस्थांच्या मनांत शाळें-बद्दल आस्था निर्माण होईल. त्यानंतर निरनिराळया चढाओढी ठेवून सभा भरवावी व त्या वेळीं यशस्वी विद्यार्थ्यांस श्रेष्ठ व ज्येष्ठ पालकाच्या हस्तें बक्षिसें वाटावीं. यानंतर मुलांना खाऊ वाटून सोडून द्यावें व नंतर शिक्षक व पालक यांनीं निरनिराळया गोष्टींची चर्चा करावी. दुपारीं ११ वाजेपर्यंत इतका कार्यक्रम समाप्त झाल्यानंतर पुन्हां सायंकाळीं ४ वाजतां दुसरी सभा घ्यावी. यावेळीं विद्यार्थ्यांनीं आपले करमणुकीचे कार्यक्रम करून दाखवावेत. करम-णुकीच्या कार्यक्रमानंतर मुलांना सोडून देऊन शिक्षक व पालक यांनीं एकत्र बसून चर्चा व रसपान वगैरेसारखा कार्यक्रम करावा.

### समवाय

१. शिक्षक–पालकांची सभा घ्या.

२. विद्यार्थ्यांचे निरनिराळे करमणुकीचें कार्यक्रम तयार करून घ्या.

३. वक्तृत्व, काव्यगायन, वाचन, खेळे इत्यादि गोष्टींच्या चढाओढी ठेवा.

४. सकाळीं प्रभातफेरी काढा.




दि. २६ जानेवारी १९५० हा दिवस भारतीय इतिहासांत सुवर्णाक्षरांनीं लिहिला जाईल. या दिवशीं भारतांत घटनापरिषदेनें मंजूर केलेली नवीन राज्यघटना अमलांत येऊन प्रजासत्ताक राज्याची मुहूर्तमेढ रोवली गेली. त्यामुळें भारतांत प्रजासत्ताक दिन अपूर्व उत्साहानें साजरा केला जातो. दि. २६ जानेवारी या दिवसाला भारतांत कित्येक वर्षांपासून विशिष्ट महत्त्व प्राप्त झालें आहे. इ. स. १९२९ सालीं लखनौ येथें झालेल्या राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनांत हा दिवस 'स्वातंत्र्यदिन' म्हणून पाळण्याचें ठरलें होतें. त्याप्रमाणें प्रतिवर्षी तो 'स्वातंत्र्यदिन म्हणून अपूर्व उत्साहानें पाळला जात असे. तथापि दि. १५ ऑगस्ट १९४७ रोजीं भारतास स्वातंत्र्य प्राप्त होतांच या दिवसाचें महत्त्व कमी झालें. कारण त्यानंतर १५ ऑगस्ट हाच स्वातंत्र्यदिन मानला गेला व २६जानेवारी हा दिवस मागें पडला. तथापि

आंता स्वातंत्र्यदिनाच्या ऐवजीं 'प्रजासताकदिन' बनविलें आहे. स्वातंत्र्य-प्रप्तीच्या उज्ज्वल इतिहासाची स्मृति सतत आपल्या डोळयांसमोर ठेवून आपल्या अंतःकरणांत स्वदेशसेवेची स्फूर्ति देणारा हा दिवस आतां आपणाला सुराज्याचा मार्ग दाखवीत आहे. त्यामुळें या दिवसाचें पावित्र्य अधिकच वाढलें आहे.

या दिवशीं प्रातःकाळीं उठून ग्रामसफाईच्या कार्यक्रमांत भाग घ्यावा. या कार्यक्रमानुसार आपण नुसती गांवांतील घाणच काढीत नसून मनांतील कुविचारांची घाण देखील काढतों. त्यामुळें गांवांप्रभाणेंच आपलें मन स्वच्छ व प्रसन्न होऊन सद्विचारग्रहणास योग्य होतें व क्षुद्र भेदां-दिकांस त्यांत थारा राहात नाहीं. याच सुमारास शाळेची सफाई होणेंहि अगत्याचें आहे. मंगलमय तोरणांनीं अथवा रांगोळयानीं शाळेस शोभा आणणें समयोचित ठरेल. या कार्यक्रमानंतर ध्वजवंदनाचा कार्यक्रम होणें अगत्याचें आहे. ध्वजवंदनाची पूर्वतयारी करण्यासाठीं आपण आधल्या दिवशीं मुलांना ध्वजगीतें व राष्ट्रगीतें योग्य रीतीनें म्हणावयास शिकविलीं पाहिजेत. हीं गीतें गात असतांना त्यांतील शब्दांचा अर्थ नीटपणें न कळ-ल्यामुळें मुलांचा बराच गोंधळ होतो. त्यामुळें त्यांचा अर्थ आधींच योग्य प्रकारें सांगणें आपलें कर्तव्य आहे. त्याचप्रमाणें आपल्या राष्ट्रध्वजाचा इतिहास सांगून त्यासंबंधीं संपूर्ण माहिती देणें समयोचित ठरेल. ध्वज वंदनाच्या कार्यक्रमानंतर नवीन राज्यघटनेचीं वैशिष्ट्यें सांगितलीं पाहिजेत. भारतीय राज्यघटना समजावून देण्यास या दिवसासारखा योग्य दिवस मिळणें कठीण आहे. स्थलाभावीं येथें भारतीय राज्यघटनेचा परामर्श घेणें अशक्य आहे. त्यासंबंधींची माहिती इतर पुस्तकांत उपलब्ध असल्यामुळें ती येथें देण्याचें विशेष प्रयोजनहि नाहीं. नव्या घटनेचीं वैशिष्ट्यें सांगतांनाच ती घटना कोणीं व कशी बनविली या गोष्टींचा म्हण-जेच घटनापरिषदेचा इतिहास सांगणें बोधप्रद होईल. याबाबत लेखन-समितीचे अध्यक्ष डॉ. आंबेडकर व घटनापरिषदेचे अध्यक्ष डॉ. राजेंप्रसाद

यांच्या कामगिरीचा उल्लेख करणें आवश्यक आहे. नव्या घटनेनुसार भारतांत स्वातंत्र्य, समता, बंधुभाव, न्याय, नीति इत्यादींचें साम्राज्य कसें नांदेल याचें ओझरतें दर्शन करून देणें उचित होईल. या दिवसापासून अस्पृश्यता ही कायद्यानें नष्ट झाली आहे व जातिधर्मविरहित शासनपद्धतीचा अवलंब झाला आहे; ही गोष्ट प्रामुख्यानें मुलांच्या नजरेस आणणें जरूर आहे. अशा शुभ प्रसंगीं आपल्या समाजांत दिसून येणारे क्षुद्र भेदभाव नष्ट होण्यास उपयुक्त ठरतील अशा कार्यक्रमांची आंखणी केली पाहिजे. राष्ट्रभाषा, ग्रामीण उद्योगधंदे व शिक्षण इत्यादींच्या विकासासाठीं कसकसे प्रयत्न केले जात आहेत या गोष्टींचा वृत्तान्त सांगणें योग्य होईल.

प्रजासत्ताक भारताचा हा नूतन वर्षारंभदिन असल्यामुळें या दिवशीं आपण केलेल्या कार्याचा आढावा घेतला पाहिजे. त्या दृष्टीनें मागील वर्षांत केलेल्या मूलोद्योगविषयक कामगिरीचें प्रदर्शन भरविणें अधिक स्फूर्तिदायक ठरेल. सायंकाळच्या वेळीं ध्वजावतरणासाठीं सर्वांनीं एकत्र जमावें. ध्वजवंदनाप्रमाणेंच ध्वजावतरणदेखील विधिपूर्वकच करावयाचें असतें, या गोष्टीची मुलांना जाणीव करून द्यावी. रात्रींच्या वेळीं राष्ट्रीय करमणुकीचे विविध कार्यक्रम ठेवल्यास त्यांत गांवांतील लोकहि उत्साहानें भाग घेतील व त्यांच्याहि मनांत प्रजासत्ताक दिनाचें महत्त्व ठसेल.

## समवाय

१. ध्वजगीतें व राष्ट्रगीतें यांचें अर्थ समजावून द्या.
२. राष्ट्रध्वजाचा इतिहास सांगा.
३. सम्राट अशोकाच्या शांतिकार्याबद्दल माहिती देऊन अशोकचक्राचें महत्त्व पटवा.
४. घटनापरिषदेचा वृत्तान्त सांगा.
५. भारतीय राज्यघटनेचीं वैशिष्ट्यें सांगा.
६. मूलोद्योगांच्या वस्तूंचें प्रदर्शन भरवा.
७. करमणुकीचे कार्यक्रम तयार करून घ्या.
८. जातिधर्मभेदाविरहित रसपानाचा कार्यक्रम करा.